# उल्का[illegible]

( कथासंग्रह )

वि. वि. बोकील

प्रथमावृत्ति

२५ ऑक्टोबर १९४० ]    [ किमत १॥ रुपया

## श्री. बोकील यांचें वाङ्मय

| | | |
|---|---|---|
| १ | वळवाचे पाऊस | कथासंग्रह |
| २. | गारांचा वर्षाव | ,, |
| ३ | जलधारा | ,, |
| ४ | उल्कापात | ,, |
| ५ | बोकिलाच्या गोष्टी | (छापत आहे) |
| ६ | फोल आशा | कादंबरी |
| ७ | झंझावात | ,, |
| ८. | दुसरी सावली | ,, |
| ९ | मंगळागौरीच्या रात्रीं | (छापत आहे) |

## आगामी

| | | |
|---|---|---|
| १. | भिकारी कुबेर | कादंबरी |
| २ | बेबीची बहीण | ,, |

# “उल्का”



## व्यवहार आहे हा !

“आता माझें लग्न होऊन चागलीं दोन वर्षें झालीं. दोन बरें का गुरु, दोन. नीट ऐका कान देऊन. दोन वर्षें, पण no friction नाहीं तर तू लेका. सदा बायकोच्या अगावर वस्‌वस् कधीं म्हणून बायकोचें नांव काढलें कीं अगदीं तरवार उपसण्यापर्यंत आवेश. पण माझ्या कावेरीसारखी बायको मिळायला जन्मोजन्मींचें पुण्यच खर्चीं घातलें पाहिजे महाराज. किती शान्त स्वभाव— कोण मनमिळावू— कोण गोड बोला— ! त्यातून शिक्षण म्हणशील तर– तर काय !— इग्रजी पाचवींत होती त्या वेळेस. माझ्या बायकोची मीच काय स्तुति करू ! पण इतकेंसुद्धा मी सागतों कीं आमच्या सबध आळींत– पण जाऊ दे. उगीच रूपाची चर्चा हवी कशाला !

तीच तुमच्या ससाराची तऱ्हा पहा. दोन डोळे शेजारीं पण भेट ना ससारीं ! खरें कीं नाहीं ? हसतोस काय प्राण्या ? बायकानाही तुमच्या-आमच्यासारख्याच भावना असू शकतील हें कसें तुम्ही विसरता ! काय ? हे नवीन आचारविचार म्हणतोस ? खूप केलीस ! बायकोला बरोबरीच्या नात्यानें वागवून, एखाद्या मित्राप्रमाणें तिचा सल्ला घेणें— याला मूर्खपणा म्हणतोस ? विसाव्या शतकातला मनु आहेस झालें. Look here– तूच पहा ना. मीं सिनेमाला जातों— नाटकाला जातों— तेवढें मात्र वर्ज्य हो ! अन् कावेरीलाही पण घेऊन जातों. आता तुझें म्हणणें काय आहे ? कीं हें असें नाचऱ्यासारखें वागलें तर स्वतत्रता नी स्वैराचार यातील भेद जाणण्याइतकी तारतम्यबुद्धि बायकाच्या जातीला नसल्यामुळें— हो, आलें लक्षात— ! तर त्या, तुझ्या शब्दात सागायचें म्हटलें म्हणजे— उठवळ बनतात ! या

तुझ्या सिद्धान्ताला पाहून हसावें का रडावें हेंच समजत नाहीं. माझें तर ठाम मत आहे— प्रामाणिक मत आहे, कीं जरा बायकोच्या कलानें घेतलें— लक्षात ठेव. तुझ्याकरितां तिनें आपल्या माहेरच्या नावावरसुद्धा पाणी सोडलें आहे जरा गोडीगुलाबीनें वागलें, तर हे तुझ्या घरातले प्रकार तात्काळ थाबतील. Sure! थट्टा नाहीं अन् तुझी ती मर्यादा— कसली मर्यादा बोडक्याची घालतोस रे? बायकोला काय कुत्र्यासारखा साखळीपट्टा अडकवून बाधून ठेवणार वाटतें? अन् ही तुझी मर्यादा वाटतें? अन् अधिकाराची चुणुक! लोकाच्या तुम्ही लाथा खाता तें पुरे नाहीं वाटत?

अरे, तसें कोण म्हणतो? तुला माझ्या म्हणण्याचा भलताच अर्थ काढण्याची फार वाईट खोड लागली आहे बायको डोक्यावर घेऊन बैस म्हणून का मी तुला सागतों आहें?— तुझें काहीं तरीच आपलें काय म्हणतोस? भित्रेपणा बायकाच्या जातीला खुलून दिसतो? हें– हेंच तें. यानेंच तर तुम्ही पेशवाई घालवलीत— आणि— का चाललासरा? बैस रे जरा गजाभाऊ! चहा सागू का टाकायला? नको? का रे? दोघाच्यामध्यें तिसरा नको म्हणतोस? अरे, पण कावेरी आली म्हणून तुला कशाला उठून जायला पाहिजे? टोपी होय? इथेच होती कीं आता! ती टेबलाखालीं पडलीय् बरें— येत जा कीं मधून मधून All right— अच्छा!—"

मीं सिगारेट ओढलेली कावेरीला खपत नसल्यामुळें मी झटकन उठून टेबलावरची राख, तुकडे वगैरे हातातल्या पुस्तकानें झटकून टाकून पुन्हा खुर्चीवर रेलून पडलों. कावेरी बाहेर आली.

'दादाचें पत्र आलें होतें का?'

'कां? आज दादाचे पत्र यायची वाट पहाते आहेस वाटतें? काहीं माहेरीं जाण्याचें कारस्थान वगैरे तर नाहीं ना चालू?' मीं हसत म्हटलें.

'इश्श! काहीं तरीच.'

'कां? काहीं तरी कसें? अस्सें माहेर सुरेख बाई, खेळाया धाडीतें—'

'मी विचारतें काय नी त्यावर हें उत्तर वाटतें? सदा न् कदा मेला पाचटपणा.'

'हूँ! हा पाचटपणा झाला? हा पाचटपणा? काय? माना काय

वेळतेस ! काहीं भीडमुर्वत तरी ! हल्लींच्या मुली ना !'

'आणि आपण अगदीं पांडवकाळींचे भीष्मच कीं नाहीं—'

आणि हा वाद असा तुटणें शक्यच नव्हतें. मीं हळूच तिच्या हातावर चापटी मारून म्हटलें,

'बोलायला जीभ कशी चुरुचुरु वळते नाहीं का !'

'आई ऽऽऽ—. हें काय लहान पोरासारखें सदान् कदा फटाफट चापट्या मारायच्या ! मरणाऱ्याला नसेल त्रास होत पण— त्या खाबालाच काय चापट्या मारायच्या असतील त्या मारून घ्या बरें एकदा हो ! समाधान व्हावें कुणाचें झालें तरी !'

माझ्या डोक्यात काय आलें एकदम कुणास ठाऊक. मीं चटकन् उठून तिचे दोन्ही हात माझ्या हातात धरले.

'आता सापडलीस कीं नाहीं ? खाबाला मारू ना चापट्या ? हाच माझा खाब— ह— एक आता का तोंड खालीं !— हे दोन. आता कशाला धडपड ? हे तीन— पुरेत का ? का आणखी थोड्या !'

माझ्या हातून सुटण्याकरिता तिची धडपड तर खूप चालू होती. जरा वेळानें तिनें तोंड वर केलें, जरा बाहेर पाहिल्यासारखें केले आणि नाकावर बोट ठेवून—

'अग बाई ! ते पाहिले का गिरीशभाऊजी— पाहिलें वाटतें त्यानीं' असें म्हणत झटक्यानें हात सोडवून घेऊन ती आत पळून गेली. मी जरा बिचकून तिनें निर्देश केलेल्या दिशेकडे पाहिलें— पण तेथें गिरीश नव्हताच तर कोठून दिसणार !

* * *

मातृपितृविहीन गिरीश हा माझा धाकटा भाऊ. माझ्या लग्नानंतर पुढच्या सहाच महिन्यात मातापितराच्या वियोगामुळें मला संसारात लक्ष घालावें लागलें. त्यांतून गिरीश पाच वर्षांचा. त्याच्याही सरक्षणाची जबाबदारी मजवरच येऊन पडली. पण जबाबदारी हा शब्दच मला इतका भयकर वाटला कीं त्यामुळें मला न कळत माझ्या हातून त्याच्या बाबतींत थोडेंसें निष्ठुर वर्तन घडू लागलें. याचा परिणाम असा झाला कीं भावाविषयीं प्रेम हा शब्द त्याच्या तुटपुज्या कोशातच नव्हता. अर्थात् कावेरीचें

आणि त्याचें बरेंच मेतकूट जमे. वहिनी चागली का ? तर श्री ग णे काढायला लावीत नाहीं म्हणून असेंच तो उत्तर देई. बरें त्यातून मुलाचे मुके घेण्याच्या मी फार विरुद्ध, अशा एक ना दोन, हजारों कारणानीं त्याच्या संरक्षणाविषयीं माझ्या हातून जर काहीं घडलें तर 'तोंडात पाहिजे का ?— गप्प बैस' वगैरे शेलक्या शब्दाचा अहेर करण्यापलीकडे माझ्या हातून कांहीं झालें नाहीं.

त्या दिवशीं मला गिरीशच्या सरक्षणाची नैतिक जबाबदारी विशेषच वाटूं लागली. आता हा चागला पाच वर्षाचा टोणगा झाला— याला शब्द नकोत का ओळखायला ? अन् न शिकून काय भीक मागायची आहे पुढें ? माझ्या वेळेला तर याच्याएवढा असताना मी क ख ग घ पर्यंत पोहोंचलों होतों. अन् या शुंभ्याला अजून श्रीच्या डाव्या बाजूच्या कोंपऱ्यातील रेघ द्यायचे लक्षात रहात नाहीं ! तें काहीं नाहीं. रडला तरी चालेल, पण आता जरा ह्याच्याकडे लक्ष दिलेंच पाहिजे.

'गिरीश.' मी टेबलावरील फायली बाजूस सारून उठलों. पहिल्या हाकेला ओ मिळाल्यावर मग काय पाहिजे ?

'गिरीऽश.'

हाक मारली गिरीशला अन् पुढें उभी कावेरी !

'गिरीश कुठें आहे ?' मी जरा निश्चयाच्या स्वरात म्हणालों

'कशाला ?'

'तू लागलीस का पुन्हा चाभारचौकशा करायला ? कुठे आहे तो ?'

'बाईऽ बाईऽ बाई— अगदीं चोरीच्या आरोपावरचें वॉरटच दिसतेय हें !' ती दरवाजाला टेकून उभी राहिली ह्यापुढें माझा रस्ता अडला गेला.

'तूं दूर हो. आत काय करतो आहे तो ?'

'सागतें. पण रागवायचें नाहीं. हें पहा' म्हणून माझा हात धरून तिनें मला घरात नेलें. आतला प्रकार पाहून मी थक्कच झालों. कोपऱ्यात एका लहानशा गादीवर मारे लुगडें पाघरून स्वारी गाढ झोपीं गेली होती.

'कावेरी— अग पण—' मला तिनें पुढें बोलूच दिलें नाहीं.

'कळलें मला— आठ वाजले आहेत हें मलाही कळलें— पण असें पहा—'

'कसें ?' मी तिला वेडावून म्हणालों.

'नाहीं एखाद्याला झोप आवरत— त्यातून लहान जीव.'

'लहान जीव ? चागला टोणगा आहे पाच वर्षांचा !'

'अस्सें ! अन् पचवीस वर्षांचे त्याचे मोठे बधु रविवारीं अगदीं पहाटेच उठत असतील नाहीं ? किती वाजता बरें ? नऊ वाजता नाहीं ?'

'त्याचें वकीलपत्र घेतलें आहेस वाटतें ? तें काहीं नाहीं. उठव त्याला. काय मॅडकॅप आहे ! बाहेरून हाकलला अन् इथें येऊन पसरला. तू त्याला शिकवतेस तू— तूच—' मी त्याच्या अगावरचे पाघरूण ओढण्याकरता खालीं वाकलों पण तिनें झटकन् माझा हात दूर केला

'मी उठवतें भाऊजींना. भाऊजी— भाऊजी, उठायचें नाहीं का बरें ! हें पहा— अशी जर हिसकाफिसक करायची असेल तर— जा पाहू तुम्ही येथून ! भाऊजी तर उठणार नाहींतच अशानें, आणखी मीही पण त्याच्या जोडीला निजेन. मग पहा स्वयपाकाचें नी आपल्या हपिसाचें. गिरीशभाऊजी, भाऊजी— आता भाऊजी उठला नाहींत तर कानात पाणी ओतीन ह ! ह, अस्सें ! आता कसें शहाणें बाळ उठलें ! उठा— उ्ठा. उठा गडे. आता पुरे ना झोप ?' कावेरीच्या भाषणानें तो महामुनी जागा होण्याच्या ऐवजीं या कुशीवरचा त्या कुशीवर मात्र झाला.

'ए बैला, ऊठ. चल पाटी पेन्सील घेऊन.' मी मोठ्यानें ओरडलों.

'चल, ऊठ बाबा बैला— पाटी घे, पेन्सील घे. उद्या तुला 'बी ए' करतों, परवा वकील होशील, तेरवा पैशाचें गाठोडें आणून ओत तुझ्या वहिनीपुढें. ऊठ बाबा ! इश्श ! काय तरी बाई एखाद्याच्या पाठीमागें लागावें ?'

'या असल्या फाजील लाडामुळेंच—'

माझें मलाच हसू आलें. ज्याच्याविषयीं आम्हा दोघामध्यें वाद माजला होता तो महात्मा तर खुशाल घोरत पडला होता अन् आम्ही मारे काठ्या घेऊन भाडत होतों.

त्या दिवशीं गिरीशनें रोजच्यापेक्षा जास्तच बोलणीं खाल्लीं— अन् त्याच्या वतीनें मध्यें लुडबुड करणाऱ्या वहिनीनेंहि पण एक थप्पड खाल्लीच. ऑफिसला जायला साहजिकच उशीर झाला. जेवता जेवता कावेरी मध्येंच म्हणाली,

'हो ! बरी आठवण झाली-- आज सान्यांच्या सुनेची मगळागौर आहे-- तिची सासू मला बोलावणें करून गेली होती. भाऊजींना घेऊन जाऊ ना ?'

'कोण साने ? कुठली मगळागौर ?-- अन् आता लहान आहेस का हुदड्या मारायला ?-- अन् या राजेश्रींना बरोबर नेणार होय ?' मीं जरा रागानेंच म्हटलें

'हें पहा, रागवायचें असलें तर—'

'तर-- तर काय ?' मीं जास्तच रागावून म्हटलें

'तर-- पण आमटींत कढी काय घातलीत ? इश्श ! इतकें लक्ष्य नाहीं आज जेवणात ?'

माझी चूक मला कळून आली पण चुकीची दुरुस्ती करण्याचा शिष्ट-सम्मत मार्ग सोडून मुळीं चूकच कबूल न करणें हा मनुष्यधर्मच आहे

'लक्ष्य नसायला काय झालें ? तुझेंच लक्ष्य हल्लीं ठिकाणावर नसतें कढी केलीस का तादुळाची धुवण वाढलीस राम जाणे !' मी म्हणालों.

'बरें ,मग मी जाऊं ना ?' तिरक्या नजरेनें पहात कावेरी म्हणाली.

'काहीं नको जायला '

'का नको ?'

'का नको ? हें बघ-- कावेरी, उगीच भाडण उकरून काढण्यात काहींच मतलब नाहीं. मी नको म्हणून सागतों आणि तुझें आपलें—'

'पण त्याना मीं सागितलें आहे ना ?'

'तूं आता मला उगीच भडावून सोडू नकोस. मी सागतों जायचें नाहीं.' मी पानावरून रागारागानें उठलों

'आणि गेलें तर ?'

मला तिच्या या सथ बोलण्याचाच मनस्वी संताप आला

'गेलीस तर तगडी मोडून टाकीन' म्हणून गुंड्या तुटलेला कोट तसाच अर्धवट पाठीवर टाकून मी बाहेर पडलों, आणि ऑफिसमध्यें तर नको ही नोकरी आणि नको हा ताप असें होऊन गेलें. घाईघाईनें दर-वाज्यांत पाऊल टाकताच 'मिशाळ सेनापति' हेडक्लार्क हातात घड्याळ घेऊन पुढें उभा राहिलेला दिसला. मी मुकाट्यानें घरातल्या अडचणींची

सबब पुटपुटत माझ्या टेबलाकडे जाऊं लागलों. आज दुर्दैव तर हात धुवून पाठीमागें लागल्यासारखें दिसत होतें. टेबलावर फायलींचा ढिगारा पडला होता. माझ्याबरोबर काम करणारा गोखले— तो तर खुशाल भिंतीला खुर्ची टेकवून, हातातल्या टाकानें दात कोरीत पडला होता. त्याच्या ओठावरच्या शाईच्या डागाकडे पाहून तर माझें भानच नाहींसें झालें एरवींचें त्याचें 'काय मिष्टर' हे संबोधन चीड आणण्याजोगें होतें यात शकाच नाहीं पण त्या दिवशीं तर— माझ्यापासून दूर होता म्हणून ठीक. नाहीं तर त्यानें तोंडातच खाल्ली असती— ओठावरच्या निळ्या रंगाला गालफडावरील तांबड्या रंगाची जोड मिळाली असती गोखल्याला एक मोठी वाईट खोड होती— आणि ती म्हटली म्हणजे त्याचे नाकाचे चाळे. एक तर त्याचा फ्रेंच कट. भिकार्ची बुरखुडें उगीचच्या उगीच ओढणें,— आणि— त्याच्या रुमालाकरता माझा प्राण चालला तरी तो रुमाल मागण्याचे धैर्य माझ्याच्याने झालें नसतें. आज ह्या सर्व गोष्टी भुतासारख्या माझ्यापुढें नाचू लागल्या

साडेपाच वाजता घरात पाऊल टाकतों तों हातात बादली घेऊन कावेरीची मूर्ति पुढें उभी— आगींत तेल

'मोलकरीण नाहीं का आली ?' मीं तुसडेपणानें विचारलें. कावेरी काहींच न बोलता तशीच नळाकडे जाऊं लागली.

'कावेरी—' इतक्या दिवसात आजच मीं तिला रागानें हाक मारली.

'कावेरी— बहिरी आहेस का ? नी पहातेस काय वेंधळ्यासारखें ?"

'मोलकरीण येऊन गेली असावी. मी पूजेला गेलें होतें घराला कुलूप होतें.'

'कावेरी— दिवसेंदिवस तू स्वतःला फार शहाणी समजू लागली आहेस वाटतें ? मी नको म्हणून म्हणालों असताना तू का गेलीस मंगळागौरीला ? तुला माझी किंमतच नाहीं, नाहीं ? ठेव ती बादली खालीं. माझीं धोतरें धुण्याचा तुला तरी कशाला त्रास ?' मीं कोट काढून तसाच बस्करावर फेकून दिला. कावेरी तशीच हातात बादली घेऊन नळावर गेली. मीं तर निश्चय केला, काय वाटेल तें होवो, आज हिला जरा तरी शिक्षा केलीच पाहिजे. मीं सांगितलें असताना ऐकत नाहीं !

'कावेरी-- झाली एवढी शोभा पुरे नाहीं का झाली ? नवऱ्या-विषयीं तुझ्या मनात काय आदर आहे तें कोणीही सागू शकेल आता. माझें धोतर राहू दे म्हणून-- तुला ऐकायचें नाहीं का ?'

एवढेंसें तोंड करून कावेरी माझ्याकडे पाहू लागली. एक वेळ वाटलें— जाऊ दे. त्यात काय आहे ? आहे जरासा खेळकर स्वभाव तिचा. वय गेल्यावर का कुणी मग ?-- पण— पण असें का तिनें करावें ? आणि वर रडण्याचें सोंग-- ? तें काहीं नाहीं.

'मी धुतें ना पण !' कसेबसे चार शब्द तिच्या तोंडून बाहेर पडले. तिनें मान फिरविली.

पण मग तिनें असें का करावें ?— मी काय मूर्ख होतों तिला तसें सागायला ?

'हो घरात चालती' म्हणून तिच्या हातातली बादली मीं हिसकावून घेतली.

धुणें धुण्यात वास्तविक फारसें डोकें खर्च करावें लागतें अशातला काहीं भाग नाहीं. पण खवळलेल्या डोक्यानें धूत असता बादलीचा काठ धोत-राला लागावा यात काहींच नवल नाहीं. बराच वेळ 'पडू का नको' या विचारांत गुतलेल्या मेघराजानींही माझा अतच पहाण्याचा विचार केला होता. तरी मीं नेटानें स्वीकृत कार्य चालू ठेवले. बागड्याच्या आवाजासरशीं मीं मागें वळून पाहिलें. कावेरी दरवाजाला टेकून उभी होती.

'पाऊस येतोय ना !' तिनें म्हटलें.

'समजतेंय मला.' मीं उत्तर केलें. धोतराला दोन धपके जास्त मिळाले.

पाऊस जास्तच येऊ लागला. म्हणून घाईघाईनें सदरा तसाच पिळून मी घरात पळालों बादली खालीं ठेवली. 'ऐट नको कुणाची. काहीं बागड्या भरल्या नाहींत. वेळ आली तर नराचा नारायणसुद्धा होतो.' मीं जरा कुर्‍यांत तिच्याकडे पाहिलें कावेरी धुण्याकडे पाहून हसत होती. मी किंचित् गोंधळल्यासारखा झालों.

'दांत काढून हसायला काय झालें ?— तुला थट्टा वाटली होय ?'

'आता धुणें धुवून आणलेंत, तर मी म्हणतें—'

'काय म्हणतें ?'

'कीं अर्धांगी या नात्यानें —पिळून वाळत घालण्याचें काम मी करतें.'

ती जास्तच हसू लागली.

'आता तोंडात मात्र खाशील.' मीं चिडून म्हटलें.

'जशी आपली मर्जी. पण तेवढें माझें पोलकें धुवून आणलें आहे—' तिला हसू आवरेना

'तुझें पोलकें ?' मीं जास्तच चिडून म्हटलें

'अग आई गऽऽऽ—आईऽऽऽ—' म्हणून ती हसत हसत खाली बसली.

मीं पिळ्याकडे पाहिलें खरेंच ! सदरा म्हणून मीं पोलकेंच पिळून आणलें होतें. शर्टिंगचें कापड पोलक्यालाही वापरण्याचा हा फायदा !

'माझा सदरा कुठें आहे मग ? सकाळीं मीं तुला धुवायला दिला होता ना ?'

'आईऽऽऽ'

'कावेरी— तू माडलें आहेस तरी काय ? माझा सदरा कुठें आहे ?'

'मीं परटाला दिला—ह ह ह ह—अन् माझे पोलकें—ह ह ह—'

काय करावें हें मला सुचेना—काय बोलावे हेंही सुचेना कावेरी उठून माझ्याजवळ आली.

'इतकें काय पण आज चिडायला झालें ? बदलायचें होतें तेवढें धोतर —ओलेत्यानें किती वेळ उभे राहणार—? चहा निवून चाललाय्— चलायचें ना ?—पुरे मेला तो राग.'

कावेरीच्या हातात हात देऊन मी मुकाट्याने माजघरात गेलों.

* * *

चागलें फटफटीत उजाडलें होतें— त्यातून रात्रीं दहाचा सिनेमा शो. झोप जरी झाली तरी उगीच डोळे मिटून या कुशीवरून त्या कुशीवर मी लोळत पडलों होतों. वास्तविक आळसानें लोळत पडणें कावेरीला बिलकूल पसत नसे. माझ्या ऑफिसची तिलाच काळजी असल्याकारणानें सकाळीं सात वाजताच माझ्या अंगावरची पासोडी दूर कोपऱ्यात उडून पडे, खिडक्यांचीं दारें धडाधड आपटू लागत, गिरीशचें मुटकळें दुसऱ्या कोपऱ्यात डोळे चोळीत डोलत पडे नी केरसुणीचा फलक् फलक् आवाज सुरू होई. अगावर चार दोन पाण्याचे थेंब पडले म्हणजे मग उठणें भागच पडे. पण आज जरा थोडी ढिलाई असल्यासारखी दिसली तेव्हा या औट घटके-

च्या स्वातंत्र्याचा पूर्ण फायदा घेण्याकरिता म्हणूनच कीं काय मी पुन्हा डोक्यावर पांघरूण घेऊन पडलों.

जरा वेळानें पुन्हा जागा झालों. गिरीशच्या गादीकडे एकवार दृष्टि टाकली. पण स्वारी तेथें नव्हती. आश्चर्यच. कावेरी का नाहीं आली बाहेर अजून? का गेली शेजारच्या सरस्वतीबाईकडे गप्पा छाटायला? अन् मग मला असा मोकळा सोडून? शक्यच नाहीं आगगाडी एखादे वेळेस आपला आखीव रस्ता सोडून धावू लागेल पण कावेरी आपले घरकामातले नियम मोडणार नाहीं मग आजच का असें?

मला रहावेना. मीं उठून खिडकी उघडली. छान! लख्ख उन्हें पडलीं होतीं. आणि मग या बाईसाहेब आहेत तरी कुठें? सैपाकघरात जाऊन पहातों तों मोरीच्या काठावर दोन्ही हातात डोकें धरून कावेरी बसलेली दिसली. हा काय विलक्षण प्रकार!

'कावेरी—' पुढें वाकून पहातों तों तिला वाती झालेली मला दिसली. मीं चटकन् तिचें कपाळ दाबून धरलें. इतस्ततः बागडून टिकल्यापाणीचा खेळ खेळणारे तिचे केस डाव्या हातानें सावरले. अशा असहाय परिस्थितींतसुद्धा तिच्या त्या मोकाट सुटलेल्या केशसभाराकडे पाहून मला माझी पाठ थोपटावीसें वाटू लागलें. नशीब पाहिजे कावेरीसारखी बायको मिळायला.

जरा वेळानें पाणी घेण्याकरता म्हणून ती उठू लागली. मी तिला तसेंच बसवून ठेवून चुलीवरचें ऊन पाणी आणण्याकरता गेलों तिनें चूळ वगैरे भरली.

'काय झालें?' मीं घाबरून विचारलें.

'काहीं नाहीं' हें ठराविक उत्तर आलें.

'काहीं नाहीं कसें? बघ, चालताना तुझ्या झोकांड्या जाताहेत. डॉक्टरना बोलावून आणू का? मला का नाहीं उठवलेंस तुला त्रास होत होता तर?'

'हें पहा—उगीच नसतें सोंग माजवायचें असेल तर बाहेर जा पाहू कसे! मला किनई काहीं होत नाहीं. उगीच थोडें गळाल्यासारखें झालें आहे. मात्राबित्रा घेतली म्हणजे वाटेल जरा बरें.'

'तू माझें ऐक. चुलीपुढें कशाला बसतेस आणखीन्? भाजून बिजून

घ्यायचा विचार आहे का ?— मला शिक्षा का देते आहेस ही ?'

कावेरी 'नाहीं नाहीं' म्हणत असता मीं तिला बळेंच ओढून माजघरात नेलें व शेजारींच ठेवलेल्या वळकटीला लाथ मारून आथरूण घातलें.

'माझें ऐकायचें होते ना जरा—' ती अर्धवट उठून म्हणाली

'ही चपराक पाहिलीस का आता ?' मी हाताचीं बोटें दाखवीत म्हणालों.

'पण मला जर काहीं होत नाहीं तर का हा नसता जुलूम ?'

'अस्सें ! आणि परवा मला ताप आला होता तेव्हा कसें ? ताप गेला, सगळें झालें, तरी क्विनाइनच्या गोळ्या काहीं माझ्या कपाळाच्या सुटल्या नाहींत, दर शपथेगणिक एक एक गोळी कावेरी, परमेश्वर काहीं झोपला नाहीं बरे का ? आता दहा बारा दिवस हें माजघर आणि तू—'

'आणि पोटोबा ?' तिनें किंचित् हसून म्हटलें.

'मी करीन स्वयपाक. अडचणीच्या वेळीं दुसरें कोण करीत असतें ?'

'पायावर आवणाचें पाणी पाडून घेणें, चुलीजवळ चिमटा टाकणें आणि मग तो तापला असता उचलून हात भाजून घेणें, धूर झाला असता लाकडावरच डोळे फाडणें आणि शेवटीं परमेश्वराचीं बत्तीस कुळें उद्धरीत बाहेर चालतें होणें, या सगळ्याला जर स्वयपाक म्हणता येईल तर—'

'अतिशयोक्ति हा अलकार आहे हें मला कबूल आहे, पण ठराविक मर्यादेपर्यंतच '' मीं म्हटलें. पुढेंही आणखी काहीं लोकाचीं चोरलेलीं वाक्यें दडपून देणार होतों पण मागच्या दरवाजाला धक्का बसल्यामुळें मी गप्प बसलों. गिरीशचा आवाज मीं ओळखला. त्याच्याबरोबर सरस्वतीबाई— कावेरीची जीवश्च कंठश्च मैत्रीण— होत्या. गिरीश आत आला पण माझ्याकडे त्याचें लक्ष गेलें नाहींसें दिसलें. सरस्वतीबाई मात्र तेथेंच थबकल्या. गिरीश त्याच्या बोटाला धरून त्याच्याशीं काहीं तरी बडबडत होता.

'सरूबाई— मला आंबा आवडतो. चिंच आंबट असते. आणि पुन्हा चिंच पाहिजे म्हटलें तर कावेरीवहिनी रागावेल माझ्यावर. ती म्हणते, मुलांनीं चिंच खाऊं नये.'

आता माझ्या डोक्यात लख्खकन् प्रकाश पडला. तरी म्हटलें, मला दोन महिने स्वयपाक का करावा लागला नाहीं ! लहानापासूनसुद्धां थोरानीं शहाणपण शिकावें म्हणतात तें काहीं खोटें नाहीं. सरस्वतीबाई हसूं लागल्या

तसा गिरीश मनांत चमकला. मला पाहिल्यावर तर तो चोरासारखा त्याना धरून उभा राहिला.

सरस्वतीबाईंनीं 'आता गिरीशच्या हातीं आल्याचा रस आणि मात्रा धाडून देतें, भिण्याचें काहीं कारण नाहीं' असेंच काहींसें पुटपुटत काढता पाय घेतला. गिरीश त्याच्या मागोमाग सटकला. मीं कावेरीकडे पाहिलें. कावेरीनें मान फिरवली.

'कावेरी —' मीं तिच्या कपाळावर हात ठेवून म्हटले. तिनें माझ्याकडे पाहिलें.

'कावेरी— ही काय गडबड आहे ?' मी मुद्दामच वेड्याचें सोंग पाघरून म्हणालों.

'मला नाहीं माहीत.'

'मग कुणाला गिरीशला माहिती ?'

'हें पहा—' एवढेंच म्हणून तिनें दोन्ही हात डोळ्यावर ठेवले

'मग मला का नाहीं सांगितलेंस आधीं ! हें कसें झालें आहे, आहे का माहिती ! पण जाऊ दे—'

'उठसूठ मेला बाष्कळपणा !'

'चोराच्या उलट्या म्हणतात तें असें, पण बाईसाहेब, कोंबडा झाकला म्हणजे उजाडायचें राहतें का कधीं ?'

बराच वेळपर्यंत कोणी काहीच बोललें नाहीं. आणखी बोलणार तरी काय !

'कावेरी— आता तरी सांगायला हरकत नाहीं ना ?'

तरीही ती स्तब्धच.

'ए— मी काय म्हणतोंय् ?'

'काय ?'

'खरें आहे ना हें ?'

'काय ?'.

'सरस्वतीबाई काय म्हणत होत्या तें ?'

'सरस्वतीबाई आहे एक फाजील, नी—'

'मी आहें सात फाजील.' तिचें वाक्य पुरें करून मी हसू लागलों.

'मग लिहूं ना तुझ्या दादासाहेबाना पत्र ! पण आधीं मला सांग—

काय पण लाजते आहेस ? माझें नाव घ्यायलासुद्धा इतकी लाजली नसशील— खरें का मग हें ?'

'हो, हो, हो, हो, हो, हो, हो—! झालें का आता तरी समाधान ?' म्हणून तिनें तोंडावरून पाघरूण घेतलें. तिच्या डोक्यावर एक थापट मारून मी तेथून उठलों.

कावेरी माहेरीं गेली तेव्हां माझी कोण त्रेधा ! टांगा दाराशीं आला. वळकटी, ट्रंक, गिरीश टांग्यात टाकले. तिनें पायात वहाणा घातल्या आणि 'येतें हं' म्हणून सद्गदित कंठानें म्हटलें. आणि मग काय म्हणावें तेंच मला आठवेना. हा वेळपर्यंत 'अः, तूं माहेरीं गेलीस काय अन् इथें राहिलीस काय, सारखेंच' असा युक्तिवाद करून मी तिचें सांत्वन करीत होतों. तिनें चारदा म्हणावें 'अन् मग रविवारीं याल ना सोलापूरला ?' 'संध्याकाळपुरत्या दशम्या डब्यात घालून वर शिंक्यावर ठेवल्या आहेत बरें का !' 'बाई बाई ! ही तुमची तपकीरीची डबी—— कुठें चुलीपर्यंत येऊन पडली आहे पहा.' 'कसें होईल इकडे मला मोठी काळजी आहे.' वगैरे वगैरे. पण मी मात्र पुरुषी थाटात छातीवर हात ठेवून म्हणालों,

'अग जा ! मोठी काळजीचीच पडली की नाहीं ? पहा तर खरें—'

कावेरीचा दादा तिला नेण्याकरता आलाच होता.

'बरें' म्हणून ते पुढें बसले.

'बरें अच्छा' म्हणून मीं उत्तर केलें.

टागा दृष्टीआड होईपर्यंत कावेरी माझ्याकडे टक लावून पहात होती. मीही लटकें हास्य आणून कशी तरी वेळ मारून नेत होतों. टागा गेला नी मग आठवलें—— 'अरे माझें धोतर कुठें वाळत घातलें आहेन् हिनें ? का घेतलेंन् बरोबर ? म्हणजे कमालच झाली बुवा !' सायकल बाहेर काढली. रास्त्याच्या रामाशेजारीं टागा गाठला. पुन्हा चार प्रश्नाची देवघेव झाली. दादासाहेब थोडेसे हसले. मीं त्याच्याकडे लक्ष दिलें नाहीं. स्टेशनपर्यंत जाण्याचा विचार मीं कायम केला.

'उद्यापासून दूध अच्छेर घ्यायचें हं, अन् बरी आठवण झाली. सरस्वतीबाईचें लुगडे माझ्या मोठ्या ट्रंकेंत — ह्या—— नाहीं— त्या काळ्या —— ती पट्टयाची——'

'काळया पट्टयाची सरस्वतीबाई–' मीं हसून म्हटलें.

'इश्श ! मी ट्रंकेचें बोलतें आहे नी म्हणे काळया पट्टयाची सरस्वतीबाई ! तें लुगडें तेवढें त्याना द्यावें काढून किल्ली देईन मग ट्रंकेची. मागचें दार नीट लावून मग ऑफिसात जायचें. माझ्या घराची धर्मशाळा नाहीं करायची बरें ! माझीं भांडीं हरवायचीं नाहींत––'

'बरें आहे सरकार ' मीं म्हटलें

'कावेरी, पण तुझ्या प्रकृतीला जपत जा बरें का ! वरचेवर पत्र धाडायला आळस केलास कीं मग बघ आणखी पाकिटें पाहिजेत का ? नको ? लागलींच तर दादासाहेबाकडून आणवून घे. अन् ऑफिसच्या पत्यावर पत्र धाडायचें झालें तर तू पत्ता घालू नकोस–– त्याच्याकडून लिहून घे.' काय बोलू, काय नाहीं, असें मला झाले. टांगेवालासुद्धा माझ्याकडे वळून पाहू लागला. पण आमचे बोलणें चालूच होतें. तिचें शभरदा तेंच तेंच सांगणें–– तें अमुकच पहा–– ते तमूकच करा, तें अमक्याला नेऊन द्यायचें ह–– ते तमक्याला नेऊन द्यायचें ह.' मी वरकरणीं 'बरें ह, बरें ह' म्हणून तिच्या उत्तराला उत्तर ठेवून देत होतों मीं मनात म्हटलें, काय वेडी आहे ही मुलगी ! इतकें बजावून हडसून खडसून सांगायला मी गिरीश का आहें ? आजपर्यंत–– अडचणीच्या वेळीं वगैरे

स्टेशन आलें. इतक्यात तिला कायसें आठवलें. पण इतक्यात नको म्हणून मीं खुणावल्यावर ती गप्प झाली. दादासाहेबाना काहीं तरी निमित्त काढून मीं Wheeler च्या Stall कडे हाकलून लावलें. मी बाहेर खिडकीशीं उभा राहिलों कावेरीच्या मनात पुष्कळ बोलावेंसें दिसलें, आणि मलाहि वाटले कीं काहीं तरी बोलावें ! पण काय ? आणि कसें ? शेवटीं मीं घसा साफ करून 'काय गिरीश,–– चैन आहे लेका तुझी' येवढेंच म्हटलें. कावेरी माझ्याकडे सारखी पहात होती. पण मला तिच्याकडे पहाण्याचें धैर्य होईना. पुन्हा मीं काहीं तरी बोलण्याचा निश्चय केला. पण 'कावेरी' या संबोधनाच्या पुढें रेटवेना. शेवटीं नादच सोडून दिला तो. दादासाहेब परत आले तरी आम्ही काय बोलावें याचाच विचार करीत होतों. गाडी चालू झाली. कावेरीनें बोलण्याकरिता तोंड बाहेर काढलें–– तिचे ओठसुद्धा हालले. पण ती काहींच बोलली नाहीं. बोलण्याऐवजीं

तिनें माझ्या हातावर एक ऊन अश्रू मात्र टाकला!

गाडी दूर गेली. धावत गेलों तर? दररोज गाडी लेट सुटते पण आजच पहा कशी लेकाची minute to minute सुटली.

आणि घरीं आल्यावर सगळें घर कसें खायला उठल्यासारखें दिसूं लागलें. भयाण—ओसाड—जिकडे तिकडे स्मशानासारखें वाटू लागलें. आजपर्यंत एकटें राहण्याचा प्रसंग माझ्यावर कधींच आला नव्हता. ऑफिस मधून परत आलों तर 'यायचें साहेब' म्हणून वाकड्या मानेनें हसत पुढें येणारी नेहमींची कावेरी उद्या मला कशी दिसणार?—छे:! जाऊं का असाच तिच्या पाठोपाठ? अन् मग ऑफिस? महिनाअखेर—त्यातून नवीन साहेब—नारायणा, नको हा पुरुषाचा जन्म. आणि हें परावलंबी जीवन!

कोंपऱ्यात पडलेल्या किंचित् मळसर अशा लोकरीच्या तुकड्याकडे माझें लक्ष गेलें. अगवळच हा तिचा. काय असेल तें असो, मीं तो मोठ्या आदराने उचलून टेबलाच्या ड्रॉवरमध्यें ठेवून दिला.

काल वळकटी बांधताना पडलेले दोरीचे तुकडे मीं नीट करून कपबशाच्या फडताळात ठेवून दिले. वळकटी बांधताना काल ती माझ्याकडे आली आणि मला मदतीला हाक मारू लागली. मी तिच्या दुर्बलतेला उद्देशून जरा हसलों. तिला तें लागलें. आणि जरा रागानेंच 'बरें हो' हे शब्द माझ्या अंगावर फेकून ती आपणच दोरी आवळू लागली. दात ओंठ खाऊन ती दोरी आवळण्याची मी मजा पाहू लागलों. दोरी ओढताना—काथ्याची दोरी ती—तिचा हात काचला. माझ्याकडे तिनें दीन मुद्रेनें पाहिलें. तिचे ओठ थरारल्यासारखे दिसले. मी जरा पुढें झालों आणि तिच्या पाठीवर हात ठेवला. तिनें गुडघ्यात मान घातली.

'काय झालें—? हात काचला का—? हात् तुझी!'

ती चटकन् उठली नी माझ्या छातीवर डोकें ठेवून तिनें माझ्या गुंड्याना गंगामातेचें स्नान घडविलें.

मला आता माझा राग आला. दोन तोंडांत मारून घ्याव्याशा वाटूं लागलें.

मी तसाच बाहेर येऊन टेबलावरच्या सुपारीशीं खेळत बसलों. सुपारी

खावीशी वाटू लागली. पण खाता येईना.

कालच जेवणानतर मी सुपारी हातात घेऊन बसलों होतों. दादासाहेब झोंपाळ्यावर वामकुक्षीकरता पडले होते. कावेरी जेवण वगैरे उरकून बाहेर आली नी सुपारी मागू लागली. मीं आडकित्ता आणण्याविषयीं तिला सागितलें. आडकित्ता काहीं केल्या सापडेना. सुपारी पडली एक. फोडणार कशी? मीं म्हटलें 'बायकाच्या जातीला सुपारी खाणें बरें दिसत नाहीं !' अन् सबध सुपारी मीं तोंडात टाकली. कावेरी टेबलाशेजारीं उभी होती हें मला माहीत होतें, पण मीं दुर्लक्षच केलें. बराच वेळ गेल्यानतर ती परत जाताना म्हणाली, 'अस्सें काय ? सगळी सुपारी— अन् एक खाड जर दिलें असतें तर ?'

'उष्टें ?' मी तिला चिडवण्याच्या उद्देशाने म्हणालों.

'हो उष्टें !' ती दादासाहेबाकडे पाहून जरा ठसक्यानेंच म्हणाली.

चार शेर सुपारी आत्ताच्या आत्ता तिच्या नावावर सोलापूरला धाडून द्यावेंसें मला वाटू लागले.

* * *

कावेरी आज दुपारीं चार वाजता परत येणार होती. तिच्या परत येण्याच्या विचारानें मला रात्रीं झोपसुद्धा आली नाहीं. सारखा या कुशीवरचा त्या कुशीवर. पायथ्याचें उसें केलें, उशाचे पायथें केलें— पुन्हा पायथ्याचें उसे केलें— शेवटीं उशी फिरवायचा त्रास नको म्हणून दुसरी एक उशी पायथ्याशीं ठेवून दिली. पोटाजवळ पाय आणले— डोक्यावर हात ठेवला— हातावर डोकें ठेवलें. जेवढे म्हणून प्रकार शक्य होते तेवढे केले, फार काय सागू? झोपेवर रामबाण औषध म्हणून प्रसिद्ध महाराष्ट्रज्ञानकोशाचा एक सबध भाग वाचला.

प्रत्येक शब्दागणिक कावेरीची मूर्ति डोळ्यापुढें उभी राही. तिची ती वेणी, उभें रहाताना वाकलेला डावा पाय— ओठावर तर्जनी व मान खालीं वाकलेली, अन् लटक्या रागाच्या अवसानानें हसू आणणारे डोळे !— पुस्तक आपोआप गळून खालीं पडलें उद्या मला भेटताना ती कशी बरें माझ्याकडे पाहील ? मी चार महिन्यात तिच्या माहेरीं मुळींच गेलो नाहीं म्हणून— 'बरें हो' म्हणून मान मागें टाकून वेणीला हिसडा देईल का ? आणि मग एक दिवस— बापूसाहेब— तुमचे हाल कुत्रासुद्धा खाणार नाहीं. 'अग पण

माझें ऐकून तर घेशील कीं नाहीं' म्हणून मी सतरादा पुढें होईन, पण 'नाहीं नाहीं—छान केलेंत म्हटलें ? असेंच करावें बरें' म्हणून ती उसन्या अवसानानें माझ्यापुढें येऊन उभी राहील. आणि मग ?—पण हो. लोळता लोळता जमिनीवर आल्याचें आता माझ्या ध्यानात आलें. मी मनाशींच हसलों व पुन्हा सावरून अथरुणावर पडलों. रात्र सरेना—दिवस भेटेना—आणि विचार सोडीनात. मी तरी कसा जाणार तिच्याकडे ? तो गोखले याला कारण. त्याला याच वेळेला कशाला मरायला रजा पाहिजे होती कुणास ठाऊक ! त्या दिवशीं असा त्याचा राग आला—फरकॅपची गोंड्याची वाटोळी टोपी, काळा लॉग कोट, पायात पप शू—अवतार होता चोराचा. रजा मिळाल्याचा कागद माझ्यापुढें ठेवला आणि दोन फूट छाती पुढें काढून नाकाचा शेंडा उडवीत चालता झाला. अजून आठवण झाली कीं असें होतें कीं—!

पुन्हा या कुशीवरचा त्या कुशीवर झालों. पण झोपेचें नाव नाहीं.

आणि मग उद्या कावेरी येणार. बरोबर गिरीश आणि—

मडईच्या घड्याळात सहाचे ठोके पडले. शेजारच्या घरातील नळाचा 'सर्र्र्' आवाज सुरू झाला. देवावर विश्वास नव्हता तरी देवाचे आभार मानीत पाघरुणाला लाथ मारून उठलों.

ऑफिसला सुट्टी होती तेव्हा स्टेशनावरच जावें असा विचार आला, पण कदाचित् दादासाहेब हसतील या भीतीनें घरीं बसण्याचाच विचार कायम केला. पुन्हा, कावेरी एकटीच नव्हती आता—कदाचित् तिलाही सङ्कोच वाटायचा पेक्षा घरींच राहून चहा वगैरे करून ठेवला तर ? विचारासरशीं स्टोव बगैरे घेऊन बसलों. पण स्पिरिटच शिल्लक नव्हतें. सरस्वतीबाईच्याकडे मागून मिळालें असतें पण,—पण त्याही हसणार नाहींत कशावरून ? शेवटीं तसेंच रॉकेल पप करून स्टोव भडकावला. बऱ्याच वेळानें आशानिराशेचा झगडा थाबून आशा दिसू लागली. टांगा वाजला !—आली वाटतें ! दारापर्यंत धावत गेलों,—थोडक्यात बचावलें,—धोतर अडकून पडणारच होतों, पण धोतर फाटण्यावरच निभावलें. निराशेचा एक दीर्घ श्वास टाकून माघारीं परतलों. टांगा दुसऱ्याचाच होता. टांग्यात कावेरी तर नव्हतीच पण दोन धटिंगण मात्र पानतबाकूनें रंगवलेलें थोबाड घेऊन

मोठमोठ्यानें थट्टाविनोद करीत चालले होते.

मला एखादे वेळेस ऑफिसमधून येण्यास उशीर झाला तर लवकर येण्याचा तोडगा म्हणून उबऱ्यावर एक पालथें फुलपात्र ठेवीत असताना कावेरीला मीं पाहिलें होतें. मी एक लहसा तांब्याच ठेवून दिला उंबऱ्यावर– आता तरी !

आणि कावेरी आली खाद्यावर बऱ्याचशा दुपट्याच्या चक्रव्यूहात पडलेला अभिमन्यूबाळ आपल्या पराक्रमाची शिकस्त करीत होता रडणें कानावर पडताच मी एकदम पिसाटासारखा धावत गेलों

'कावेरी—' मला पुढे बोलवेना माझ्या कल्पनातरगातील कावेरी आणि सत्यसृष्टींतील कावेरी याच्यामध्यें जमीनअस्मानाचें अतर होते मीं बाधलेले मनोरे पत्त्याचे होते वाऱ्याच्या झुळकीसरशी पत्ते हलले—मनोरे कोसळले–न आनद, उत्साह, प्रेम–सर्व कांहीं जमीनदोस्त झालें कावेरीच्या डोळ्यात पूर्वींचे तेज नव्हतें. जगाचा वीट येऊन गेलेल्या माणसासारखें आसुरी तेज तिच्या डोळ्यात होतें. तिचे डोळे खोल गेले होते— गाल फिक्के पडले होते—अंबाड्याचा आकारसुद्धा लहान झाला होता पूर्वींची कावेरी—! अन् आताची कावेरी— ?

कावेरीनें माझ्याकडे पाहिले. काहींच न बोलता मुलाचीं दुपटीं ती सावरू लागली दादासाहेबानीं सागितल्यावरून सावित्रीबाईंना बोलवायला गेलों व त्याच्याकडून मूल, बाळतीण व गिरीश याच्यावरून भाकरीचा तुकडा ओवाळून टाकवला. मी खिन्न मनानें बाहेरच खुर्चीवर बसलों.

Rupert Brooke च्या मॅनेलॉस आणि हेलेनची मला आठवण झाली. White Helen bears child on legitimate child—

खरेंच, आयुष्य इतकें चमत्कारिक आहे का ? मीं वर पाहिलें तों दादासाहेब काहीं तरी बोलत आहेतसें दिसलें—

'अन् बापूसाहेब, अगदीं नशीब म्हणूनच पोरगी हातीं लागली बरे का— ! दोन दिवस तर पोरीनें डोळे उघडलेच नाहींत — आजपर्यंत मीं इतकीं बाळतपणें पाहिली पण या मुलीच्यापुढे मात्र हात टेकायची पाळी आली होती. बरे, तुम्हालाही उगीच काळजींत का टाकावें म्हणून आईनें आम्हाला कळवूसुद्धा दिलें नाहीं तुम्हाला. अगदीं आशा सोडली होती.

आम्ही— तुम्हाला तार करायला निघालों अन् पोरीनें डोळे उघडलेन् ! त्या दिवशीं सत्यनारायण केला तिच्याबद्दल '

मला या सर्व भाषणाचा अर्थबोध होण्यास बराच वेळ लागला. मीं गिरीशकडे पाहिलें— बूट कीं कायसेंसें काढण्याच्या नादात तो गुतला होता.

आणि कावेरीने मला उत्तर का नाहीं दिलें ? कीं माझ्या हाका मारण्यातच काहीं चूक होती ? अन् तिचे डोळे— ! पेक्षा कावेरी आजच मला भेटली नसती तरी बरें झालें असते.

मुलाचे रडणें सुरू झालें मी दचकून तद्रीतून जागा झालों. दादासाहेब मला मुलगा दाखवीत होते मीं जरासें पाहिल्यासारखें केलें. विचाराच्या पुढें मला माझ्या मुलाचे तोंडसुद्धा पहाणे नकोसे झाले. 'आत ठेवा त्याला' एवढेच मी कसेंबसें म्हणून उठलो.

* * *

कावेरी परत येताना मुलाबरोबर आणखी थोडेबहुत चमत्कारिक विचारही घेऊन आली मी म्हणतों तिला होऊ नये इतका त्रास झाला. मी कबूल करतों कीं तिला फारच त्रास झाला, पण मग त्या त्रासाचें आता काय ? माझ्याशीं का धुसफूस ? आमच्या पूर्वीच्या टुमदार ससारात नाहीं नाहीं त्या गोष्टी सैतानासारख्या वावरू लागल्या माझ्या साध्या प्रश्नाला 'हो' तर मिळणें शक्यच नव्हतें, पण ती मुळीं न ऐकल्यासारखेंच करू लागली. तिला वाटेल ती गोष्ट तिनें करावी आणि मला वाटेल ती मीं करावी हा प्रकार सुरू झाला. मीं गोडीनें सागून पाहिलें, रागाने सागून पाहिलें— तरी मीं काय बोलतों याकडे ती लक्षच देत नसे. खरें सागायचें म्हटले म्हणजे माझेंही पण घरातलें लक्ष थोडेंबहुत उडाल्यासारखेंच झालें. पूर्वी ऑफिसला जाताना मी शक्य तितका उशीर करीत असे आणि परत घरी शक्य तितक्या लवकर येत असें. आता या गोष्टी शक्य नव्हत्या. कारण घरीं बसून तरी काय करणार ? त्या पोराचें किंचाळणें आणि हिचें धुसफुसणें हेंच करायचें कीं नाहीं ? मग त्यापेक्षा आपल्या मित्राबरोबर फिरायला गेलेलेंच काय वाईट ? कावेरीला टाकून सिनेमाला अगर नाटकाला जाताना मला प्रथम प्रथम थोडेंसें कसेंसेंच वाटले पण पुढें सरावानें मी निर्लज्ज बनलों. एवढेंच काय पण रविवारीं 'ऑफिसमध्ये काम आहे' म्हणून खुशाल

थाप मारून किर्लोस्कर थिएटरमध्यें जागा अडवण्याचें काम करूं लागलों. दररोज घरात पाऊल टाकताना एक प्रकारें 'नको हें' असेंच वाटूं लागलें. असें का व्हावें ? अवघ्या चार महिन्यात देवळाचें स्मशान का व्हावें ? कां ?— का ?— का ?—

कारण काय ? वरून दिसायला सर्व कांहीं ठीक होतें. कावेरीसारखी तरुण बायको, मनोहरसारखा छबकडा मुलगा आणि गिरीशसारखा पाठचा भाऊ ! घर होतें, दार होतें, पैसा होता— सर्व कांहीं ठीक होतें— मग असें का ?

घरात पाहिलें तर जगाची उलथापालथ झाल्यासारखा प्रकार होता गिरीश, मनोहर आणि कावेरी आतल्या बाजूस निजूं लागलीं आणि मी एकटा बाहेरच्या खोलींत पडूं लागलों सहजासहजींच गोष्ट घडली. दादा साहेब चार दिवस होते, तेव्हा मीही बाहेरच पडत असें. दादासाहेब गेले तरी तेथून हालण्याचा विचार माझ्या डोक्यात आला नाहीं. कोणीच कांहीं बोललें नाहीं,— आणि ही नवीनच अमलात आलेली पद्धत कायम टिकली. मीं स्वतः होऊन मुलाला कधींच घेतला नसता कावेरी तर मुलाच्या बाबतींत बोलतच नसे. कामापुरतें— पण तेंसुद्धा एखाद्या परक्यासारखें. आम्ही एकमेकाशीं बोलू लागलो. एकमेकाचीं मनें एकमेकाविषयीं इतकीं का विटून जावींत हे माझ्यासमोर एक मोठे कोडेंच येऊन पडलें होतें.

त्यातून रविवार नाहीं तर सुट्टी असावी,— आणि कोणतीच कंपनी असू नये,— त्या दिवशीं तर जीव गेल्लेला पुरवला असें होऊन जात असे.

त्या दिवशीं पुष्कळ विचार करून पाहिला आणि ठरविलें कीं काय वाटेल तें होवो, पुन्हा पहिल्यासारखे वागून पाहू. घरातल्या घरात असें वागून कसें चालणार ?

तडक उठून गंधर्व नाटक मंडळीच्या 'स्वयंवर'चीं तीन तिकिटें काढण्याकरता बाहेर पडलों. तिकिटें बहुतकरून मिळणार नाहींत ही खात्री होती— तरी पण म्हटलें पाहू या— प्रयत्न तर करून पाहू ! सव्वादोनच्या खुर्च्या सर्व भरल्या होत्या. मीं खिशात हात घालून पाहिलें व दहाची एक नोट टाकून 'तीन तिकिटें–तीन सहा–१२,१३,१४–नंबर' म्हणून ऐटींत म्हणालों.

'सबंध लाईन रिझर्व्हड आहे.' उत्तर आलें.

जरा वेळ मीं विचार केला काहीं नाहीं— आज माघार म्हणून नाहीं घ्यायची.

'साडेचारचीं फाडा' म्हणून दुसरी एक पाचाची नोट मीं फेकली. तिकिटें खिशात ठेवून मीं घराचा रस्ता धरला. पण— दाराला कुलूप. तिनदा तिनदा मीं कुलूपाकडे पाहिलें. मीं हातात घेतलेल्या तिकिटाकडे पाहिलें— आणि मग ही गेली कुठें ? घड्याळांत पाहिलें तों तीन वाजून पचवीस मिनिटें झालीं होतीं नेहमींच्या पद्धतीप्रमाणें गधर्व पावणेचार वाजल्या-शिवाय काहीं पडदा उघडणार नाहीं ही खात्री होती, म्हणून दाराबाहेर तसेच उभें रहाण्याचा निश्चय केला. पुन्हा आठवलें– कदाचित् मला बाहेर उभें राहायला लागू नये म्हणून सरस्वतीबाईकडे तर किल्ल्या दिल्या नस-तील ? सरस्वतीबाईच्या दारालासुद्धा आज माझी दया आली नाहीं. त्याच्याही दाराला कुलूप पाहून मी परतलों समोरचे गजाभाऊ खाकोटींत छत्री, हातात तुपाची कासडी, दुसऱ्या हातात साखरेचा पुडा वगैरे सामान वाहून नेताना दिसले. कसा तरी वेळ जावा म्हणून त्याच्याशींच बराच वेळ गप्पा मारीत उभा राहिलों. शेवटीं त्यानीं प्रश्न टाकलाच—

'का ? आज नाटक वगैरे काहीं दिसत नाहीं ? — राणीसरकार घराला कुलूप ठोकून गेल्या वाटते बाहेर ?'

मीं घड्याळाकडे पाहिलें. ३ वाजून ४० मिनिटें झालीं होतीं. मी तरी काय करणार ? माझ्याकडून होईल तितका प्रयत्न मीं केला होता. आणि तिला आताच कुठे बाहेर जायचें होतें राम जाणे. ह्या बायका कधीं म्हणून एखादें कार्य तडीस जाऊ देतील

'गजाभाऊ, माझ्याबरोबर नाटकाला येतोस का ?' हो, एवींतेवीं तिकिट फुकट जाणार, मग यालाच नेलेला काय वाईट ! घरीं येऊ दे— काढतों तिची एकदा. नाहीं तरी केव्हा तरी एकदा बोललेंच पाहिजे. नेहमीं नेहमीं हा काय फाजीलपणा !

'ऑ ! आणि तुझी राणी ?' राजाभाऊ छत्री सावरीत म्हणाला.

'राणी गेली चुलींत— तुला यायचें आहे कीं नाहीं ?' मी त्रासून म्हणालों.

गजाभाऊला बिचाऱ्याला यांतलें काहींच माहिती नसल्यामुळें तोंडाचा

'आ' वासून तो माझ्याकडे पाहू लागला.

तिकिटे काढलीं होतीं आणि तीं परत करणें बरोबर नाहीं म्हणूनच मी त्या दिवशीं गजाभाऊला घेऊन नाटकाला गेलों तरी एक तिकीट पडलेंच अंगावर.

शिशुपाल, रुक्मी, मारे घसा खरडूखरडून ओरडत होते— पण मला त्यांच्या बोलण्यांतलें एक अक्षरही कळले नाहीं रुक्मिणीनें नेहमींप्रमाणें 'स्वकुलतारक'ला टाळी घेतली मीही काहीं तरी करायचें म्हणून हातावर हात मारून मोकळा झालों गजाभाऊ रंगात आला होता.

'बापुराव, आज पिवडी बरीच फासलेली दिसते बरें का यानें ? पहा कसा पिवळा पडला आहे तो. पुरुषपार्टीला असलें शोभत नाहीं— काय ? अरे, यानें तर wrong entry केली कीं ! कमाल आहे बुवा या मराठी कंपन्याची. कशाचा कशाला मेळ नाहीं.'

माझ्याच डोक्यात कशाचा कशाला मेळ नव्हता, तर मी काय उत्तर देणार ?

गंधर्वाचें कोणतेंसे पद चालले होतें इतक्यात एका मुलाच्या रडण्याचा आवाज सुरू झाला. मीं आवाज तात्काळ ओळखला मीं मागे पाहिले तों सव्वादोनच्या रांगेत कावेरी मनोहराला गप्प करण्यात गर्क झालेली बरोबर गिरीशही होता, आणखी सरस्वतीबाई आणि तिचा पति माझ्याच्याने ते दृश्य पहावेना मीं गजाभाऊला फरफर ओढीतच दाराबाहेर काढलें. जोडा अस्ताव्यस्त, टोपी एका कानावर, हातात तपकिरीची डबी अशा स्थितींत मी त्याला बाहेर ओढताना साहजिक लोकाचे लक्ष आमच्या कडे वेधलें. मीं तिकडे दुर्लक्षच केलें कावेरीने मला पाहिलें कीं नाहीं मला माहीत नाहीं— गजाभाऊला मात्र यातलें काहीच समजेना

'अरे, अरे, अरे, अरे' करीत तो दरवाजाबाहेर तर आला. मी त्याला सांगावें कीं न सांगावे या विचारात पडलों पण काय हरकत आहे सांगायला ?

'माझी बायको' एवढेंच मी त्याच्या कानात ओरडलों.

'अस्सें, अस्सें, अस्सेंऽ अस्सें ! म्हणून घराला कुलूप होय तुझ्या ? अरे बाबा, यात विशेष तें काय आहे ? व्यवहार आहे हा !' गजाभाऊ एक चिमूट नाकात कोंबून म्हणाला.

'बोडक्याचा तुझ्या व्यवहार !' एवढेंच मी संतापानें म्हणालों.

गजाभाऊनें रात्रीं मला जेवायला रहाण्याचा आग्रह केला व मींही विशेष आढेवेढे न घेता जेवायचे कबूल केले कारण रात्रीं साडेदहा वाजे-पर्यंत करणार तरी काय ?

कावेरीच्या पाठोपाठ मी घरात शिरलो सुरुवात कशी करू ? का मारू एक तोंडात पहिल्या प्रथम ? पण गिरीशच्या देखत नको आमचे चिरंजीव तर झोपींच गेले होते कावेरीनें चूल पेटवलेली पाहिलें, तेव्हा मीं रागानेंच म्हटलें,

'आता चूल पेटवून बाराला जेवायला वाढणार आहेस वाटते ?'

ती कांहींच बोलली नाहीं तिनें चुलीवर पाणी मात्र ठेवलें

मींच सुरुवात केली, 'नाटक कसें काय झाले ?'

'भावजींना भूक लागली आहे भात चुलीवर टाकते ' हें उत्तर आलें.

'कावेरी, लाज वाटत नाहीं तुला ? माझी कल्पना नव्हती तू इतकी बेमुर्वतखोर बायको असशीलशी ! कुणाबरोबर नाटकाला गेली होतीस ? तुला माझी जरूर नव्हती ! मला जेवण वगैरे काहीं नव्हतें ? तुला जर माझ्याशीं संसार करण्याची इच्छा नव्हती तर घरात का नाहीं कुजून मेलीस ? वाटेल त्या लोकाबरोबर नाटकाला जाताना काहीं शरम तरी जिवाला !'

बधारा मोडून तोडून बेफाट वाहणाऱ्या महापुरातील लोंढ्यासारखा तिचा वाक्प्रवाह एकाएकीं सुरू झाला—

'हें—हेंच तें सदा 'मी' 'मी'. माझ्याकरता– माझ्याकरता दुसऱ्यानें मरावें ! माझ्याकरता दुसऱ्यानें मरावें ! माझ्याकरता बायकोनें गर्भारपण, बाळतपण यात मरावें. माझ्याकरता बायकोनें पोराचें लेढार पाळावें. माझ्या अब्रूकरता बायकोनें सदोदित घरात कुजून सडून मरावें. माझ्याकरता—माझ्याकरता ! तुम्हाला जर माझा कटाळा आला असेल तर ही मी तुमच्या-पुढें उभी आहें—घाला तें लाकूड माझ्या डोक्यात नी घ्या आपल्या नवरे-पणाचा हक्क गाजवून.' ती एवढें बोलून मटकन् खालीं बसली

काय करावें हेंच मला समजेना माझी कल्पना होती की मी बोललों तर ही मुकाट्यानें ऐकून घेईल. इथें तर चोरावर मोराचा प्रकार. 'व्यवहार आहे हा' म्हणून कानींकपाळीं कठशोष करणाऱ्या गजाभाऊची मला

आठवण झाली.

'कावेरी—मला हीं सोंगें कळतात बरें का ? रडून ओरडून कांगावा केलास तरी अपराध लपणें शक्य नाहीं. नाटकाला नेणारा जो हरीचा लाल तुला भेटला होता—जा, त्याच्याच घरीं राहीनास—'

'हां' म्हणून कावेरी रागानें उसळून म्हणाली. मी दचकून जरा मागें सरलों. 'बोललात तें बोललात—पुन्हा बोलू नका तसें. नाहीं तर मी काय करीन नी काय नाहीं याचा नेम नाहीं.'

आमच्या भांडणाचा प्रकार पाहून गिरीश मनात चरकला. तोही पण जरा वेळाने रडू लागला कावेरीने रागारागानें चुलींत पाणी ओतलें. गिरीशला थोडेंसें दूध पाजून निजवलें— आणि माझ्या खाण्यापिण्याची चौकशीही न करता— उपाशींच अथरुणावर जाऊन पडली. मीही पण कांहींच न बोलता बाहेर जाऊन पडलों

खरोखरच व्यवहार— संसार— इतका चमत्कारिक आहे का ? सुमारें चार महिने 'मागील पानावरून पुढें चालू'चाच प्रकार कायम होता. कावेरी संसारात मुळींच लक्ष घालीनाशी झाली. ह्यामुळे मनोहर नेहमीं कांहीं ना कांहीं तरी कारणानें आजारी असे त्या दिवशींच्या नाटकाच्या प्रकारामुळें मलाही एक प्रकारची दहशतच बसली. म्हणून मीही पण तिला लागेलसें बोलेनासा झालों. तरी पण मुलाच्या रडण्यामुळें मला कांहीं वेळा मध्यें बोलणें भाग पडे. मुकाट्यानें ऐकून घेण्याचा तिचा जणु काय कृतसंकल्पच होता फारच झालें म्हणजे दोन चार दुपट्यात गुंडाळलेलें मनोहरचें बोचकें माझ्यापुढें येऊन पडे. अशा प्रसंगातून सुटण्याचा माझा सोपा मार्ग म्हटला म्हणजे कोट टोपी चढवून गजाभाऊच्या घराचा रस्ता धरणें. नवीन लुगडीं घ्यायला झालीं होतीं पण तिनें होऊन कांहीं मला सांगितलें नाहीं.

मला वाटतें गजाभाऊच त्या दिवशीं सकाळीं Times चा अंक हातात घेऊन आला होता गजाभाऊचें राजकारण म्हणजे Times मधील सिनेमाच्या जाहिराती वाचण्यापलीकडे फारसें जात नव्हतें. 'या गजाभाऊ. केव्हाचा आहे हा Times ?' मीं विचारलें. कारण जुना का होईना पण हातात Times दिसलाच पाहिजे ह्या मताचा गजाभाऊ होता.

'आहे, आजचाच आहे. हें पाहिलें का ?'

इतक्यात कावेरी बाहेर आली. सांगायलासुद्धा लाज वाटते, पण कावेरी-चें लुगडें बोहारणीलासुद्धा देण्याइतकें धड नव्हतें. आणि हें कशाकरता? तर माझ्या मित्रादेखत माझी अब्रू काढण्याकरता. गजाभाऊंच्या लक्षात ही गोष्ट आली असावी. कारण, माझ्याकडे पाहून त्यानें जरा खिन्नपणानें मान हलवलेली माझ्या दृष्टींतून सुटली नाहीं दुसऱ्या दिवशीं मुकाट्यानें दोन लुगडीं आणून टाकलीं तरी तिचें एक नाहीं कीं दोन नाहीं.

कावेरीच्या धाकट्या बहिणीचें लग्न ठरल्याचें दादासाहेबांचें पत्र आलें होतें. आम्हा दोघानाही बोलावणें होतें पण झाल्या प्रकारानंतर तिच्या माहेरीं जाण्यास माझें मनच घेईना मी तर जाणार नव्हतोंच, पण कावेरी-लाही मी जाऊ देणार नव्हतों. मनुष्याच्या सहनशीलतेलाही एक ठराविक मर्यादा असतेच कीं नाहीं! एक वेळ वाटलें— जाईना ही पीडा! चार दिवस एकटी राहिली म्हणजे येईल आपोआप ताळ्यावर जाते कुठें? पण पुन्हा विचार केला कीं छेः! हिला तरी का अशी मोकळी सोडूं? तुझा हट्ट तर हा घे माझा हट्ट. काय वाटेल तें होऊ दे—प्रत्यक्ष तुझा जन्म-दाता आला तरी— 'कावेरी येत नाहीं, जा, फिर्याद लावा, जा' पत्र आल्याबरोबर मीं तें कावेरीच्या अंगावर फेकलें व मुद्दामच सिगारेट शिलगा-वून धुराचे लोटच्या लोट सोडू लागलों घर माझें आहे— जोंपर्यंत गोडींत होतीस तोंपर्यंत घेतलें तुझें ऐकून! आता घे. तुझ्यादेखत ही अशी सिगारेट फुकतों. कावेरीनें पत्र वाचून टेबलावर ठेवलें व कांहींच न बोलता सैंपाकघरचा रस्ता सुधारला. मी थक्कच झालों. काय बाई आहे कीं भूत आहे! कांहीं 'हो' नाहीं, 'नाहीं' नाहीं. मी जर हिच्या जागीं असतों तर नवऱ्याच्या पाया पडून माहेरीं धाडण्याविषयीं त्याच्यापाशीं तासभर रडत बसलों असतों. येथें रडणें तर दूरच राहिलें पण फुकाचें पहाणेंसुद्धा नाहीं माझ्याकडे! आश्चर्य आहे.

दादासाहेब आले. कामाची सबब सांगून माझी सुटका तर मीं करून घेतली.

'पहा बुवा, आईची इच्छा फार होती कीं तुम्हीहि पण लग्नाला यावें म्हणून. पण आता कामाचेंच म्हणता म्हणून नाइलाज आहे. बरें, सग-ळ्याच गोष्टी थोड्याच मनुष्याच्या मनाप्रमाणें घडून येतात! आहे आपला

गिरीश,— जावई नाहीं, जावयाचें पोरहि आहेच' म्हणून दादासाहेब आपल्याच कोटीबाजपणावर खूष होऊन मोठ्यानें हसले

'कावेरीहि येणार नाहीं म्हणते' मी हळूच म्हणालो

'अॅः! वेडी आहे ती अहो, ती पुष्कळ लाख म्हणेल— ती कोण— अन् तिला विचारतो कोण? बापुराव, इतकें बायकाच्या आवडीनावडीकडे पाहून चालेल कसें आपले?'

'अन् मीं कधी येणार नाहीं म्हणून म्हटलें आहे?' कावेरीच पुढें येऊन म्हणाली दादासाहेब जर तेथे नसते तर तिला हातातलें पुस्तक फेकून मारलेच असते

'अग वेडे, तुला विचारतो आहे कोण? माझें नी बापुरावाचें भाषण आहे ते तू आपली आत जाऊन वेणीफणी कर जा आली लगेच डोंबारणी-सारख्या झिपऱ्या घेऊन नमत्या भानगडींत चांभारचौकशी करण्याची सवय सोडून दे आता' दादासाहेब म्हणाले.

मी तडक घरात गेलो

'कावेरी—' मी ट्रंकेला लाथ मारून म्हणालों.

'कावेरी, या घरात माझ्या शब्दाला काहींच किंमत नाहीं का? मी सांगतो तू जाऊ नकोस'

'ते दादा बाहेर आहेत—त्याना सांगा' ती किंचित् हसून म्हणाली.

'काय माजवले आहेस तू हे?' मी रागानें म्हणालों

'मी माहेरीं जाणार' ती शान्तपणाने म्हणाली.

मला भान राहिलें नाहीं मी मागे पुढे न पहाता तिच्या तोंडात एक भडकावली. गाल लाल झाला तिचा झोंक गेला खांबाला टेकल्यामुळें खालीं मात्र पडली नाहीं मीं हे काय केलें? माझ्याकरता आपल्या नात्या-वर पाणी सोडलेल्या कावेरीला मीं गुरासारखें निर्दयतेनें मारले!

'मारा— आणखी मारा—तुमचें तरी समाधान होऊ द्या. या जन्मीं तरी तुमच्या हातात सापडले आहें. घ्या मारून" म्हणून रडत रडत कावेरी माझ्यापुढे उभी राहिली.

'तू नाहीं माझें ऐकणार?' मी म्हणालों

'मी माहेरीं जाणार' असें म्हणून तिने ट्रंक भरण्यास सुरुवात केली.

गिरीशचेही कपडे भरताना पाहून मी उसळून म्हणालो,

'गिरीशला मी जाऊ देईन अशी तुझी कल्पना असेल तर—'

'गिरीशभावजी मला सोडून रहाणे शक्य नाहीं' म्हणून पुन्हा कपडे भरणे चालू झालें.

'बरें आहे पहातों कसा जातो ते' म्हणून मी बाहेर पडलों.

ऑफिसला Sick-note धाडून देऊन मी घरींच राहिलों. सगळयाचीं जेवणींखाणीं उरकलीं. बारा वाजता स्टेशनवर जायला पाहिजे होतें. कारण दादासाहेब मद्रास फास्टनेंच जाणार होते मनातल्या मनात खूप जळफळलो शक्य तितक्या अडचणी पुढें केल्या. तरी 'त्या शेंबड्या पोरीचें तुम्हीं एवढे काय माजवलें आहे' हें दादासाहेबाचें पालुपद चालूच होतें. शेवटीं शेवटचा उपाय म्हणून अगदीं निघण्याच्या तयारींत असलेल्या कावेरीकडेच मी गेलो. दादासाहेब टांगा आणायला गेले होते सरस्वतीबाई ओंटी भरण्याच्या उद्योगात होत्या.

ओटी भरणें वगैरे झाल्यावर मीं रागानें म्हटलें,

'कावेरी, काय नवऱ्यानें तुझे घोडें मारलें आहे म्हणून त्याचा असा सूड उगवते आहेस ? तुला वाटेल तसें स्वतंत्र वागायला पाहिजे होतें तर माझ्याशीं लग्न तरी लावायला कशाला तयार झालीस ? कोणत्या कोणत्या गोष्टींत म्हणून माझ्या मर्जीप्रमाणे वागली आहेस? दोन्ही कुळाचा उद्धार होईल नाही अशानें?'

इतक्यात सरस्वतीबाई आल्यामुळें मला तोंड बंद करावें लागलें. मी मनातल्या मनांत जगातल्या साऱ्या स्त्रीजातीला शिव्याशापाची लाखोली वहात बाहेर जाऊन उभा राहिलों. गिरीश बूट वगैरे चढवून निघण्याच्या तयारींत होता. मीं त्याच्या डोक्यावरची टोपी हिसकावून दूर कोपऱ्यात भिरकावली. त्यानें भोकाड पसरलेलें पाहून कावेरी बाहेर आली.

'आता पुरे नाहीं का झालें ?' ती किंचित् कपटाने हसून म्हणाली.

'गिरीशला मी जाऊ देणार नाहीं. तुला कुठें मुलूखभर भटकायचें असेल तिकडे भटक.'

'बरोबरच आहे. आईबापाविना पोराला कुणींही कुबलून काढावें.' ती म्हणाली.

'कावेरी— गिरीशवर तरी माझा हक्क आहे ना ?' मी रागानें म्हणालों.

'कोण म्हणतें ? सासूबाईंनीं शेवटच्या वेळेला माझ्या ओटींत त्यांना घातलेलें आहे. तुमचा काहींएक संबंध नाहीं' म्हणून कोपऱ्यातील टोपी आणून पुन्हा त्याच्या डोक्यावर तिनें ठेवली. मी पुन्हा काहीं तरी बोलणार होतों, इतक्यात टांग्याचा आवाज झाला म्हणून गप्प राहिलों.

टांगा आला दादासाहेब ट्रंक टांग्यात टाकण्याच्या उद्योगात होते. मी शेवटचा उपाय म्हणून काकुळतीला येऊन म्हणालों, 'कावेरी, अजून तरी मागें घे.'

कावेरीनें काहींच न बोलता मनोहरला पाळण्यातून बाहेर काढले

'कावेरी— नवऱ्याला, घराला, दाराला लाथ मारून निघून जाते आहेस खरी, पण लक्षात ठेव परत यायच्या वेळेला मात्र नीट विचार करून परत ये. पोकळ दिसलें म्हणून कोपरानें खणू लागली आहेस— पण—'

'उगीच दुसऱ्याच्या देखत कशाला शोभा करून घेता ?' म्हणून आत आलेल्या सरस्वतीबाईकडे तिनें बोट दाखवलें मी मर्यादा झुगारून देऊन ओरडलों, 'हो चालती घराबाहेर— पुन: तोंड दाखवू नकोस मला '

कावेरी शान्तपणें गिरीशाचा हात धरून घराबाहेर पडली अजून जरी हिनें माघार घेतली तर ? अजून— अजून जरी ! नाहीं— टांगा गेला व मी कपाळाला हात लावून खुर्चीवर बसलों गजाभाऊ तपकिरीची चिमटी नाकांत कोंबीत आत आला.

'आता माझ्या लक्षात आलें— अलीकडे तू असें का वागत होतास तें ! अरे पण गृहस्था, असा त्रागा करून कसें चालेल ? व्यवहार आहे हा. व्यवहारात नवराबायकोचीं हीं अशीं कुलंगडीं नेहमींच उद्भवणार. त्यात कपाळाला हात लावण्यासारखें काय घडलें आहे ! तें आपलें 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते' म्हणतात ना— अ: ! ह्यात काहीं अर्थ नाहीं बघ. बायकाना मोकळ्या सोडून का कुठें कार्यभाग उरकतो आहे ? जाऊ दे रे ! त्यात काय आहे ? गेली बायको माहेरीं— जाऊ दे. मी तर म्हणतों चार दिवस आपल्याला वाटेल तसें वागायला मोकळीकच दिली तिनें. आता खुशाल नाटकें पहा, सिनेमा पहा— काय वाटेल तशी चैन कर. एका शब्दानें तुला कोणी विचारणार नाहीं.' गजानन अर्धवट आपल्याशी व अर्धवट माझ्याशीं बडबडत होता.

## व्यवहार आहे हा !

'गजाभाऊ, यापेक्षा लग्नच केलें नसतें तर!' मी एकदम म्हणालों.

'ऑ!' म्हणून गजाभाऊ माझ्याकडे पाहू लागला.

'गजाभाऊ, माझ्या संसाराचे असे धिंडवडे उडायला काय कारण?'

गजाभाऊ पुन्हा 'ऑं' करून स्वस्थ बसला.

'बोल— बोल, सद्गृहस्था— भावनेला बळी पडून बाईलवेड्या बनलेल्या बापूला लागेल तितकें बोलून घे.'

'आता असें कर बापुराव. परत घरात न घेण्याची धमकी तर देऊन पहा.' गजाभाऊ विचार करीत म्हणाला.

'खरें आहे.' मी म्हणालों.

बोलणें सोपें होतें.

व्यवहार— व्यवहार! खरेंच, कावेरीशीं अजिबात संबधच तोडून टाकला तर? घरातच घेतली नाहीं तर? पण मग लोक काय म्हणतील? तिचे आईबाप मला काय म्हणतील? आणि मग गिरीशची व्यवस्था काय? आणि मग यापुढील माझें आयुष्य असेंच जाणार का? कावेरी पुन्हा पहिल्यासारखी वागणे शक्य नाहीं. कारण संसारातील कोवळें ऊन केंव्हाच नाहींसें झालें होतें. Flesh is flesh ही जाणीव आता दोघानाही पूर्णपणें झाली होती. मग—? कावेरी, का केलेंस हें? तुझ्या संसाराबरोबर माझ्याही संसाराला तू उधळून लावू पहात आहेस! 'व्यवहार आहे हा!' गजाभाऊ पुटपुटत होता खरेंच, सुखावर निखारे ठेवणें हा व्यवहार होतो काय? मूल होण्याच्या आधींची कावेरी जन्मभर तशीच का राहू नये? माझी तरी दृष्टि का फिरावी? तोंडावर काळजीच्या, त्रासाच्या सुरकुत्या पडलेल्या बायकोला पाहून माझें मन तरी का बिथरावें? कीं मुळीं कावेरीच्या केतकीवर्णापुरतेंच माझें प्रेम होतें? इतका मी पागल असू शकेन का? का जगाचीच ही रीत आहे? Helen cried and Menelaus nagged कावेरीला मी घरात घेईन कीं नाहीं?— घेईन कीं नाहीं?

'व्यवहार आहे हा!' गजाभाऊ खिन्नपणें मान हलवून म्हणाला.

'आग लागो तुझ्या त्या व्यवहाराला!' म्हणून आश्चर्यानें स्तिमित झालेल्या गजाभाऊच्या तोंडावर भरलेल्या शाईची दौत मीं भिरकावली!

---

## वसंत (१)

इंग्लड आणि ऑस्ट्रेलिया याच्यात क्रिकेटचा कसोटीचा सामना चालू होता. मवध क्रीडामैदान नागपचमीच्या दिवशीं फुटणाऱ्या लाह्याप्रमाणें माणसानीं फुलून गेलें होतें जेथे जेथें म्हणून जागा सापडेल तेथें तेथें माणसें एकमेकाच्या अगावर रेलून हा अटीतटीचा सामना कौतुकानें न्याहाळून पहात होती इग्लडचा खेळ लौकरच सपुष्टात आला एवढे मोठे एक एक वीर, पण सर्वांत मिळून अवघ्या १५० धावासुद्धा झाल्या नाहींत आता ऑस्ट्रेलियाची पाळी आली. पॉन्स्फर्ड आणि मॅक्केब ही जोडी खेळू लागली दैवानें आज गमतच पहाण्याचें ठरविलें होतें कीं काय कोणास ठाऊक ! अवघ्या दहा धावात ही प्रसिद्ध जोडी फुटली नतर आपल्या बाजूची ही लाजीरवाणी घसरगुडी नेटानें थोपवून धरण्याकरिता आणि वेळ पडल्यास त्या अतिशय लाजऱ्या विजयदेवतेला पराक्रमानें खेचून आणण्याकरिता ब्रॅडमनची स्वारी मैदानात उतरली ब्रॅडमननें आपल्या लाड्या विजारीबाहेर लोंबणाऱ्या लगोटीच्या शेपटाला घाईघाईनें आत दडपले आपली तीन ठिकाणीं मोडलेली बॅट मोठ्या ऐटीनें सावरीत सावरीत तो निर्भयपणें आसमतात हेरून पाहू लागला

'चल आटप लौकर. ऊन लागतय आम्हाला.' इग्लडने गुरकावायला सुरुवात केली.

'आता का घाई ? तुझ्या वेळेला आम्हीं उन्हात मरावें आणि आमच्या वेळेला मात्र तुम्हाला ऊन लागतें काय ? आणि आता ब्रॅडमन खेळतो आहे. सभाळ.' ऑस्ट्रेलियानें समोरच्या प्रेक्षकाकडे पहात अभिमानानें म्हटलें. प्रेक्षकापैकीं एकानें आपलें शेपूट हालवलें आणि दुसऱ्यानें 'विठूऽऽऽ' असा आवाज काढला इतक्यात मॅव करीत येणाऱ्या आणखी एका नवीन प्रेक्षकाची भर पडली. ब्रॅडमन खेळतो आहे ही बातमी बाहेर पडली असावी. म्हणून प्रेक्षकसागराला भरती येण्यास सुरुवात झाली. ब्रॅडमननें पुन्हा एक-वार अभिमानानें प्रेक्षकसागराला पाहून घेतलें आणि इग्लडकडून येणाऱ्या

चेंडूची वाट पहात तो पवित्र्यात उभा राहिला.

इग्लडनें आपलें नाक सदऱ्याच्या बाहीने एकवार जोराने पुसलें, हातातला क्षयरोगी बुचाचा चेंडू घट्ट धरला आणि दातओठ खाऊन जोरानें भिरकावला.

आश्चर्याची गोष्ट ही कीं ऑस्ट्रेलियाच्या सुप्रसिद्ध ब्रॅडमनची दाडी उडाली प्रेक्षकात केवढा हाहाःकार झाला मॅव करणाऱ्या प्रेक्षकाकडे भूःभूःवाल्यानें दुरूनच टवकारून पाहिले आणि विठूने 'तू कोण रे?' हा नवीनच प्रश्न इग्लडला टाकला खुद्द ब्रॅडमन बुचकळ्यात पडला आणि इग्लडने धावत येऊन 'एहे रे ब्रॅडमन!' म्हणून त्याला खिजवायला सुरुवात केली. परतु तो ब्रॅडमनच पडला तो काय इग्लडला असा तसा दबणार होता? त्यानें उसळून म्हटलें,

'अरे हड्! ब्रॅडमन कधीं पहिल्या चेंडूला औट होत असतो काय? विचार, कोणालाहि विचार. आमचा भाऊ कॉलेजात आहे ना, त्याला विचार. तुझा चेंडू नो बॉल असला पाहिजे. तरी म्हटलें ब्रॅडमन पहिल्या चेंडूला कसा औट जाईल! अन् मग त्याला इग्लडशीं कोण खेळू देईल?'

इग्लडनें खूप जोरानें तक्रार केली परतु 'अस खाट खोट खेळायच असेल तर सकाळीं दिलेलीं आमचीं मोराचीं पिस टाक' हा धाक ब्रॅडमननें घातल्यावर इग्लड पुन्हा मुकाट्याने चेंडू टाकण्याचें काम करूं लागलें. मोराचीं पिसे गमवायला इग्लड केव्हाही तयार झालें नसतें.

आता मात्र ब्रॅडमनची बॅट तलवारीप्रमाणे तळपू लागली आणि ब्रॅडमनचा हा खेळ पहाण्याचें भाग्य ज्या प्रेक्षकाना लाभलें असेल ते खरोखरीच धन्य होत. इतका तुफान खेळणारा ब्रॅडमन जगानें कधींच पाहिला नसेल! कचरा ठेवण्याच्या फुटक्या बादलीला चेंडूनें कितीतरी वेळा ढुशण्या दिल्या असतील एकदा तर प्रेक्षकवर्गात चेंडू पडल्यावर प्रेक्षकवर्गानें एकमुखानें फोडलेला टाहो ऐकून वरून कोणींतरी पोक्त बाईनें 'हलके रे वसत' म्हणून सावधगिरीची सूचना दिली आणि एकदा शेजारच्या बगल्यातल्या व्हराड्यात ज्ञानेश्वरी वाचीत पहुडलेल्या निरुद्योगी पेन्शनरानें 'काय कार्टी आहेत शिंचीं!' म्हणून त्रासिकपणानें पुटपुटत त्याच्याकडे झापडें लावलेल्या टाग्याच्या घोड्याप्रमाणें चष्म्याच्या भिंगातून रोखून पाहिले. परतु

कर्तबगार माणसें लोकाची स्तुति आणि निंदा समान समजतात आणि आपल्या कर्तव्यात चुकत नाहींत या नियमानें इग्लड आणि ऑस्ट्रेलिया यानीं आपला सामना निश्चितपणानें पुढें चालू ठेवला.

'एकदा दाडी उडाली, तिनदा कॅच उडाला आणि म्हणे मी ब्रॅडमन ! तोंड पहा ब्रॅडमनच ! इग्लडची सनानत कुरबूर मधून मधून चाललीच होती.

'हे पहा वामन्या, तुला कुरकूर करायची असेल तर खेळ बद करू. माझीं पिसें दे. म्हणे एकदा दाडी उडाली नो बॉल टाकूनच कीं नाहीं ? मग ह्यापेक्षा ब्रॅडमनला लिमलेट देण्याकरता म्हणून हलकेच व्हेरिटीनें त्याच्याकडे जावें आणि त्याचें लक्ष नाहीं असें पाहून चटकन् हातातला चेंडू स्टंपला लावावा अन् म्हणावें ब्रॅडमन औट वा रे वा ! आणि कॅचची बात तरी आहे का आपल्या बगल्यात ? तशी बात असती तर मीं कॅच उडवलाच नसता.' ब्रॅडमन पुन्हा बॅट परजीत म्हणाला. वामन्याला पूर्ण-पणें ठाऊक होतें कीं वादामध्यें मूळ मुद्दा सोडून आपलेंच म्हणणें आरडा-ओरड करून सिद्ध करण्याची वसतला खोडच होती तेव्हा वसत कबूल होईतोंपर्यंत त्याला खेळू देण्याशिवाय दुसरा कोणताच मार्ग दिसत नव्हता. त्यामुळें चेंडू कसे तरी टाकण्यास त्यानें सुरुवात केली आणि ज्या कर्माला ते दोघेही भीत असत ती गोष्ट नेमकी घडून आली.

एक लोंबता चेंडू वामननें टाकला आणि वसताला मोह आवरेनासा झाला. दात ओंठ खाऊन वसतानें तो चेंडू जोरानें उचलला आणि निमि-षार्धांत समोरच्या व्हराड्यातून अयाऽऽई अशी किंकाळी हवेंत दुमदुमली. वसतनें वामनकडे पाहिलें वामननें वसताकडे पाहिलें. आणि दोघानीं मिळून समोरच्या व्हराड्यातून एका हातानें डोकें दाबीत उठणाऱ्या ज्ञानेश्वरमाऊली-कडे भयभीत नजरेनें पाहिलें. विजेच्या वेगानें त्या दोन मुलानीं झटकन् काहीं तरी बेत केला. चामडी बचावणें हा सुद्धा पराक्रमाचा एक भाग आहे हें आजवर त्या दोघाना कित्येक वेळा अनुभवानें पटलें होतें. त्याच अनुभवाला गुरु करून प्रेक्षकवर्गाकडे एकवारही न पाहता त्यानीं बगल्या-च्या मागच्या बाजूस धूम ठोकली

'काय मस्तवाल कार्टी आहेत ! याच तुझ्या बापाला—' इत्यादि धमका-वणीचे शब्द धावता धावता वसताच्या कानावर आले. शत्रूपासून दूर

गेल्यावर दोघानींही सुटकेचा श्वास टाकला. वामन निर्धास्त होता, कारण तो पलीकडच्या रस्त्यावर असलेल्या बगल्यात रहात होता पण वसताची मात्र थोडीफार घाबरगुडी उडाली. आज सध्याकाळी नाना ऑफिसातून आल्यावर आपल्यापुढें कसलें ताट वाढून ठेवलें जाईल याची त्याला कल्पना सुद्धा करवेना तरीपण कोणत्याही परिस्थितींत मनुष्य आपल्या कृत्याचे बरेंवाईट समर्थन कसे करू लागतो हें पाहणे मोठे मौजेचे असतें.

'इतका काहीं चेडू जोरात लागत नाहीं, आम्ही तर कितीदा चेडू झेलतों, पण आम्ही नाहीं बुवा असें भिञ्या भागूबाईसारखें ओरडत. आणि वामन, मीं चेडू किती हलके मारला होता तू पाहिलेंस ना? पण या म्हाताऱ्या लोकाना मुलाच्या वाटेस जाण्याशिवाय दुसरे काहीं सुचतच नाहीं कीं काय कुणास ठाऊक! हा शकरराव म्हातारा, तशीच आमची ती सगुणा आत्या. दोघेहीजणें जशीं काहीं माझ्या पाठीमागे वाघासारखीं लागतात'

आणखी वसताचे हें गुऱ्हाळ कितीतरी लाबलें असतें. परतु वामननें आपला चेंडू परत मिळवून देण्याविषयीं आग्रह दर्शविला, आणि वसताला वाक्ताडन करायला नवीनच कारण मिळालें.

'हो! आता तुला तुझा चेंडू आठवणार! आमच्या पाठीचे इकडे चेडू झाले तरी तुम्हाला आपले चेडू आठवतात. आणि असल्या लोकाना आम्हीं आपले मित्र म्हणावे, त्याना मोराचीं पिसें द्यावीं.' वसता चिडून म्हणाला.

'हे पहा, पिसाच्याविषयीं तू आता एक शब्द बोललास तर आपला विचार बघ. हवींत कुणाला तीं पिसें? मोराचीं आहेत का डुकराचीं आहेत कुणास ठाऊक.' वामन तितक्याच सतापाने उद्गारला.

'यव रे पठ्ठे! डुकराना कधीं पिसे असतात वाटतें?' वसता हेटाळणीच्या सुरात हसून म्हणाला.

'का नसावींत? आपल्या देशातल्या डुकराना स्वराज्य मिळालें नाहीं म्हणून इग्लडमधल्या डुकराना पिसे असतात का नसतात हे तू पाहायला गेला होतास?' वामन आवेशाने शिरा ताणताणून बोलत होता.

शेवटीं या मुद्याचा निकाल त्यानीं आपल्या नेहमींच्या पद्धतीनें लावून घेण्यास सुरुवात केली. दोघेही सारख्याच वयाचे, सारख्याच आकाराचे असल्यामुळें कधीं वसत वर तर कधीं वामन वर हा क्रम चालू झाला.

रस्त्याच्या कडेनें जाणारा एक अहिंसाप्रिय देशभक्त या दोन मुलांची चाल-लेली धिंगामस्ती पाहून मध्यें पडला. त्यानें त्याना बाजूस केलें, आणि आपसात भाडणें करण्यामुळें देशाचें फार नुकसान होतें तेव्हा आपण सर्व एक होऊन आपली शक्ति देशाच्या शत्रूशीं लढण्याकरताच राखून ठेवावी हा फुकट सल्ला त्यानें त्याना दिला. वसताला आणि वामनला दोघानाही भाडणाचा कटाळा आला होता परतु माघार कोणीं घ्यायची हा अब्रूचा प्रश्न उपस्थित झाल्यामुळे त्याचा नाइलाज झाला होता आता हें देश-भक्ताचें म्हणणें पटल्यासारखें दाखवून दोघेही शान्तपणें दूर झाले देशभक्त दूर गेल्यावर वसातानें हसून वामनकडे पाहिलें

'पण आपल्या देशाचा शत्रु कोण ?' वामन चिंतातुर होऊन म्हणाला.

'हें बघ, सध्या आपल्याला घरांतच इतके शत्रु आहेत कीं त्यातून जगून-वांचून आपण मोठे झालों तर बाहेरचा शत्रु ! आज सध्याकाळीं माझी धडगत नाहीं. शकरराव चहाडी केल्याशिवाय राहणार नाहींत. आणि मग— हरे राम !' माराच्या नुसत्या कल्पनेनें वसत थरारल्यासारखें करून म्हणाला.

'लोकाला भित्री भागूबाई म्हणतोस आणि आता ?' वामन त्याच्या-कडे पाहून म्हणाला

'कोण ? मी भितों आहें ? अरे हॅट् ! माराची भीति कुणाला ? भित्र्या भागूबाईंना ! मला वाईट एवढेंच वाटतें कीं मुलाला मारलें तर आईला वाईट वाटतें हें नानाच्या लक्षातसुद्धा येत नाहीं आणि खुशाल मेलेल्या बोकडाला मारल्याप्रमाणें मला मारीत सुटतात आईबद्दल मला वाईट वाटतें." वसत सहानुभूतीच्या सुरात म्हणला.

'अस्सें !' वामन अर्थपूर्ण नजरेनें त्याच्याकडे पाहून म्हणाला.

'काय ? काय म्हणालास ?' वसतानें मुठी वळून म्हटलें.

'कुठे काय म्हणालों ? एखादी गोष्ट बरोबर समजली तर 'अस्स' सुद्धा म्हणू नये वाटतें ?' वामनच्या या सवालाला वसतानें काहींच उत्तर केलें नाहीं. आणि त्या दिवशीं इग्लड व ऑस्ट्रेलिया याच्यातला तो कसोटीचा सामना अनिर्णितच राहिला !

* * * *

सध्याकाळीं आता बाहेर रहाणें शक्य नाहीं इतका उशीर करून वसंता

बमल्याच्या मागच्या दरवाज्यानें आत शिरला. आणि जणु काय सबंध दिवसभर आपण घरातच आहोत अशा थाटानें, न्हाणीघरात आरशासमोर उभी राहून आपल्या केसाना पाण्याचा हात लावून कुरळे करण्याच्या प्रयत्नात गुतलेल्या आपल्या बहिणीला तो दादागिरीच्या अवसानानें म्हणाला, 'काय ग बेबी, आता आलीस वाटतें शाळेतून!'

एरवीं बेबीने त्याला चागलाच झाडला असता, पण आता कोणाला न कळता तिची ही सौंदर्यप्रसाधना चालू होती, त्यामुळें पकडलेल्या चोराप्रमाणे ती स्तब्धच राहिली. वसत तोंडाचा चबू करून 'सुनो सुनो'ची चाल शीळ घालून गुणगुणत घरात शिरला

'रात्रीची शिटी वाजवू नकोस.' माडीवरून भाऊ त्याच्यावर खेकसला. उत्तराऐवजीं वसतानें दुसऱ्या एका गाण्याला सुरवात जारानें सुरवात केली. परतु पुढच्या माडींतून वडिलाचा व आईच्या बोलण्याचा आवाज ऐकू आल्यावर त्यानें चेहरा निर्विकार केला मौज ही कीं आपल्याला गभीर चेहरा करता येतो अशी वसताची एक आवडती कल्पना होती मग 'हवीरे खवीस'मधल्या खलनायकालाही मागे टाकील असा चेहरा म्हणजे गभीर चेहरा अशी त्याची कल्पना असल्यास नाम जाणे वडिलाच्या आवाजावरून अजून ठिणगी पडली नसावी असा त्यानें तर्क केला आणि नशिबाला कौल लावून घेण्याच्या इराद्याने त्याने पुढच्या माडींत आपल्या नेहमींच्या गभीर चेहऱ्यानें पाऊल टाकलें. वडिलानीं त्याच्याकडे पाहिल्या न पाहिल्यासारखेंच केले. उलट 'आली का ब्याद' अशा त्रासिक मुद्रेने त्याच्याकडे दुर्लक्षच केलें वसताला हा शुभशकुनच होता. वडिलानीं प्रेमानें जवळ बोलावणें म्हणजे खिशात बॉबगोळा लपवून कशाची तरी लालूच दाखवणाऱ्या शत्रुपक्षाप्रमाणेंच होय हा त्याचा जुना अनुभव होता. बाबाना आपले हे सर्वांत कनिष्ठ चिरजीव म्हणजे ॐकाराप्रमाणें एक अगम्य कोडेंच होतें. या कोड्याला त्यानीं कधींच सोडविण्याचा प्रयत्न केला नाहीं. दैवावर विश्वास ठेवून ते वसताच्या बाबतींत पूर्ण उदासीन असत. फक्त अति झालें म्हणजे मग ते त्याला अत्यत शान्तपणें एकीकडे बोलावीत आणि—! पुन्हा पुढचा प्रसग येईपर्यंत आपल्याला फक्त दोनच मुलें आहेत एवढेंच लक्षात ठेवीत. आज वसताचा तो भेसूर चेहरा पाहिल्यावर त्यानीं कपाळाला

आठी घालून दुसरीकडे पाहिले. पण आईला सर्वांत लहान मूलच जास्त आवडतें त्यातल्या त्यात सर्वांनीं हिडीस फिडीस केल्यामुळें त्या माउलीला हूड वसंताविषयीं जास्तच माया वाटे आता तिचे लक्ष त्याच्याकडे वेधलें.

'वसंत, असें वेड्यासारखे तोंड करू नये' ती प्रेमळपणानें म्हणाली

'वेड्यासारखें? वा! गंभीर आहे माझा चेहरा.' वसंताने पायाने स्टुलाला लाथाडीत म्हटले.

'ते मला ठाऊक आहे पण आता जरा बाहेर जा पाहू! मोठीं माणसें कांहीं बोलत असलीं कीं मुलांनीं तेथें बसून ऐकू नये आणि स्टूल नीट उभं कर पाहू!' वसंताची आई आर्जवाच्या सुरात म्हणाली आई म्हणजे वसंताचा बालेकिल्ला होता आणि त्यातून दुपारचा चेंडूचा प्रसंग नानाच्या कानावर गेलेला दिसत नसल्यामुळे वसंत तूर्त तरी निर्धास्त होता तो काय इतक्या सहजासहजीं बाहेर जाईल!

'पण मला इथें बसायचें आहे' वसंताने कोचावर लोळण्याच्या तयारींत बसून म्हटले.

'हे पहा, बाहेर मुकाट्याने जातोस कीं—' बर्फाप्रमाणें थंडगार वाणीने उच्चारलेले नानाचे शब्द ऐकून वसंत कुरकुरत बाहेर जाण्याकरता उठला.

'काय त्रास आहे! इथेंच बसू नकोस, तिथेंच बसू नकोस. माणसांनीं घरांत बसू नये तर घरें तरी कशाला बांधतात कुणास ठाऊक. रानातच राहावें म्हणजे पैसे तरी वाचतील.' आणखी वसंताला पुष्कळच बोलता आले असतें आणि बोललाही असता परंतु वडिलांनीं चिडून अंगावर भिरकावलेली खुर्चीवरची उशी डोक्यावर आदळल्यामुळे त्यानें बाहेर पळ काढला पण असा पराजय कबूल करणे त्याच्या स्वभावाला धरून नव्हतें दरवाज्याबाहेर उभा राहून त्याने दृष्टि आकाशातील ताऱ्याकडे लावली व कान आतील बाजूस लावून ठेविले.

'आज सकाळीं ऑफिसमध्ये पत्र आलें. काय करावें आता? इंग्रजी पहिलींत माझ्या वर्गांत होता या जुन्या हक्कावर तो दहा पंधरा दिवस दिवाळीची सुट्टी आपल्याकडे काढणार आहे म्हणतो. आहे कीं नाहीं मनुष्य!' नाना म्हणत होते.

'अन् आपले काय बेत ठरले होते ? यदा बनूमावशीच्या गावीं दिवाळी चालवायची म्हणून आपण किती आनंदात होतो !' त्याची आई खिन्नपणानें सुस्कारा टाकून म्हणाली.

'असे केले तर ? आपण तो येण्याच्या आधीच पसार झालो तर ?' नाना उल्लसित आवाजाने म्हणत होते

'असे कसे करून चालेल ? आपण संसारी माणसे आहोंत. चार लोक आपल्याला काय म्हणतील ? संसारी लोकांनीं असें मनातसुद्धा आणू नये. त्यातून बेबीची सहामाही परीक्षा आटपली पाहिजे वसंताचा अभ्यास मला करून घेतला पाहिजे ' आईचे म्हणणें त्याने एकले

'वसंताचा अभ्यास ? हू !' जन्मदात्या वडिलांचे हे वाक्य ऐकून वसंता आपल्याशीच हसला

'काहीं करू नये मी म्हणते येत आहेत, येऊ द्या चार दिवस झाल्यावर जातील आपोआप पाहुण्यांना नका येऊ असे कधीं म्हणू नये. एखाद वेळेस परमेश्वर अतिथीच्या रूपाने सत्त्व पाहण्यास येत असतो, नाहीं कसें म्हणावें ?' गृहलक्ष्मीच्या या भिनतोड भाषणावर वडिलांनीं 'परमेश्वर !' म्हणून एकवार तुच्छतेने म्हटल्याचे त्याने ऐकले. आणि याच वेळीं ता मुकाट्यान दूर झाला असता तर किती भिनचोभाट हा आडून ऐकण्याचा प्रकार घडला असता ! पण वसंताची भाग्यरेषा जीवनरेषेशीं काटकोनात होती कीं काय कुणास ठाऊक ! याच वेळीं मॅव करीत मांजर त्याच्याकडे येऊ लागले आणि मांजराला शेपटी धरून ओढायचे नाहीं तर त्याला देवानें शेपटी दिली तरी कशाला या विचाराने वसंतानें त्या मांजराला जवळ ओढले मांजराने फिस् करीत त्याला बोचकारलें. वसंत मोठ्याने ओरडला. नाना बाहेर धावतच आले मांजरावर सूड घेण्याचा आपला विचार उद्यावर ढकलून वसंताने बेबीच्या खोलीकडे धाव घेतली. 'आडून ऐकत असेल कार्टा ' वडिलांचे रागाचे शब्द त्याने धावताना ऐकले

मात्र आजच्या शंकररावाच्या तक्रारीपासून आपले संरक्षण कसे करून घेता येईल याचा बेत वसंताने कायम करून टाकला.

* * * *

दिवाळीच्या आधीं सुमारें आठ दिवस पाहुणे एके दिवशीं सकाळीं सूर्य-

नारायणाच्यारि आधीं अकस्मात् बंगल्यासमोर प्रकट झाले. गेले आठ दिवस वसताला दुसरें तिसरें कांहीं सुचत नव्हतें पाहुण्याच्याविषयीं त्यानें काय काय पूर्वकल्पनाचें जाळें आपल्या मनाशीं विणून ठेवलें होतें ! इंग्रजी पल्टिलींतली ओळख हें त्यानें ऐकल्यापासून एकवार त्याच्या मनात विचार आला कीं आपणही इंग्रजी पहिलींतच आहोत तेव्हा आपल्याप्रमाणेंच लाडी विजार, डोक्याला काळी टोपी, स्काउटचा खाकी सदरा अशा पोपाकाने गुरफट-लेली आपल्यासारखीच ही व्यक्ति असावी आईपाशीं त्यानें आपला हा तर्क बोलून दाखवला होता परंतु आईने 'अगदीं वेडा आहेस झालें' असे हसून म्हणण्यापेक्षा जास्त माहिती पुरविली नसल्याकारणानें पुन्हा त्याचें डोकें नाना तऱ्हेच्या कल्पना करण्यात गुंग होऊन गेले. शेवटीं जर या नवीन माणसाला सहा बोटें असतील किंवा जर त्याचा हात तुटका असेल किंवा असाच एखादा चमत्कारिक प्रकार त्याच्याजवळ असेल तर शाळेंतल्या मुलांना एक पैसा दराने ह्याचे दर्शन घडवावें व वामनच्या जप्त झालेल्या चेंडूचे बदली नवीन कोरा करकरीत चेंडू विकत घ्यावा हे त्यानें मनाशीं पक्कें करून टाकलें चेंडू विकत घेण्याबाबत मात्र त्याला फार विचार करावा लागला. कारण पैसे मिळाल्यावर चेंडू विकत घेण्यापेक्षा त्या पैशाने कोपऱ्यावरच्या वाण्याच्या दुकानातून बरणींतले पेपरमिंट कितीतरी विकत घेता यईल हा विचार दूर करणें त्याला फार जड गेलें परंतु वामनचा तगादा फार लाग-लेला असल्यामुळे व 'माणसाला खाण्यापिण्यापलीकडे कांहीं तरी उच्च असते' या वर्गशिक्षकाच्या नेहमींच्या उपदेशानें भारून जाऊन त्यानें चेंडूच घेण्याचे ठरवून टाकले वाईट वाटलें त्याला पण वर्गशिक्षक त्याचे लाड करणारे होते आणि वामन रोज त्याला विचारीत होता, तेव्हा त्याचा नाइलाज झाला.

पण टांग्यातून उतरणारी ती सामान्य व्यक्ति बंगल्याच्या गच्चीवरून पाहताक्षणींच वसताच्या हातातून पोपटाचा पिंजरा गळून पडला त्याचें अवसान सुटलें असल्या माणसाचें प्रदर्शन भरवणें म्हणजे उघड उघड मुलाचें शत्रुत्व पत्करण्यासारखें होणार होतें. वसताने त्या गृहस्थाला दुरून नीट लक्षपूर्वक पाहिलें, परंतु समाधानाला तिळभरही जागा नव्हती. अगदीं जगातल्या कुठल्याही इतर माणसाप्रमाणेंच हाही एक मनुष्यच

होता, त्याच्यात काहीं उणें नव्हतें आणि काहीं अधिक नव्हते. वसंताच्या मनात वडिलाविषयीं एक तिरस्काराची छटा उत्पन्न झाली. असल्या साध्या माणसाला भिणारे आपले नाना— काय, म्हणावें तरी काय याना? आणि नेहमींच्या 'त्या साहेबाला असा बोललों, त्या हेडक्लार्कला असा झाडला, त्या इंजीनिअरला असा ठणकावला' इत्यादि सिंहाच्या आरोळ्या फुसक्याच तर मग! ह्यापेक्षा आपण टिपू सुलतानाचा मुलगा झालों असतो तर!

खिन्नपणानें त्यानें पोपटाचा पिंजरा उचलला आणि जागच्या जाग्यावर अडकवून ठेवला. पाहुण्याच्यामधील त्याचें औत्सुक्य पार ओसरून गेलें होतें. तो जड पावलानीं पुढच्या माडींत शिरला. वडील आणि पाहुणे बोलत असलेले त्यानें पाहिलें. त्याचे वडील तोंडभर हसत म्हणत होते, 'अरे वा! दिगंबर, तू तर अगदीं महाराष्ट्राचा जवाहरलालच दिसू लागला आहेस. हा तुझा लांब सदरा, हें तुझें धोतर. और प्राणी आहेस बाबा! लहानपणच्या तुझ्या मरतमढ्यासारख्या चेहऱ्यावरून तू इतका अस्सल देशभक्त होशील याची कल्पनासुद्धा करता आली नसती'

'बाबा, ही देशाची निःसीम सेवा आहे गोळाभर पिंडाकरता कुत्र्या-प्रमाणें दुसऱ्याच्या लाथा खात बसण्यापेक्षा हा देशसेवेचा उज्ज्वल मार्ग पत्करला आहे' दिगंबरपंत आढ्याकडे पहात म्हणाले.

'आणि लग्न वगैरे काहीं केलें नाहींस का? एखाद्या कपिलेचा उद्धार वगैरे?' नाना कोपऱ्यात बसलेल्या वसंताला ऐकू जाऊ नये अशा बेतानें हलक्या आवाजात म्हणाले पण वसंतानें स्पष्टपणें ऐकलेंच.

'आमच्या पिताजींनीं तीहि बेडी घातली हाती आमच्या पायात. पण देशसेवेच्या उज्ज्वल व्रतापुढें बायकोचें सुख मीं कस्पटासमान मानलें. सध्या तीन चार वर्षें ती गुजरायेतल्या कोणत्या तरी आश्रमात आहे. आणि मी सर्वसंगपरित्याग करून रामदासाप्रमाणें गावोगाव हिंडून लोकजागृति करीत आहे.' दिगंबरपंत अभिमानानें छाती फुगवीत म्हणाले. पाहुण्याचें प्रत्येक वाक्य समजण्याकरता वसंता धडपडत होता. बरेंचसें त्याला तर्कानें समजून घेणें भाग पडे.

'अन् दुपारीं बाराची वेळ कशी निभते?' नानानीं हसून विचारलें.

'किती व्यवहारी मनुष्य आहेस रे तू! देशाकरता ज्यानें फकिरी बाणा

पत्करला त्यानें आपल्या चरितार्थांची काळजी कधींच करू नये. लोकांना त्याची काळजी असते 'आज पहिले बाजीराव आपल्यात असते तर—' माझें वक्तृत्वपूर्ण भाषण तू ऐकलेंस कीं असले आचरटासारखे प्रश्न विचारावेसे तुला कधींच वाटणार नाहींत. आज गेलीं पाच सहा वर्षे या विषयावर मीं महाराष्ट्राचा कोनाकोपरा हादरून सोडला आहे आता माझी काळजी महाराष्ट्राला आहे देशाला आहे—I am now, so to say, a public person' असे म्हणून दिगंबरानें बंगला हादरण्यासारखें हास्य केलें इतक्यात हसता हसता त्याचें लक्ष कोपऱ्यावरच्या खुर्चीवर बसून आपणाकडे टक लावून पहात असलेल्या एका विक्षिप्त चेहऱ्याकडे वेधलें. वसंतानें उसनें हास्य तोंडावर आणून सलामी दिली

'छोकरा कीं काय तुझा? अगदीं तुझ्यासारखाच चेहरा!' दिगंबर पुढें सरकून म्हणाले नानांना हा उघड पेंच होता त्यांनीं वसंतास हातानें बाहेर जाण्याविषयीं खुणावले पण वसंत जागचा हालला नाहीं उलट त्याने पाहुण्याकडे पाहून आपलें उसनें हास्य चालूच ठेवले पाहुण्याच्या देखत वडील आपल्याला काहीं करणार नाहींत ही त्याला खात्री होती.

'बरं, आणखी किती हिंदुस्थानच्या सख्येंत भर टाकलीस?' दिगंबरनें हसून विचारले

'एक मुलगा कॉलेजात आहे, एक मुलगी इथल्या हुजूरपागेंत आहे, आणि तिसरे हे नूतन मराठींत आहेत' नानांनीं सगळी हकीकत जाजम झटकल्याच्या आविर्भावाने सांगून टाकली पाहुण्यानें वसंताकडे निरखून पाहिले, कारण त्याच्या चर्येत काहीं तरी लपलेले असावे असा त्याला बारीक सशय आला होता. परंतु कितीही निरखून पाहिलें तरी वसंताचा चेहरा क्षणोक्षणीं रंग पालटणारा वर्षाऋतूतील ढग नव्हता काय असेल तें असो, 'थोरला बाजीराव' या विषयावर आज पाच सहा वर्षे तेच तेच शब्द, त्याच त्याच वाक्याची मालगाडी, तेच तेच कोटिक्रम यांनीं श्रोतृवृंदाला घायाळ करून सोडणाऱ्या या देशभक्ताला या एका यःकश्चित् पोराच्या टक लावून पाहण्यामुळें कसेसेंच वाटू लागलें. काहीं तरी भास असेल या विचारानें त्यानें पुन्हा एकवार त्याच्याकडे पाहिलें व अत्यंत प्रेमळपणाचा आव आणून तो म्हणाला, 'काय रे बाळ, काय पहातोस रे गुलामा?''

'तुमच्या टोपीवर काळें काय आहे तें पहात होतो एकदा वाटलें झुरळ असेल ' वसंता आवंढा गिळून म्हणाला झुरळ म्हटल्याबरोबर दिगंबरनें ताडकन उडी मारली, टोपी झटकन दूर भिरकावून दिली आणि परागंदा होणाऱ्या झुरळाकरतां घाबऱ्या घाबऱ्या नजरेने इतस्तत पाहिलें. झुरळ नव्हतेंच तर दिसणार कोठून? नानांनीं चिरंजीव उभे असलेल्या जागेकडे जळत्या डोळयानें पाहिलें पण वसंता त्याच वेळीं मागच्या दारीं बेबीला ही गमत सांगत पोट धरून हसत होता

* * *

दुपारीं जेवणाचे वेळीं दिगंबरपंताचे आसेतुहिमाचल भाषण झालें. भारतमातेच्या फाटक्या वस्त्राआडून डोकावू पाहणाऱ्या अब्रूचे धिंडवडे बघून त्यांना आज बाजीराव दि फर्स्ट, बाळाजी विश्वनाथ, थोरले माधव-राव इत्यादि थोर पुरुष स्वर्गात आपणास काय म्हणत असतील याचें राहून राहून वाईट वाटत होतें त्याच वेळीं समोर पानावर बसून जेवणाऱ्या वसंताची बावळी मुद्रा त्यांच्या नजरेंतून सुटू शकली नाहीं वसंतानें कधीं नव्हते तें आज करून दाखविलें आज पानावर वाढलेले लिंबू यानें पिळण्याचा सपाटा चालवला होता आणि दर खेपेस ती लिंबाची फोड नेमकी दिगंबरपंताच्या बाजूने उडी घेई नाना दटावीत होतेच, परंतु जेव्हा वसंतानें 'त्याला मी काय करूं? ही फोडच वाईट आहे, सारखी सारखी उडते' इत्यादि तऱ्हेचे वक्तृत्व पाजळायला सुरवात केली तेव्हा त्यांनीं 'गप बैस' ह्या दोन अक्षरावरच त्याला सोडून देण्याचे ठरविलें. दिगंबर-पंतानीं सर्वप्रकारें संतोष व्यक्त केला आपल्या या जुन्या दोस्ताला अडीचशें रुपये पगार मिळतो, त्याचा स्वतःचा बंगला आहे, एकदरींत त्याचें बरें चालले आहे हे ऐकून समाधान वाटल्याचें त्यांनीं जाहीरपणें कबूल केलें, आणि भारताच्याकरतां होणाऱ्या आपल्या जिवाच्या यातना घटकाभर बाजूला ठेवून, इतरचे अत्यंत जरूरीचे कार्यक्रम निग्रही मनाने लांबणीवर टाकून एक महिनाभर आपण आपल्या दोस्ताच्या तैनातींत राहणार अस-ल्याचें त्यांनीं सांगून टाकलें वसंताच्या हातातली बटाट्याची फोड नेमकी पाहुण्याच्या पानात उडाली. नानांना ठसका लागला आणि आतल्या बाजूस उलथणे पडल्याचा आवाज आला. बेबी आणि भाऊ एकमेकाकडे

अर्थपूर्ण नजरेनें पाहू लागलीं दिगबरपतानीं उदार मनानें वसताच्या फोडीला क्षमा केली आणि डाव्या हातानें पानाबाहेर काढून ठेविली. नाना कांहींच बोलले नाहींत.

'दुसऱ्याच्या उपयोगीं पडणें हा तर माझा धर्म होऊन बसला आहे. एखादा कोपिष्ट दुर्वास असता तर उष्टी फोड पानात पडल्याबरोबर ताडकन् उठून उभा राहिला असता आणि पुन्हा प्राण गेला तरी त्या बगल्याच्या आसपास फिरकला नसता पण माझें तसें नाहीं मला त्यातून लहान मुलें म्हणजे गोपालकृष्णाप्रमाणे वाटतात आणि मौज ही कीं कितीही रुसलेलें मूल असू दे मीं साद घालायचा अवकाश कीं आईचे स्तन सोडून धावत येईल' दिगबरपत वसताकडे पाहण्याचे टाळून म्हणत होते

'कांहीं कांहीं लोकाना जमते तें.' कांहीं तरी बोललेंच पाहिजे म्हणून नाना शुष्क मुद्रेनें म्हणाले

'तर होऽऽ! आत्मप्रौढी वाटेल तुम्हाला, पण मुबईला ती मालवीय-जींची कोटातली प्रसिद्ध अडवणूक! ही थाप लागलेली लोकाची. तासन् तास माणसें देवद्वारीं जशीं कांहीं उभीं राहलीं होतीं. त्यात लेकुरवाळ्या होत्या त्याच्या लेकराना मीं सभाळले परत नेण्याकारिता आया आल्या तर लेकरानीं मला सोडून देण्याचें साफ नाकारलें बोला आता.' म्हणून म्हणत दिगबरपतानीं आपा।ण घेतली.

दिवसभर वसता बाहेर बाहेरच होता मधून मधून दिगबरपताशीं एखादें वाक्य बोलण्याकरता तो आत येई तेवढाच काय तो. जो तो आप-आपल्या विचारात गर्क असल्यामुळें त्याच्या उद्योगाकडे तुच्छतेनें पाहण्या-पलीकडे जास्त लक्ष कोणींच दिलें नाहीं मात्र नाना त्याच्याकडे पाहून कपाळाला आठी घालीत नव्हते रात्रीं योगायोग असा कीं पाहुण्याचा बिछाना वसताच्या आणि बेबीच्या खोलींत टाकण्यात आला व बेबीला दुसऱ्या खोलींत जावें लागलें. रात्रीचीं जेवणींखाणीं झाल्यावर वसतानें तडक आपल्या खोलीचा रस्ता धरला त्याच्या आईनें आश्चर्य दर्शविताच 'याच्या वाटेस जाऊ नकोस' म्हणून नानानीं मोठ्या प्रेमळपणानें तिला बजावलें. दिगबरपतानीं देशाची सद्य:स्थिति आणि कोणाचें काय चुकतें हें सप्रमाण सिद्ध करून दिल्यानतर रात्रीं दहाचे सुमारास दाखविलेल्या

खोलींत झोपेकरिता पाऊल टाकिलें. वसताची मूर्ति दिव्याकडे गभीर मुद्रेने पहात बसलेली पहाताक्षणींच त्याच्या काळजानें ठाव सोडला वरकरणी चद्रबळ आणून त्यानीं त्याच्या अभ्यासाविषयीं चौकशी केली. त्याच्याशीं थट्टा करण्याचाही प्रकार करून पाहिला परतु वसत एकदाही हसला नाहीं शेवटीं लवकर निजण्याचें त्याला महत्त्व पटविण्यास त्यानीं प्रारभ केला 'पहा पक्षीसुद्धा लवकर निजतात आणि लवकर उठतात–' 'म्हणजे मी काहीं पक्षी नाहीं' हे वसताचें सडेतोड उत्तर ऐकून त्यानीं त्याच्या हजरजबाबीपणाचें कौतुक करून वेळ मारून नेली काय असेल तें असो, या मुलाच्या सहवासात आपल्याला तितकेंसें मनमोकळें वागता येणार नाहीं हा त्याच्या मनाचा ठाम ग्रह झाला. मोकळ्या हवेंत पडण्याविषयीं त्यानीं चुळबूळ आरभली. परतु घुशी, माजरें आणि विंचू गच्चीवर नेहमीं जमत असतात या वसताच्या अभिनव माहितीवरून त्यानीं तो बेत रहित केला. घड्याळात अकराचे ठोके पडले बाहेरचे दिवे अधारात लपले. परतु वसताच्या खोलींतला दिवा आज हट्टानें जागत होता आणि वसतानें एक पुस्तक घेऊन वाचायला सुरवात केली. दिगबरपत निष्काळजीपणाचा आव आणून 'झोपतों रे बुवा !' म्हणून म्हणत निद्रादेवीची आराधना करू लागले, एक–दोन–तीन– आली–आली– ! इतक्यात 'स्पिरिटमध्यें दोन दिवस बुडवून ठेवलेल्या पानास आयोडीन लावलें तर काय होईल ?' हा प्रश्न कोण्यातरी राक्षसानें त्याच्या कानात ओरडून विचारल्याचा त्याना भास झाला त्यानीं तारवटलेल्या डोळ्यानीं वसताकडे पाहिलें. वसतानें आपला प्रश्न पुन्हा विचारला. दिगबरपतानीं काहींतरी उडवाउडवीचें उत्तर दिलें वसतानें आपण होऊन उत्तर केलें, 'पानाचा क्लोरोफिल नाहींसा होईल आणि आयोडिन लावल्यानें तीं निळीं होतील.'

'मग मला कशाला विचारलेंस ?' किंचित् आश्चर्यानें आणि किंचित् त्रासून दिगबरपत म्हणाले.

'पाहिलें तुम्हाला लहानपणचें आठवतें आहे कीं नाहीं तें.' वसतानें शान्तपणें उत्तर दिलें. बाहेरच्या घड्याळातून थोड्याफार फरकानें पडलेले बाराचे ठोके दोघाच्याहि कानावर आले.

दिगबरपतानीं त्याला निजण्याचा उपदेश करून पुन्हा त्याच्याकडे पाठ

वळविली पुन्हा पूर्वाचाच प्रकार घडला या खेपेचा वसताचा प्रश्न प्राणिशास्त्रातला होता 'काचेच्या भाड्यात झुरळें पकडून ठेवलीं व झाकण बद करून व्हॅसलीन लावून ठेवलें तर काय होईल ?' ह्या प्रश्नाचें उत्तर रात्रीं एकच्या सुमाराम कोणता देशभक्त शान्तपणें देऊ शकेल ? वसताने याही प्रश्नाचे आपणच उत्तर दिलें, आणि अभिमानानें पुढील माहिती पुरविली– 'आणि तीं तशीं मरू नयेत म्हणून मीं त्याना काड्याच्या पेटींत घालून ठेवीत असतो" ही माहिती ऐकताच दिगबरपताची उरलीसुरली झोप पार उडाली त्याचे डोळे चुरचुरत होते परतु ही नवीन माहिती भयकरच होती. वसतानें पुराव्यादाखल मोडक्या छत्तीस काड्याच्या पेट्या आपल्या कपाटातून काढून दाखविल्या आणि मौज अशी कीं हीं सर्वाचीं झाकणे त्याने काढली आणि लावावयाचीं तो विसरला खोलीभर झुरळाची फलटण सैरावैरा पळू लागली सुमारे अर्ध्या तासानतर खोली झुरळरहित करण्याचा प्रयत्न करून घामाघूम झालेले दिगबरपत, आता तरी झोप मिळेल या विचारानें, पुन. एकवार गादीवर पहुडले त्याना आता शका येऊ लागली हा पारगा वेडा तर नसावा ? सकाळीं आल्यापासून ते त्याचे वर्तन पहात होत त्याची खात्रीच झाली त्याना स्वप्न पडू लागले एका वेड्याने त्याच्या छातीवर पाय देऊन त्याच्या नाकाला चावल्याचें ते दृश्य पहात होते ते दचकून जागे झाले खरो खरीच वसता त्याच्या नाकाला धरून ओढीत होता त्याच्या आश्चर्यकारक मुद्रेकडे पाहून 'डास बसला होता तुमच्या नाकावर. ज्या ठिकाणीं डासाने आपली सोड रोवली असेल त्या ठिकाणीं तो मलेरियाचे जतु टाकीत असतो असे आमचे मास्तर सागत होते. तेव्हा लगेच जर ती जागा पिळून टाकली तर—' वसतानें गभीर मुद्रेनें उत्तर केलें तीनचे ठोके पडले

आता मात्र दिगबरपत सतापले परतु लोकाच्या घरात त्याच्याच मुलाला मारणार तरी कसें ? आपण कितीहि सागितलें तरी कोण ऐकून घेईल ? त्यातून आपण सहनशीलतेचा आणि वात्सल्याचा डागोरा पिटवून बसलों आहोंत ! त्यानी सर्व धैर्य एकवटून एकवार भस्म करून टाकणाऱ्या एखाद्या ऋषीच्या लाल डोळ्यानीं त्याच्याकडे पाहिलें. वसतानें

डोळ्याची पापणीसुद्धा हलवली नाहीं. रात्रीं चार वाजता 'नव्या पुला-जवळच्या पाण्याचे नळ पुणे शहरात घेतले तर काय होईल?' हा प्रश्न वसंताला फार मनोरंजक वाटला. साडेचार वाजता 'आज जर नारायणराव पेशवे हयात असते तर—' या प्रश्नाबद्दल वसंताने उत्सुकता दाखविली व शेवटीं पहाटे पांच वाजता 'मला आमचीं सगळीं माणसें वेडा म्हणतात ते बरोबर आहे का?' हा प्रश्न वसंतानें टाकला. दिगंबरपंतांचें सर्व अंग थरथरत होतें. रात्रभर डोळ्याला डोळा नाहीं, आणि त्यातून या वेड्याशीं प्रसंग! रागारागाने त्यांनीं गादीची वळकटी करून ठेवली व थरथरणाऱ्या हातानें त्यांनीं एक चिठ्ठी खरडली त्या चिठ्ठींत पुढीलप्रमाणें लिहिलेले होतें— 'अत्यंत जरूरीच्या कामाची आठवण झाल्याकारणाने निरोपहि न घेता जावें लागत आहे राग नसावा. मद्रास सदर्न मराठ्याच्या सहाच्या एक्सप्रेसने बंगलोरास जात आहें. जाताना कदाचित् उतरेन म्हणतों परंतु नक्की आजच कांहीं सांगता येत नाहीं. राग नसावा' इतकं लिहून वडिलांना सकाळीं चिठ्ठी देण्याविषयीं वसंताला दरडावून सांगत ते जे बाहेर पडले ते कायमचे!

* * *

सकाळीं नऊ वाजले तरी पाहुण्याची किंवा वसंताची कांहींच हालचाल दिसून न आल्याकारणानें नाना घाईघाईनें वसंताच्या खोलींत शिरले वसंत गाढ झोपीं गेला होता. खिडकींतून उन्हाचा कवडसा त्याच्या तोंडावर पडला होता. आणि एका हातांत चिठ्ठी दिसत होती नानांनीं ती चिठ्ठी हलकेच काढून घेतली व वाचली त्यांना काय वाटलें कोण जाणे, खिडकीचें झडप त्यांनीं हलकेच लावून घेतलें आणि पाय न वाजविता ते बाहेर पडले.

दुपारीं वसंताला आश्चर्याचा एक नवीन झटका मिळावयाचा होता शेजारच्या बंगल्यातले शंकरराव आणि नाना जेवणें झाल्यावर कांहीं बोलत असलेलें त्याने दुरून पाहिलें. परंतु शंकरराव आणि नाना मोठमोठ्याने हसत असलेले पाहून त्याला आश्चर्यच वाटलें. तक्रारी करणारा मनुष्य इतक्या सलगीनें कधींच बोलत नसतो हें त्याला आजपर्यंतच्या शेंकडों अनुभवांनीं कळून चुकलें होतें.

संध्याकाळीं नाना पत्नीला कांहींतरी सांगत असताना वसंतानें आपल्या नेहमींच्या राजमार्गानें– म्हणजे आडून– ऐकलें. नाना सांगत होते–

'कांहीं म्हण, पण वसंताची बहादुरी केव्हां केव्हां फार फायद्याची असते बघ. हा दिगंबर त्यानें काय करून हाकलला त्याचें तोच जाणे. त्याला विचारूं नकोस हं. नाहीं तर तो चढून जायचा. अग, हा दिगंबर आपल्या शेजारच्या शंकररावाचा मेहुणा, बहिणीचा नवरा. त्याला काल सकाळीं त्यांनीं आपल्या बंगल्यातून पाहिला मात्र आणि घराबाहेर म्हणून सबंध दिवसांत बाहेर तोंड केलें नाहीं. दिगंबरनें त्यांना पाहिलें असतें कीं त्यांना मुंगळ्यासारख्या जाऊन डसला असता. त्याला माहीत नव्हतें म्हणून, नाहीं तर शंकररावाची कंबक्तीच! मला तरी काय माहिती! वसंताचा चेंडू त्याच्या बागेंत पडला होता तो परत करण्याकरतां म्हणून स्वारी आली. मला वाटतें, पहांटे साडेपांच वाजतां त्याला टांग्यातून पळतांना त्यांनीं पाहिलें असावें.'

त्या दिवशीं संध्याकाळीं वसंताला वडिलांनीं हाक मारून मोठ्या प्रेमानें दिवाळीचे फटाकडे आणण्याकरतां दोन रुपये बहाल केले. आईनेंही रात्रीं दोन करंज्या त्याला आग्रहानें वाढल्या!

जेवण झाल्यावर आनंदातिशयानें वसंतानें आपल्या शक्यतोंवर भसाड्या आवाजांत 'जमुनाजळीं खेळूं' इत्यादि गाणें घोळघोळून म्हणण्यास सुरवात केली. आईनें व नानांनीं कानांत घातलेलीं बोटें त्यानें खाद्यावरून हलकेंच पाहिलीं. परंतु तो जोरांत म्हणत होता—

'कां लाजतां– आतां कां लाजतां—'

उद्यां आपली अर्धवट राहिलेली इंग्लंड व ऑस्ट्रेलियाची मॅच पूर्ण करण्याचा त्यानें निश्चय केला.



# घराण्याची प्रतिष्ठा !

कु सरोज बी ए च्या परीक्षेत शेंकडा सत्तर पूर्णांक पाच दशांश (७० ५) मार्क मिळवून पास झाली पंडिताच्या घराण्याचा यशोदुदुंभि साऱ्या जगभर टाइम्सच्या बातमीदारानें पसरविला रावबहादूर पंडिताना स्वर्ग दोन बोटें न उरता स्वर्गच आता त्याना नकोसा झाला होता ! स्वर्गांतल्या देवगंधर्वांना इंग्रजी भाषा समजणें अशक्य. त्यामुळें टाइम्स पत्र तेथे कसें मिळणार ? आणि तेथें आपल्या लाडक्या कन्येचें नाव जाड्या अक्षरात कोण छापणार ? छेः ! स्वर्गापेक्षा पृथ्वीच त्याना शतपटीनें बरी वाटत होती.

रा. पंडितानीं आपल्या कन्येजवळ सहजच म्हटलें होतें— 'माझ्या छोन्या (म्हणजे सरोजचें लाडकें टोपणनाव) शेंकडा जितके मार्क मिळवील तितक्याच रुपयाची मी गोविंदजी वसनजीला पेढ्याची तयारी ठेवण्यास सांगेन. 'फिश्' करून हसायला काय झालें ? बघ तर खरें—' आणि बोलण्याबरहुकुम खरोखरीच दुसरे दिवशीं तांबड्या हिरव्या कागदानें गुंडाळलेल्या सत्तर रुपये आठ आणे किंमतीच्या पेढ्याच्या करड्या सरोजकडे 'बी.ए झालीस अं !' अशा कौतुकाच्या थाटानें पाहू लागल्या !

एकवार करडयाकडे आणि एकवार सरोजकडे पाहून पंडित आपल्या जाकिटाच्या दोन्ही खिशात दोन्ही हाताचे अंगठे अडकवून मोठ्यानें हसले. सरोजला काय बोलावें हें न सुचल्यामुळें ती कांहींच बोलली नाहीं. शून्य दृष्टीनें तिनें करडयाकडे पाहिलें. दारात रमेश उभा होता, आणि त्याच्याच शेजारीं सरोजची आई उभी होती.

नेपोलियन बोनापार्टच्या अवसानानें त्या तिघा व्यक्तींना उद्देशून रा. पंडित बोलूं लागले, 'आजचा दिवस पंडिताच्या घराण्याच्या इतिहासांत सोनेरी शाईनें लिहिला जाईल. आज, सोमवार तारीख अमुक अमुक, साल अमुक अमुक रोजीं, पंडिताच्या घराण्यात जन्मलेल्या पंडिता सरोज नांवाच्या कुमारिकेनें आपल्या घराण्याचें नाव, आपल्या घराण्याची प्रतिष्ठा २९ हजार

फुटाहून उच्च असलेल्या उत्तुंग गौरीशंकरापेक्षा उच्च वाढवून साऱ्या जगाचे डोळे दिपवून टाकले आहेत. बेटा सरोज– माझ्या छोनूताई– शक्य असतें तर तिन्ही जगाचे स्वामित्व तुला आज मीं मोठ्या प्रेमानें बहाल केलें असतें हिंदुस्थानातील स्त्रीजात प्रसंगविशेषीं कशी उच्चतम पदावर सहज लीलेनें आरूढ होऊं शकते याची तू मूर्तिमंत साक्ष आहेस. तुझ्या शिक्षणाच्या मार्गांत मला लोकानीं किती भेवडावून सोडलें ! तुझ्या काकानें तर माझ्या घरीं येणेंसुद्धा वर्ज केलें सरोज किती चिकाटीनें आणि किती धैर्यानें मीं तुला शिकविण्याचा माझा बेत तडीस नेला हें तू प्रत्यक्षच पाहते आहेस ’

हें लांबलचक भाषण करून पंडितानीं ओलाव्याकरिता म्हणून आपली जीभ ओठावरून हलकेच फिरविली सरोजच्या मातुःश्रीचे डोळे मोठे पहाण्यालायक होते. आपण कोण आहोंत, शेजारीं कोण उभा आहे वगैरे सर्व गोष्टी विसरून ती माता डोळ्यातून अश्रूंचा पाऊस पाडू लागली पदरानें डोळे पुशात सरोजची आई एकवार नाक वर ओढून पण हसत म्हणाली, ‘आता एकदा सरूच लगीन– पुढचे शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडलेच नाहींत कीं रावबहादुराच्या अफाट हास्यात विलीन पावले हें समजणें कठीण हास्याचा पूर ओसरल्यावर पंडित म्हणाले– ‘तुपात घाला किंवा साखरेंत घोळा, कारलें आपला गुण सोडीत नाहीं सुशिक्षित रावबहादुराच्या पुण्या-मुंबईच्या बायका असोत किंवा बार्शी सोलापूरकडच्या अर्धशिक्षित नागर-गट्ट्याच्या बायका असोत ‘पोरीचं लगीन’ हें वेड सोडीत नाहींत लवकर लग्न करून घेऊन स्वतःच नाक कापून घेणाऱ्या या धिंडका आपल्याच सारखे लोकाचे कधीं होईल याची वाट पहात असतात ’

‘पण मी म्हणते–’ सरोजची आई म्हणाली.

‘काय म्हणता आजीबाई तुम्ही ?’ रावबहादुर त्याना वेडावीत म्हणाले.

‘मी काहीं म्हणत नाहीं फक्त सागून ठेवते कीं हें चागलें नाहीं कोणतीही गोष्ट अति करण्यानें हातात मातीच येईल. आज पोरीला बावी-सावें वर्ष लागलें. मीं आजपर्यंत आपलें सहन करून घेतलें, पण आता माझ्याच्यानें राहवत नाहीं म्हणून सागतें. झालें हें शिक्षण पुरे झालें. आता सरूला–’ सरूची आई म्हणाली.

‘आता सरूला कण्वमुनीप्रमाणें एखाद्या दुष्यन्ताच्या घरीं पोहोंचवा.

पुढच्या वर्षी तिला बाळतपणाला घरीं आणा. चार दोन वर्षांत चार दोन कार्टी तिच्या कमरेवर शोभू द्या– अन् मग आमच्या आजीबाई खूष ! बस्स ! आता मी सागतों तें ऐक. पुढच्या वर्षी सरू इग्लडला जाणार आहे मी तिची इग्लडची सर्व तयारी करणार आहें. देवानें आपल्याला सरोज ही मुलगी दिली नसून मुलीप्रमाणें दिसणारा एक मुलगाच दिलेला आहे समजलीस ? रावबहादुर पडिताची सरोज इग्लडहून शिकून आल्याशिवाय मला केव्हाही समाधान वाटणार नाहीं. सरोजच्या अलौकिक गुणाचें चीज करायचें, तिला पुष्कळ शिकवून आपल्या घराण्याचें नाव वाढवायचें, हा इतका दिवस उरापोटाशीं बाळगलेला माझा आवडता बेत मलाआचरट कण्वासारखें भलतेंच करायला सागून आजवर मीं केलेल्या खटपटीला नाट लावायला सागतेस ? म्हणे लगीन करा ! त्यापेक्षां चिता तयार करायला का सागत नाहींस ?' रावबहादुर म्हणाले.

बिचाऱ्या माउलीनें डोळ्याला पदर लावला आणि एक अस्फुटसा हुदका दिला. सरोज पटकन आपल्या आईजवळ गेली आणि तिची समजावणी करूं लागली.

हा प्रसग काहीं नवीन न्हता. दरवर्षी लग्नाच्या मोसमाच्या आगेंमागें हे प्रसग चारपाच वेळां येत असत. त्या वेळीं रावबहादुराच्या वक्तृत्वाला पूर येई आणि त्या पुरात घरच्या आणि बाहेरच्या माणसाना गटगळ्या खाण्याची पाळी येई. आणि असा एखादा मोठा पूर आला कीं 'रिलीफ फड' म्हणून सरोजची आई आश्रयाला ठेवलेल्या आपल्या बहिणीच्या मुलाचा– रमेशचा– आधार घेई आणि त्याला सर्व जन्मकथा उर्फ कपाळकटकट सागत बसे. रमेशहि निर्विकार मनानें जणू काय ही हकीकत आपल्याला आताच नव्यानें समजते आहे अशा मुद्रेनें ऐकून घेई. अलीकडे दोन वर्षं हे प्रसंग गधर्वांच्या स्वयंवराप्रमाणें पडिताच्या कुटुबात 'पेटट' होऊन बसले होते. मात्र मौजेची गोष्ट ही कीं पूर्वी लग्न म्हणताच विंचू चावल्याप्रमाणें अकाडताडव करून आईला मोडून काढू पाहणारी सरोज अलीकडे मात्र तटस्थ राष्ट्र बनू पाहत होती.

आजचा प्रसग मात्र विशेष रंगला होता. कारण नेहमीं तटस्थ वृत्ति धारण करणारा रमेश हळूच बोलण्याचें धाडस करून म्हणाला, 'बाबासाहेब,

मला वाटतें सरूचें एवढें शिक्षण पुरे झालें.'

'काय वाटतें तें ऐकण्याची जोंपर्यंत मीं इच्छा दाखवली नाहीं तोंपर्यंत तूं गप्प बसायला काय घेशील ?' रावसाहेबांनीं उत्तर केलें.

'बाबा—' सरोजनें वर मान करून पाहिलें.

'काय ?' पडितांनीं अतिशय लाडिकपणाच्या दृष्टीनें तिच्याकडे पाहत म्हटलें.

जरा वेळ कोणी काहींच बोललें नाहीं. सरोजनें मान खालीं घातली. ती काहींच बोलली नाहीं मात्र तिच्या अवनत दृष्टींत काय काय भरलें होतें हें जर पडिताना त्याच वेळीं दिसलें असतें तर—!

* * *

पडिताच्या घरण्यात इग्लडला जाऊन आलेली पहिली स्त्री म्हणून टाइम्समार्फत दिगत कीर्ति फडकविण्याकरता कुमारी सरोज दिवाळीनतर हिंदुस्थान सोडणार हें निश्चित झालें होतें— म्हणजे रावबहादुरानीं निश्चित केलें होतें आणि त्याचप्रमाणें त्यानीं सर्व व्यवस्थाही करून टाकली होती. कुठलासा एक व्हायटिंगसाहेब इग्लडात होता, त्याच्या घरींच सरोजच्या राहण्याची वगैरे सर्व सोय करण्यात आली होती. सुमारें एक महिन्यानें सरोज बोटीवर पाऊल ठेवणार होती. जो तो आपआपल्या परीनें त्या दिवसाची मार्गप्रतीक्षा करीत होता.

हें सर्व ठरविण्यात रावबहादुराना कोण त्रास पडला ! पहिला धोंडा म्हणजे सरोजची 'येडपट' आई, परतु हा धोंडा वाक्बाणांच्या चार दोन प्रहारात त्यानीं फोडून टाकला होता. दुसरा धोंडा सरोजचा 'आगलाव्या' काका. त्या गद्धयाला कसें कळलें राम जाणे ! एके दिवशीं सकाळीं मद्रास मेलनें बैलोबा आला कीं डुरकाळ्या फोडीत ! त्याचीं शिंगें (मतें) बाजूला सारता सारता वडिलाना नाकींनऊ आले.

परतु सर्वांत मोठी अडचण म्हणजे सरोजचें आकस्मिक दुखणें. आज जाईल उद्या जाईल करता करता पोरीनें सकाळींच गादी अथरली. डॉक्टर आणण्याची भाषा सुरू झाली कीं 'छे ! मीं आजारी नाहीं न् काहीं नाहीं. उगीचच कशाला डॉक्टर आणि वैद्य ?' म्हणून सरोजनें हसण्यावारी न्यावें.

'उद्या बोटीनें सरोज इग्लडला जाणार'— आदल्या दिवशीं सध्याकाळीं

रावबहादुर आपल्या प्रशस्त दिवाणखान्यात एका प्रशस्त खुर्चीवर, प्रशस्त-पणें रेलून जणूं काय भोंवतालीं माणसेंच नाहींत अशा भावनेनें आढया-कडे पाहत म्हणाले परंतु आपण काहींही मानलें तरी माणसाचें अस्तित्व काहीं नाहींसें होऊं शकत नाहीं.

'शक्य नाहीं.' शेजारच्या तक्क्यावर रेलून बसलेल्या काकानें आढ्याला उत्तर केलें.

'जगात अशक्य असें काहींच नाहीं.' रावबहादुर (नेपोलियन) म्हणाले.

'जगात पुष्कळच अशक्य असतें परंतु माणसाची दृष्टि एकाच गोष्टी-कडे पाहू लागली कीं आजूबाजूच्या गोष्टी म्हणजे हातचा मळ वाटतात.' काका म्हणाला.

काकाचा स्वर जरा चमत्कारिक होता रावबहादुरांनीं त्याच्याकडे एक-वार रोखून पाहिलें.

'तुझ्याशीं वाद खेळायला मी केव्हांही हटणार नाहीं ध्यानात ठेव.' ते म्हणाले.

'फारच छान ! बैलाची टक्कर पाह्यला तमासगीर पुष्कळच गोळा होतील.' काका किंचित् हसून म्हणाला.

पंडित आपल्याशींच म्हणाले—

'स्वार्थी जात ! म्हणे मनू म्हणतो ! बायका त्या बायकाच ! वा रे वीर ! आणि त्याचा तू शिरोमणी ! आर्य-स्त्री-जातीच्या सामर्थ्याची अजून ओळख न पटलेल्या मूर्खांनो, तुम्हाला बायका इंग्लंडला जाऊं लागल्या कीं—' वाक्य अपुरेंच राहिलें. सरोजच आपल्या खोलींतून बाहेर आली होती. तिचे काळेभोर केस दिव्याच्या प्रकाशात चमकत होते दुखण्यानें डोळे वास्तविक निस्तेज व्हावयास पाहिजे होते परंतु ते जास्त चमकत होते. मात्र भेदरलेल्या हरणीप्रमाणें तिची दृष्टि चंचल बनली होती. 'बाबा' म्हणून तिनें कातर स्वरात हाक मारली काका पटकन् उठून तिच्याजवळ गेला.

'सरू, तूं कशाला इकडे आलीस ?' तिच्या हाताला धरून तिला जवळच्या एका खुर्चीवर बसवीत तो म्हणाला.

'बाबा, तुमची मीं निराशा केली ! आईऽऽ आ—' म्हणून म्हणत

सरोजनें गुडघ्यात मान घातली. सरोजची आई ताबडतोब तिच्याजवळ जाऊन बसली कोपऱ्यात खुर्चीवर बसलेला रमेश दिव्याची वात निरखून पाहू लागला. रावबहादुराना हें कोडें उलगडणें शक्य नव्हतें. मात्र सरोजचा हुदका ऐकून ते लगेच तिच्याजवळ आले.

'बर वाटत नाहीं का तुला? अजून बर वाटत नसेल तर उद्या नको, पुढची बोट धरू आपण' तिचें समाधान करण्याकरिता म्हणून ते म्हणाले.

'दादा, तुम्हाला मीं सांगितल ना मघाशीं कीं इंग्लंडला जाण अशक्य आहे? होऊ नये त्या गोष्टी चुकून झालेल्या आहेत, आता उगीच निरर्थक वाद घालायला मला लावू नका' काका म्हणाला.

'म्हणजे?' हा प्रश्न रावबहादुरदंपतीनें बरोबरच टाकला रमेश दिव्याची वात जास्त बारकाईनें पाहू लागला सरोजला मात्र आणखी एक हुदका आला. बराच वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं दिवा शान्त तेवत होता. बाहेर येणाऱ्याजाणाऱ्या मोटारींचा आणि ट्रामगाड्यांचा नित्याचा गोंगाट चालू होता. घरात मात्र सर्वत्र शान्त होतें घड्याळात आठाचे ठोके पडले.

बऱ्याच वेळानें सरोजनें आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांनीं मातेकडे पाहिलें.

'कशाला ग मला जन्म दिलास?' सरोज ओक्साबोक्सीं रडू लागली

मातेनें उत्तर करण्याऐवजीं कन्येला आपल्या पोटाशीं घट्ट धरून ठेवले. रावबहादुराना थोडासा उलगडा पडू लागला होता, परतु त्यांचें मन त्यावर विश्वास ठेवण्यास मुळींच तयार नव्हतें.

'म्हणजे? सरोज, आज तुला झालय् तरी काय?' त्याच्या आवाजात क्रुद्धतेची थोडीशी बारीक झांक होती

'दादा, उगाच तिला या वेळीं त्रास देऊ नका. मी तुम्हांला पुन्हा केव्हा तरी—' काका म्हणाला.

परतु रावबहादुराचा चेहरा पराकाष्ठेचा लाल झाला.

'तू– तू कांहीं तरी तिच्या मनात भरवल आहेस. सांग मला काय झाल तें.' काकाला उद्देशून रावबहादुर ओरडले.

'मी तुम्हाला आता कांहीं एक सांगणार नाहीं. तिच्या आईला सर्व कांहीं कळून चुकल आहे. तुम्ही ओरडण जरा कमी कराल तर बर होईल.' काका शान्तपणें म्हणाला.

'ओरडणार ! सारा गाव गोळा करीन ! माझ्या या घरात आगंतुका-सारखा येऊन चोंबडेपणान मला दटावण्या दाखवतोस ! चामार कुठला !' रावबहादुर जास्तच ओरडून म्हणाले.

'दादा, उगाच आपल्या आईबापाला का चामार बनवता ? मला शिवी देऊन त्यात तुमच्याच अंगावर चिखल उडणार आहे.' काका म्हणाला.

रावबहादुर आणि काका यांचा चांगलाच लढा रंगला असता परंतु जिच्यामुळें हें सर्व उद्भवलें ती सरोजच दोघामध्यें जाऊन उभी राहिली.

'बाबा, काकांना सांगणं जड जात असल तर मी स्वतः सांगतें. आजपर्यंत मीं चोरून ठेवलं पण पापाला वाचा फुटल्याखेरीज कशी राहील !'

रावबहादुराच्या डोळ्यापुढें एकच दिवा होता, परंतु सर्व गाव पेटल्या-सारखें त्यांना दिसू लागलें. ते मटकन खालीं बसले. 'चांडाळणी, काय केलस हें !' म्हणून म्हणत त्यांनीं कपाळाला हात लावला. सरोजची आई तर मोठ्यानें रडू लागली.

बराच वेळ पुन्हा शान्ततेचें साम्राज्य !

'कार्टे, हें काय केलस अं ! तुला इतक्या प्रेमानं आणि आस्थेनं वाढ-वली त्याचं हे फळ ! त्यापेक्षा जन्मल्याबरोबरच मेली नाहींस ! जा, माझ्या घरातून चालती हो. आजपासून मी तुझा कोणी नाहीं आणि तू मला मेलीस. ज्याच्या नादानं तुला हे ढंग सुचले त्याच्याच घरीं जा ' राव-बहादुर संतापानें आणि निराशेच्या दुःखानें इतके बेभान झाले होते कीं एरवींचा विवेक त्यांना आज पारखा झाला होता. पोटच्या पोरीला ज्या प्रेमानें त्यांनीं आजवर पोसलें होतें तिच्या दंडाला धरून त्यांनीं दरवाज्या-कडे खेचलें. सरोजची आई— ! पण तिच्याकडे ह्या वेळीं कोण पाहणार !

'दादा, काय हें ! सोडा तिचा हात. तुम्ही तिला कुणाच्या घरीं जायला सांगता ! रमेश आपल्या घरात राहत असतो हें तुम्ही विसरला का !' सरोजला एका हातानें ओढीत काका म्हणाला.

'कोण हा रमेश ? हें पोरकं पोर ! सापासारखा चावलास. तुला मीं आजपर्यंत पोसला आणि तू आज असा मला चावलास !' रावबहादुर खरोखरच रमेशच्या अंगावर धावून गेले. रमेश खालीं मान घालून स्वस्थ उभा होता. काकानें रावबहादुरांना पुन्हा आवरून धरलें. मोठ्या कष्टानें

त्यानें पुन्हा त्याना स्वस्थानापन्न केलें.

'दादा, उगीच जिवाचा त्रागा करून घेऊ नका. ह्या गोष्टीची मीं तुम्हाला प्रथम सूचना दिली होती त्या वेळीं तुम्हीं मला 'अचरट' म्हणून वेड्याच्या सदरात काढलत. तुमचीच चूक आहे ही. तुमच्या चुकीचं प्रायश्चित्त दुसऱ्याना का ?' काका म्हणाला.

'माझी चूक ? यव् रे माझ्या भाई ! पाण्यासारखा पैसा खर्च करून ह्या दिवटेला शिक्षण दिल, माझी चूक. त्याचप्रमाण अनाथाला मलिदा चारून आज शंभर रुपयाची नोकरी लावून दिली, माझी चूक त्यापेक्षा मी जगलों हीच माझी चूक असच का होईना ! तें कांहीं नाहीं. ही कार्टी माझ्या घरात नको नाहीं तर मी घरादारावर लाथ मारून चालता होईन.' रावबहादूर रागानें थरथर कापत म्हणाले.

सरोज इतका वेळ दगडासारखी निश्चल उभी होती. ती पुढें होऊन म्हणाली, 'बाबा तुमच्या घराण्याची प्रतिष्ठा होण्याऐवजीं माझ्यामुळ छीः थूः होणार हें स्पष्ट आहे. मी तुमच्या घरात राहायला कशी तयार होईन ?'

इतका वेळ मन्त्रमुग्धाप्रमाणें स्तब्ध असलेल्या मातामाउलीला एकदम रडू कोसळलें

'हो माझ्या घराबाहेर चालती. तू आणि तो कार्टा ' रावबहादुर ओरडले.

'जातें. पण जाण्यापूर्वी माझ थोडस ऐका मीं चूक केली ती नाकबूल करण आता शक्य नाहीं. आज सकाळीं आलेल्या डॉक्टरन काकाना सांगितल तेव्हाच मीं आशा सोडली फक्त तुम्हाला आणि आईला कस सांगाव हें मला कळत नव्हत. बाबा, मला तुम्हीं शिक्षण दिलत पण मी एक स्त्री आहें आणि स्त्रीस्वभावानुरूप मला कांहीं इच्छा आकांक्षा असतील हें तुम्ही दृष्टिआड करून चाललात ' सरोज म्हणाली.

'कार्टे, मग त्याच वेळीं का नाहीं सांगितलस मला ?' रावबहादुर म्हणाले.

'बाबा, स्त्रीजात— त्यातून यःकश्चित् चिरमुडी पोर ! माझ लग्न करून द्या म्हणून आपल्या पित्याला कोणत्या तोंडान सांगेल ? आईन तुम्हाला माझ्या लग्नाविषयीं किती छेडल पण तुम्ही मला मुलगाच समजून चालला होतां. मी तुम्हाला कस सांगू आणि आईला तरी कस सांगू ? बाबा, बरोबरीच्या मुलींचीं लग्न होऊन त्याच्या सासरच्या आठवणी ऐकतांना मला

कस वेड्यासारख होऊन जात असेल त्याची तुम्हांला काय कल्पना ? तुम्ही घराण्याची प्रतिष्ठा घेऊन बसलां होता पण निसर्ग मला जीव नकोसा करून सोडीत होता. बाबा, निसर्गाच्या नियमाविरुद्ध लढण्याची फारच थोड्याना देव शक्ति देत असतो. मी आज जी तुमच्यापुढ उभी आहें याच कारण त्या लढाईत पराजय कबूल केला हेंच आहे.' सरोज गंभीरपणें म्हणाली.

'त्यापेक्षा मेली असतीस तर ?' रावबहादुर म्हणाले.

'बाबा, जिवाची आशा कशी सुटेल ? मरू म्हटल्यानं जर मरण येतं तर आज जगात एक स्त्री औषधाला मिळाली नसती. त्याना मरण येत नाहीं, मात्र त्या दुसऱ्याला हा असा जन्म देतात. बाबा, कोणत्याही मुलीला शिक्षणापेक्षा ससार जास्त प्रिय असतो. कामचलाऊ शिक्षण कशा-करता ? तर पुढ ससार सुखान व्हावा म्हणून.' सरोज म्हणाली.

'दादा, माझ आता तरी थोडस ऐका झाल्या गोष्टी होऊन गेल्या. रमेशचा सरूशीं विवाह करून द्या.' काका म्हणाला.

'म्हणजे या पापावर पाघरूण घालू ?' रावबहादुर म्हणाले.

'काका, बाबा, आता माझ्या विवाहाची पचाईत कशाला ? तो हक्क मीं आपण होऊन गमावला आहे. आणि माझ्यासारख्या पापी स्त्रीशीं जुलमान बाधून टाकलेल्या नवऱ्याला जन्मांत कधीं तरी समाधान वाटेल का ? नको. माझ्या चुकीबद्दल जन्मभर त्यान प्रायश्चित्त भोगाव असं मी मुळींच म्हणणार नाहीं आता मी आणि माझा पाठिराखा परमेश्वर !' असें म्हणून सरोज नेसत्या वस्त्रानिशीं घराबाहेर पडली. रमेश तिच्या पाठोपाठ गेला. रावबहादुर व काका आश्चर्यानें दरवाज्याकडे पाहत राहिले. सरोजच्या आईनें धाडकन् अंग टाकलें.

---

# ट. ख. माफ !

मीं तेव्हाच ओळखलें.

आणि नानांनींहि पण ओळखलें कीं मीं ओळखलें.

पण ओळख देण्याची उभयतानाहि चोरी.

मी खिडकींतून पहात होतों. नानाची दुचाकी झोपाळ्याच्या कड्यानीं तयार केलेल्या टागत्या फलाटाला लागली. आणि नेहमींप्रमाणें 'काय रे, कुठें गेले हे लोक ?' म्हणून बायकोची विचारपूस केली 'लोक' चटकन् बाहेर आले.

आणि यापुढें मात्र नानाचें वर्तन अगदीं सभ्यपणास सोडून झालें.

धोतराचोची क्लिप त्यानीं माझ्यादेखत 'लोका'च्या कानात अडकवली, स्वत.ची टोपी 'लोका'च्या डोक्यावर ठेवली आणि 'लोका'ना 'यव रे पुरुष !' म्हणून म्हणत एक नाजुकशा चापटीचा प्रसाद दिला. नानानीं चालीरीती पार गुडाळून ठेवल्या.

मीं हें धडधडीत डोळ्यांनीं पाहिलें. पहाणाऱ्याला लाज या न्यायानें मीं चोरट्यासारखा होऊन दुसरीकडे पाहू लागलों.

वहिनी एकवार माझ्याकडे पाहून चटकन् घरात पळाली.

'अग, बाळूला का भिऊन पळालीस ? आपल्या नवऱ्याच्यापेक्षा वीस वर्षांनीं लहान असणाऱ्या दिराला पाहून बायका लाजत नसतात. उलट लाजबिज काहीं नाहीं का ? उगीच काय इथें उभे राहिलात ? म्हणून त्यालाच पळायला लावतात.' नाना वहिनीच्या पाठोपाठ घरात शिरले.

काय वाटलें त्याना कुणास ठाऊक, पुन्हा ते बाहेर आले आणि मला हाताला धरून ओढू लागले.

'बाळू, असल्या भित्र्या बायका राष्ट्राचा काय उद्धार करणार ?' नाना मला पुढें ढकलीत म्हणाले.

वहिनींनीं आत्तापर्यंत दोन शिवाजी आणि एक जिजाबाई मिळून तीन अमूल्य जिवाना या जगात आणून सोडलें होतें, राष्ट्राच्या संपत्तींत तीन

नररत्नाची त्यांनीं भरती केली होती, आता राष्ट्राचें त्या काहींच देणें लागत नाहींत, इत्यादि नानाना सांगण्याचें माझ्या अगदीं जिभेवर आलें होतें. पण मी काहींच बोललों नाहीं. कारण राष्ट्राचें देणें किती रत्नावर थाबतें याचा मला अदाज नव्हता ! आणि पुढचा काय नियम द्यावा ?

'आज असा सुरेख चहा देशील कीं नाहीं !' म्हणून म्हणत नानानीं मला सैपाकघरात ओढलें. मी मुकाट्यानें पाट माडून बसलों.

नानाचें आजचें अवसान काहीं विलक्षणच होतें. वहिनींच्या रागाला त्यानीं जुमानलें नाहीं. त्याच्या दटावणीच्या नजरेकडे त्यानीं पूर्णपणें दुर्लक्ष केलें. गोवरीच्या खाडावर त्यानीं राकेल ओतलें. काड्याच्या पेटीसाठीं त्यानीं घरात प्रवास सुरू केला चहाच्या डब्याचें झाकण त्यानीं उघडून दिलें. साखरेचा डबा त्यानीं पुढें ठेवला. स्वतः विस्तव म्हणून चुलींत जाऊन बसले नाहींत हीच मेहेरबानगी !

'आजचा चहा ! फक्कड. करणारें मनुष्यच फक्कड ना ! अन् किती जलद ! अरे, जगात रत्नाच्या खाणी आहेत खाणी ! पण शोध मात्र लावला पाहिजे. तुझी वहिनी—अगदीं पहिल्या दिवशीं माझा निश्चय झाला ! हीच माझी सहधर्मचारिणी. हिच्याच हातून मी चहा पिणार ! आणि हिचा स्वभाव ! किती प्रेमळ ! बाळू, तुला नाहीं असलें सुख मिळणार ! तुझ्या नशिबीं केसाचा शेपटा पाठीवर टाकून गावभर भटकणारी, हसताना मुद्दाम दाताचें प्रदर्शन करणारी, बोलताना स्स् करून दातामधून आत वारा घेणारी अन् पायाला पिना लावणारी एखादी शाळेंतली पोरगी ! तुम्हा हल्लींच्या तरुणाचे हाल आहेत हाल ! सुखाचे दिवस विसरा आता !'

आणि इतक्यात नेपोलियनच्या पद्धतीबरहुकूम आडवी टोपी घातलेलें एक डोकें माजघरातून डोकावू लागलें. थोड्या वेळानें डोक्याखालचा भाग दृश्यमान होऊ लागला 'अरे हा बापू आला. ये रे, आज आपल्या इथें चहाचा गुत्ता आहे. वाटेल तितका.' नाना मोठ्यानें हसून म्हणाले. नेपोलियनपद्धतीची टोपी घालणारे बापूराव तोंडांत अगठा अडकावून आत आले. सदऱ्याला गुड्या लावणें म्हणजे अनीतीचा ओनामा गिरवणें असा याचा एखादा नवीन आडाखा असल्यास न कळे.

नानाचीच दहा वर्षे वयाची ही मूर्ति फरक हा कीं नानाना तुमान चढवायची अक्कल नव्हती.

त्या दिवशीं नानानीं मुलाचे कोण लाड केले ! बापूच्या प्रगति-पुस्तकावर त्यांनीं झटक्यासरशी सही केली, अबूच्या कानाचा चावा घेतला अन् आवडीला धान्यें ठेवण्याच्या फळीवर नेऊन बसविलें तिच्या कपाळावर तादूळ म्हणून एक चिठ्ठी डकवली अन् तिला हाताशीं धरून 'चोर का मोर' हाहि डाव ते खेळले.

पण वहिनी काहीं बोलल्या नाहींत. काय बोलणार तरी काय ? दारूबाजाला धुंदी केव्हा चढते हे त्याच्या बायकोला पूर्णपणें ठाऊक असतें. तिनें ओळखलें

नानाचें हें वर्तन जाणूनबुजून चाललें होतें निराशेचा टोला त्याना चागलाच जाणवत असावा आणि केवळ आपल्यावर निराशेचा काडीमात्रसुद्धा परिणाम होत नाहीं हें दर्शविण्याच्या ईर्षेनें ते असलें हें बेदरकार आचरटपणाचें कृत्य करीत होते. जगाला फसविणें शक्य असलें तरी रक्ताचा सबध असलेल्या पाठच्या भावाला फसवता येणार नाहीं

रात्रीं जेवणेंखाणें उरकल्यानतर आमच्या बाळगोपाळाना एक एक चापटी ठेवून (चापटी खाल्ल्याशिवाय निजेल त्याचें आरोग्य तरी कसें वाढेल ?) मीं निजवून टाकले वास्तविक अबू आणि आवडी याना केवळ धाक पुरे होता पण बापूला अलीकडे कान फुटू लागले होते. ते मधून मधून खुडून टाकण्याचें काम अर्थातच माझ्याकडे होतें. आणि तें काम मीं त्या दिवशीं बजावलें.

'ए काका, तू आज मला सिनेमाला नेणार होतास.' बापू म्हणाला.

'पहा आता बापाचा सिनेमा' म्हणून उत्तर देणार होतों, पण उत्तराऐवजीं कानशिलात देणेंच प्रस्तुत वाटलें सिनेमात तरी आणखी यापेक्षा दुसरें काय दिसणार !

नाना ओसरीवर आढ्याकडे टक लावून पहात पडले होते. मी टेबलावरच्या दिव्याशीं खेळू लागलों. आत वहिनी उष्टीं काढण्याच्या नादात होत्या.

'नाना.' मी हलकेंच म्हणालों.

नानानीं माझ्याकडे पाहिलें. अजून त्याच्या पहाण्यांत फटिंगवृत्ति

दिसून येत होती.

'आज कांहीं झालें ?' मीं विचारलें.

'विशेष काहीं नाहीं.' नाना हसून म्हणाले.

'मला सागावयाचें नसेल तर मी काय बोलणार ?' मी म्हणालों.

यावर नाना बराच वेळ स्तब्ध होते.

'बाळू, या महिन्याच्या पहिल्या तारखेस मी रिकामा आहें !' नाना शान्तपणें म्हणाले

आणि हेंच मीं अगदीं पहिल्या प्रथम ओळखलें होतें. कारण नसताना मनुष्य इतकी बडबड करीत नसतो. मीं काहींच उत्तर केलें नाहीं. नाना एकदम उसळून म्हणाले,

'कटाळा आला मला याचा. मीं आजपर्यंत सहन केलें. आता मात्र शक्य नाहीं. माझ्या आयुष्याचे हे धिंडवडे माझ्याच्यानें मुळींच पहावत नाहींत ! आजपर्यंत पाच नोकऱ्या झाल्या. विसाव्या वर्षापासून नोकरीची माळ जपतों आहें. आज मला चाळीसावें लागलें आणि या महिन्याच्या पहिल्या तारखेपासून सहावी माळ जपावी लागणार.'

'नाना, मीं कॉलेजात जाण्याचें बंद करतों.' मी मुकाट्यानें म्हणालों.

'अन् माझ्याचप्रमाणें भीक मागत फिरतों नाहीं ? बाळू, घरात थोरला भाऊ भीक मागतो तेवढें पुरे आहे. पण– पण एक बायको, तीन मुलें अन् पाठचा भाऊ– देवा !'

नानानीं दोन्ही हातानीं आपलें तोंड झांकून घेतलें.

'नाना, माझी शिकायची इच्छा नाहीं.' मी म्हणालों.

'तुझी नसेल. पण माझी आहे. भिकाऱ्याला ओकारी ही अशी असते. मी भीक मागेन पण तुला भिकेला लावणार नाहीं.' नाना उसळून म्हणाले.

'पण नाना !' मी मध्येंच आर्जवाच्या सुरानें म्हणालों.

'गप्प बैस. मूर्ख कुठचा ! मला अक्कल शिकवूं नकोस. तूं बी.ए. झाला पाहिजेस, एम्.ए. झाला पाहिजेस अन् प्रोफेसर.' दादा निश्चयानें म्हणाले.

मी मुकाट्यानें उठून आंत जाऊं लागलों. वहिनींनीं माझ्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें.

'नौकरी' म्हणून पुटपुटत मीं नकारार्थी मान हलविली. वहिनींनीं

एकदम डोळ्याला पदर लावला !

* * *

'हिंमत मर्दा तो मदत खुदा' इत्यादि गोड गोड भुलथापा मारून नाना स्वतःप्रमाणें आमचीही फसवणूक करीत होते. दोन्ही वेळेला व्यवस्थित पोटाला मिळाल्यावर माझ्यासारख्या मर्दाला नुसती हिंमत धरणें काहीं जड नव्हतें. पण अशा रीतीनें आणखी किती दिवस तो खुदा मदत करणार याचीच मला जबरदस्त शंका होती. मीं त्याप्रमाणें नानांना बोलूनहि दाखविले पण नानांनीं माझ्यापुढें 'आयुष्य म्हणजे काय' हें तत्त्वज्ञान सविस्तरपणें मांडण्यास सुरुवात केली.

'बाळू, आयुष्य हें एकांगी नसून अनेकांगी आहे. आज खाण्याची पचाईत तर उद्या खाणाऱ्याची पचाईत ! माझ्या मतें सृष्टीचा एक नियम असावा कीं जोंपर्यंत तुमच्या हातून काहीं ना काहीं तरी कार्य घडून येणार असतें तोंपर्यंत सृष्टिमाता तुम्हाला मरू देत नाहीं प्रत्येक जीवाला जगू देण्यात सृष्टीचा काहीं तरी मतलब असतो. कोणतीही गोष्ट वाया जात नाहीं. प्रत्येक वस्तूचा उपयोग आहे. प्रत्येक जीवाला काहीं तरी कार्य करणें आहे.'

निदान नानाच्या जीवाला तरी असल्या शेळपट थापा मारण्याचें कार्य होतें खरें ! आणि माझ्या जीवाला तें ऐकून घेण्याचें असावें ! मी काहींच बोललों नाहीं. आयुष्याचें कोडें उलगडणाऱ्या महात्म्यापुढें गप्प बसणें हाच शहाणपणा असतो.

दुःखात सुख येवढेंच कीं वाडवडिलांनीं पुण्यात वास्तूची सोय केलेली असल्यामुळें अजून वडाच्या झाडाखालीं वहिनींच्या पातळानें सुशोभित केलेल्या मांडवाखालीं रहाण्याची आमच्यावर पाळी आली नव्हती

नाना आयुष्याच्या गुंताळ्यात डोकें खुपसून बसले आणि एके दिवशीं मला काथ्याच्या गुंताळ्यात हात गुंतवून बसावें लागलें. माळ्यावरची बाज खालीं काढून दोऱ्या आवळण्याबद्दल वहिनींनीं मला सांगितलें. विधात्याचें कौतुक करीत मी प्रस्तुत कामाला लागलों.

'काका, आम्हाला निजायला का रे ?' म्हणून बापूनें विचारलें. अबू आणि आवडी जोरजोरानें आपल्या हक्काचें घोडें पुढें दामटू लागलीं.

'आपल्या माईची बाज आहे ही. तुला नाहीं काहीं.' आवडी म्हणाली.

'अन् माईला आता एक बाळ होणार आहे.' अबू पटकन् म्हणाला.

मला त्या स्थितींतसुद्धा हसू आलें. लहान मुलें दिसायला बावळीं पण नजर कशी कावळ्याची असते पहा! 'चूप! असें बोलू नये. माई मारील' म्हणून मीं त्याला दटावलें.

नानाना कळताच त्यांनीं मातृपदाची थोरवी गाण्यास आरंभ केला.

'बाळू, मातृपद म्हणजे जगातली एक प्रकारची तपश्चर्याच आहे पूर्ण खडतर. पण रक्ताचें बंधन असल्यामुळें पोटच्या पोराकरता आई मनानें, शरीरानें-- वाटेल त्या प्रकारें खस्ता खाण्यास तयार असते ' मात्र शक्य असतें तर मीसुद्धा माता झालों असतों हें विधान नानांनीं खुशाल दडपून दिलें! आणि तें मला अगदीं खरें वाटलें.

जिच्यासंबंधानें आम्ही एवढे तोंड भरून प्रशंसोद्गार काढीत होतों त्या मातेची मात्र काय काय स्थिति झाली होती याचा विचारच करवत नाहीं.

वहिनींच्या दुःखी मुद्रेवरून मीं ताडलें कीं मातृपद मिळवणें हें जरी विश्वाचें कार्य असलें तरी त्या मातेला विश्व नेहमीं शून्याकार वाटत असावें. भयाण अंधार! मृत्यु! शक्य असतें तर कोणत्याही स्त्रीनें मातृपदाच्या लफड्यात आपला जीव ढकलला नसता. आणखी कितीही गौरवाचीं वाक्यें उच्चारलीं गेलीं तरी प्रत्येक माता मनाशीं पूर्णपणें ओळखून असते कीं मुलाला जन्म देणें म्हणजे एक लहानशी मुंबईची सफर नव्हे! विस्तवाच्या कोलत्या खेळण्याइतकें तें सोपें काम नाहीं चार भिंतींनीं स्वतःला कोंडून घेऊन प्रसूतीच्या मरणप्राय वेदना सहन करीत बाजेला खिळून राहिलेली चार फूट तीन इंच उंचीची मातादेवी पुढें येणाऱ्या बालकाच्या खुशाल-चेंडू पितृदेवाला मनातल्या मनात शतशः लाखोली वहात असते.

'अन् बाळू, राष्ट्राची खरी संपत्ति म्हणजे रात्रीं अपरात्रीं टँ हँ टँ हँ करणारीं हीं लाडकीं बाळें होत!' नाना म्हणाले. अन् त्या दृष्टीनें विचार केला असतां आमच्या वडिलांच्या दुप्पट (पुढचा हिशोब जमेस न धरता) नानांनीं ही भाडवलशाही माजवली होती.

वेळेला उपयोगीं पडावी म्हणून पाया पडून आणविलेली मावशी आमच्या आईची बहीण निघाली. वेळेला उपयोगीं पडल्यावर मग नातेवाईक कसले?

चारआठ दिवस तिनें स्वतःकरता रोज शिऱ्याचा खुराक चालू केला. पित्ताच्या प्रकृतीला शिरा रामबाण उपाय! पण त्या रामाच्या बाणानें आमचा जीव जात होता त्याला काय उपाय? शेवटीं 'घरीं हाल होत आहेत' या सबबीवर (त्या हालात भरती घालण्याकरता) ती निघून गेली.

अखेरीस सतरादा नानांनीं आपल्या डोक्याचा नारळ फोडल्यावर शेजारची एक माउली नवसाला पावली. पूर्वीच्या अनुभवावरून आम्हाला चागलेंच शहाणपण आलें होतें. शिराच काय पण वेळीं बासुदीपुरीचासुद्धा आम्ही रतीब लावायला तयार झालों.

भगवान् सूर्यनारायणाच्या उदयाबरोबर आणखी एका नराचा उदय झाला. नानांनीं जन्मवेळ माडून घेतली. साखरेच्या डब्यातली साखर चिमटी चिमटी तोंडात गेली.

आनदीआनद झाला! नानाची राष्ट्रीय सपत्ति वाढली!

थोड्या वेळानें वहिनींच्या तुरुगात मीं पाऊल टाकलें नाकाला रुमाल लावणें भाग होतें कोपऱ्यात समई तेवत होती. बाजेवर एक जीव तेवत होता, आणि त्याच्याच शेजारीं विश्वाच्या लटांबरात अग्रपूजेचा मान पटकावणारी, पुरुषाना मोक्षाचा मार्ग खुला करून देणारी पण स्वत. 'आता मरू का मग मरू' याचा विचार करणारी आपली माता निपचित पडली होती. विश्वाचे कार्य तिनें केलें होतें, विश्वानें तिचें क्रियाकर्मान्तर करण्याचें तेवढें ठेवलें होतें!

'वहिनी.' मी सद्गदित कंठानें म्हणालों. वहिनींनीं माझ्याकडे दृष्टि वळविली. 'वहिनी, नसता विचार करून— आहे तोंवर आपल्याला जिवासाठीं धडपड केली पाहिजे.' मी म्हणालों

आणि वहिनी रडू लागली. 'भाऊजी, मी जगलें. कशी जगलें? आता कसें होईल आपलें?' म्हणून म्हणत वहिनी जास्तच रडू लागली

* * *

स्वत'च्या जगण्याचें वहिनींना आश्चर्य वाटत होतें. मलाही पण वहिनींची आशा नव्हती. पण वहिनी जगल्या. एवढेंच नव्हे तर दोन महिन्यात त्या बाहेर आल्या.

'सगुणाबाई, तुम्ही सागता तें काहींच नाहीं. आमच्या सदूच्या वेळेला

मी तर अगदीं मरणारच होतें. पण देवानारायणाची कृपा म्हणून त्याचें अंगडेंटोपडें करायला आज जिवत राहिलें' इत्यादि गोड, शोकरसात्मक आठवणींनीं त्यानीं आपल्या जीवाला विरगुळा पाडला.

पण मला ही आयुष्याची भेसुरता पाहून जो एकदा तिटकारा आला तो कायमचा.

आणि ज्या सदूच्यामुळें एवढा मला आयुष्याचा तिटकारा आला तोच सदू आल्या वाटेनें परत जाण्यासाठीं चुळबुळ करू लागला.

एके दिवशीं सदूला खोकल्याची ओबळ आली. त्यापुढच्या रिपोर्टांत सदूचें अग तापल्याचें नमूद केलें गेले त्यानतर सदूच्या अगाला हात लावण्याची सोय नाहीं म्हणून वहिनींनीं डोळ्याला पदर लावला. अन् त्यानतर सदूनें तोंडावाटे नुकत्याच प्राशन केलेल्या दुधाची कवडी बाहेर सोडली. अन् सदूनें डोळे पाढरे केले !

नाना आयुष्याचे कोडें उलगडण्यात गुतले होते सृष्टीचा काय नेमानेम असेल त्याप्रमाणें हा जीव जगेल किंवा मरेल हें त्यानीं मला त्रिवार बजावून सागितलें.

मीं डॉक्टरचा प्रश्न काढला.

'डॉक्टर ? तू काय त्याला परमेश्वर समजतोस ? खुळ्या, या देवाघरच्या गोष्टी असतात. डॉक्टर तो डॉक्टर आहे, अन् परमेश्वर तो परमेश्वर.' नानानीं उडवाउडवी सुरू केली.

'नाना, काहीं झालें तरी उघड्या डोळ्यानीं प्राण कसा जाईल ? लोकाचा मुलगा असता तरी आपल्याला भूतदया म्हणूनसुद्धा काहीं तरी हातपाय हालवणें प्राप्त होतें. डॉक्टर परमेश्वर नसला तरी तुमच्याआमच्यापेक्षा पुष्कळ वरच्या कोटींतला आहे.' मी आर्जवानें म्हणालों.

'अरे, पण मला नाहीं का माझ्या मुलाची काळजी ? पण तुम्हीं-आम्हीं नुसती काळजी करून काय उपयोग आहे ? पीळदार सूत बनायला मूळ कापूसच चागला लागतो— धागा तुटला तर त्यात तुमचाआमचा काय दोष ? आता तू म्हणतोसच आहेस तर— तर— पण मी तरी काय करू ?' म्हणून नानानीं माझ्याकडे केविलवाण्या मुद्रेनें पाहिलें. माझ्या लक्षात आलें.

'नाना, काल माझा फीचा हप्ता दिलात अन् शिल्लक काहीं ठेवलें नाहींत ?' मी म्हणालों

'चार दिवसांनीं पहिली तारीख येईल अन् भाड्याचे पधरा रुपये येतील म्हणून—' नाना म्हणाले

'चागलें आहे' म्हणून पुटपुटत मी घराबाहेर पडलो.

मला काहीं सुचेना. चागल्या चार मुलामाणसाच्या घरात जन्मलेल्या एका निर्दोषी बालकाला औषधावाचून तडफडून मरण्याची पाळी यावी ही कल्पनाच मला सहन होईना अन् करायचें काय शिक्षण ? लहान पोराचें नरडें दाबून शिक्षण मिळवायचें !—देवा !

अन् सदू आज मरणार ! परवा अबू मरणार ! तेरवा बापू मरणार— अन् मग मी बी ए होणार— एम् ए. होणार— प्रोफेसर होणार अन् पैसे मिळवणार !

शिक्षण सोडून तरी काय करणार ?

एम्.ए , एल्.एल्.बी होऊन ज्या ठिकाणीं लोक पन्नासच्या आशेनें अर्जांचीं भेंडोळीं टाकीत आहेत त्या ठिकाणी इटरच्या चिमुरड्याला कोण उभें राहू देणार ?

सर्व बाजूनीं कोंडल्यासारखें दिसत होते शिक्षण धरावें तर डसतें आणि सोडावें तर डसतें. तसें म्हणावें तर नानाची स्थिति तरी काय मोठी चागली होती ! टेंपरवारी टेंपरवारी म्हणून आतापर्यंत चाललेंच होतें. त्याच्या दृष्टीनें पहाता मृत्युच काय तो टेंपरवारी नव्हता.

औद्योगिक बाजूत लक्ष घालण्याचा नुसता विचारसुद्धा भयंकर होता आता याच्यापुढें सुतारकी करायला जावें तर कदाचित् पुढच्या जन्मीं दीड रुपया रोज मिळण्याची आशा.

आणि इच्छा नसतानासुद्धा डोक्यात विलक्षण विचार येऊ लागले—

समजा, नानाना पार्तीत घेतलें. धदा सुरू केला. रोज सध्याकाळीं बुधवारांतून फेऱ्या मारणें हा कार्यक्रम. तोंडानें 'अरे नजर करो यार, ख्याल करो यार, बबईवाला आया है' म्हणून खडया सुरात एखादी कवाली म्हणत सुटायचें आणि हातानें खाद्यपदार्थांची एक गाडी लोटायची. गाडीमध्यें सतरा भाड्यातून सतरा पदार्थ ठेवायचे. मटकीची उसळ,

कांद्याची भाजी, शेव, चणे, डाळ वगैरे वगैरे पदार्थ ठेवले कीं पुरे आहे. आणि वर मडईतून टाकून दिलेल्या कोथिंबिरीच्या काड्यांची चटणी! अनायासें, जगात कोणत्याहि वस्तूचा उपयोग आहे हें तत्त्व सोदाहरण पटवून देण्याचेंहि श्रेय पदरात पडण्यास हरकत नाहीं.

धंदा उत्कृष्ट चालेल. कारण देशात आर्थिक परिस्थिति कितीहि बिकट झालेली असली तरी चणेचटपटेवाला कधींच मरत नाहीं. जोपर्यंत देशात विद्यार्थिवर्ग आणि संध्याकाळीं नव्या पुलावर जाऊन हवा खाणारा अचरट वर्ग जिवत आहे तोंपर्यंत शेव-चकलीवाला मरणें शक्य नाहीं.

पण त्याला काहीं व्यावहारिक आणि पुष्कळशा तात्त्विक अडचणी होत्या—

एक तर असला धंदा करायला मनुष्यानें मवाली वृत्तीचें बनलें पाहिजे. डोक्याला टोपी चालणार नाहीं. सहा वार धोतर पुरे. पायात वाहणा उपयोगी नाहींत कानामध्यें एखादें विडीचें थोटुक पाहिजे. त्यात भानगड एक आहे का?

आणि हे जिन्नस घरीं करायचे तर घरांतल्या मुलाना कुठेंतरी परप्रान्तीं हाकलून देणें अवश्य आहे त्याच्या तावडींतून एक जिन्नस बाहेर पडणें मुष्कील.

आणि पुन्हा विडंबनाची भीति—'पुणेरी पठ्ठ्या' म्हणून आमची टिंगल उडायची!

मी बऱ्याच वेळानें घरीं आलों उद्योगी (!) महाराष्ट्र म्हणून नावाजलेल्या देशात जन्म घेऊन मला एकहि उद्योग सुचण्याची आशा नव्हती; तेव्हा साधल्यास घरात पडल्या पडल्या हाताचीं नखें तरी कुरतडण्याचा उद्योग पाहावा या विचारानें मी परत आलो होतों. दारातच नानासाहेब विजयी मुद्रेनें हसतमुख पुढें आले.

'बाळू, आज मीं एक नवीन शोध लावला आहे.' नाना म्हणाले.

'अन् मींहि पण एक शोध लावला आहे.' मी तिरसटपणानें म्हणालों.

'अरे आहोंतच आपण तसे कल्पक!' नाना अभिमानानें म्हणाले.

पण माझा शोध नानाना सांगण्याजोगा नव्हता. जरी सांगितला असता तरी फारसें नुकसान नव्हतें म्हणा; पण एखाद्या मूर्खाला 'मूर्ख आहेस' म्हणून कशाला बजावायला पाहिजे? तें दुसऱ्यानीं सांगण्यापेक्षा त्याला

स्वतःलाच जास्त चांगलें समजत असतें ! पुन्हा वडील भावाचें नातें !

'बाळू, मानवी जीवित किती अशाश्वत असते ! एक वाऱ्याची झुळूक अन् गेला दिवा. झाला अंधार काहीं–काहीं दिसत नाहीं ! झाडावर बसलेली चिमणी आत्ता चू चू करते आहे. आला पारधी चुकून छरा लागला. पंखाची फडफड थांबली हृदयाची धडधड आता काय उरलें आहे ? बर्फासारखें गार कलेवर !' नाना हातवारे करून सांगत होते

'नाना, तुम्हाला राग आला तरी पत्करेल— पण हें तुमचें तत्त्वज्ञान मला सांगू नका आयुष्य म्हणजे काय हें कोडें तुम्हाला सुटलेलें नाहीं. मला सुटलेलें नाहीं कोणालाच सुटलेलें नाहीं आणि कधीं सुटेल अशी आशाहि पण नाहीं. उगीच तत्त्वज्ञान तत्त्वज्ञान म्हणून स्वत च्या शहाणपणाचें ढोलकें बडवण्यांत मुळींच स्वारस्य नाहीं ' मी चिडून म्हणालों.

काही काळपर्यंत नानांनीं हा अपमान तोलून पाहिला. पारडें कमीच भरलें !

'हें तुमचे तरुण रक्त ! अधिरा स्वभाव. जरा कुठें डास गुणगुणू लागला कीं तुम्हाला मृत्यूच्या गळ्यात मिठी मारावीशी वाटते. छेः ! प्रत्यक्ष यमाचा तांडा येऊन उभा राहिला तरी 'थांब, एवढा ताकभात खाऊन येतों' म्हणून म्हणण्याची धमक पाहिजे. अरे, अडचणी ह्या येणारच अडचणींचा समुद्र आडवा आल्याशिवाय कल्पनेचें तारू निर्माण होत नसतें. हो. पण विसरलोंच. मुख्य गोष्ट राहिलीच बाजूला. चल आत. तुला प्रत्यक्षच दाखवतों.' नानांनीं मला आत नेलें.

माजघरात टांगलेल्या झोपाळ्यात सदू शान्तपणें झोपला होता.

'पहा ! या सहा महिन्याच्या जीवाला मीं आयुष्याचें वरदान दिलें आहे. मीं त्याला माणसात आणलें आहे. काय रे लेका, बापापुढें तुझ्या गमजा !' म्हणून निजलेल्या सदूचे गाल कुस्करीत नाना हसून म्हणाले. मीं आश्चर्यानें नानाच्याकडे पाहिलें नानांनीं झटपट शेजारच्या फडताळांतली एक बाटली काढली आणि सूर्यप्रकाशांत धरली.

'हा माझा शोध. बैलाला तांबडी चिंधी आणि यमदूतांना हें तांबडें पाणी ! पहा— नीट पहा. काय आहे बाटलींत !' नाना बाटली हालवून म्हणाले.

मीं वास घेऊन पाहिलें. दारू नव्हती. एक प्रकारचा उग्र वास मात्र झाकत नव्हता.

'कसलें हें औषध?' म्हणून मीं आश्चर्यानें प्रश्न केला.

'सांगितल्यावर तू काय ओळखणार? अन् बाळू, तुझ्यापासून आजपर्यंत मीं एकहि गोष्ट लपविली नाहीं (खरें म्हटले तर ह्यालासुद्धा अक्कल लागते, अन् अकलेची तर नाना खाणच!) पण आज ही गोष्ट मी तुझ्यापासून लपवून ठेवणार आहें जगापासून लपवून ठेवणार आहें'

म्हणून म्हणत नानांनीं हातातली बाटली जोरानें हालविली. मीं आश्चर्यानें दारात उभ्या असलेल्या वहिनींकडे पाहिलें वहिनींनीं तोंडानें चुक् करून नकारार्थी हात पसरले.

'हिंमत मर्दा तो मदत खुदा' म्हणून म्हणत नाना मोठ्याने हसले.

* * *

त्या दिवसापासून नानाच्याकडे बऱ्याच लोकाची ये जा सुरू झाली. मी तर्कावर तर्क बांधीत होतों. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. वहिनींच्या तुरुंगात नानांनीं स्वतःला कोंडून घेतलें आणि बाहेर पडते वेळीं खोलीला कुलूप.

—आणि एक शोध लागला कीं मग अनेक शोध लागतात.

रोज घरीं जाऊन पहावें तों जगामध्ये विद्यमान स्थितींत असलेलें तुटपुंजें ज्ञान आणखी एका नवीन शोधाचें बाळसें धरीत होतें.

नानाच्या किलकिल्या डोळ्याकडे पाहण्याचे मला धैर्य होईना. अर्धवट डोळे मिटणारा प्राणी एखाद्या निद्रिस्त ज्वलत्पर्वताप्रमाणें भयंकर असतो.

रोज घरामध्यें नवीन व्यवस्था वहिनींचा तुरुंग आता नानाचा तुरुंग बनला होता. पुढच्या दरवाज्याशेजारीं एक दुकानाप्रमाणें खोली बांधण्यात आली.

खगळीं सोंगें आणता येतात पण पैशाचें सोंग मात्र कठीण असतें, म्हणून नानाची आर्थिक परिस्थिति अजमावून पहाण्याचा मीं बेत केला आणि कोटाकरता दहा रुपयाची मागणी केली.

नानांनीं दहा रुपये तर दिलेच पण वर 'धोतरेंहि घेऊन टाक' म्हणून आणखी दहा रुपये दिले.

आता मात्र अगदीं हरलों. कानात मीठ, नाकात मीठ अन् 'कशा पंकीं!' म्हणून नानाना प्रश्न विचारला.

'तुला लहान मुलाला काय? मोठ्या माणसाच्या कामाची चौकशी लहान मुलानीं करूं नये' म्हणून नानांनीं उत्तर केलें. जरा वेळानें वाताचा झटका आल्याप्रमाणें ते खिदळून म्हणाले—

'बाळू, अखेरीस मीं जिंकली.'

'नाना, तुमच्याकडे काल एक मारवाडी आला होता' भेदक नजरेनें त्याच्याकडे पहात मी म्हणालों.

'अरे येणारच! येऊ दे आणखी असे दहा येऊ देत!' नाना म्हणाले

'कशाला दहा? एक मारवाडी आपल्याला भारी आहे.' मी म्हणालों

'धदा! धदा! मारवाडी हा धद्याला आवश्यक असा पैसा पुरवणारा कुबेर आहे. आणि धदा चालवणारी ही अश्विनीकुमाराची जोडी म्हणजे मी आणि माझें डोकें' नाना म्हणाले.

'नाना, आपल्या अण्णानीं सबध आयुष्यात मारवाड्याचें तोंड पाहिलें नाहीं म्हणून तुम्हीच म्हणता. अन् नाना, मला लक्षण काहीं ठीक दिसत नाहीं. लहान तोंडीं मोठा घास घेऊ नये पण मी बोलतों त्याचा राग येऊ देऊ नका.' मीं कळवळ्यानें म्हटलें

नानानीं प्रेमानें माझ्या पाठीवरून हात फिरविला.

'बाळू, तुला माझ्या डोक्यातले विचार जर समजले तर तू असल्या शका घेणार नाहींस. पण तुला इतक्यातच त्या गोष्टी सागाव्यात असें मला वाटत नाहीं आधीं करावें नी मग बोलावें हा माझा बाणा आहे. तू काहीं काळजी करू नकोस. सर्व काहीं ठीक आहे.' नाना म्हणाले.

काय असेल तें असो, नानाच्या चागल्या उद्देशाविषयीं मला कधींच शका आली नाहीं. मीं मुकाट्यानें तो प्रश्न तसाच सोडून दिला.

सुमारें दोन महिन्याचा अवधि लोटला असेल.

कॉलेज लायब्ररीमध्यें एक वर्तमानपत्र चाळण्याकरतां म्हणून हातात घेतलें. आणि अगदीं मुखपृष्ठावर खालील मजकूर छापला होता—

**काहीं महत्त्वाचे प्रश्न**

१ आपणास तारुण्यानें सोडल्यानें आपलें जीवन कटाळवाणें झालें

आहे काय?

२ नीरक्तता– रक्ताची क्षीणता– यानें आपलें शरीर फिकट बनलें आहे काय?

३ आपलें शरीर अस्थिपजरवत् बनून शरीरातील शिरा व छातींतील हाडें मोजता येतील इतकें तें कृश झालें आहे काय?—

—तर मग सावध व्हा. हुशार रहा. वेळींच तजवीज करा.

आमचा 'मदन-मृणालिनी-अनग-पाक'— कीं जो अशक्त पुरुष, स्त्रिया व मुलें याच्याकरता सर्वोत्तम तयार केला आहे आमची आम्हींच काय स्तुति करावी? पण खरोखरीच वाचा व अनुभवा. खात्री होईल कीं मनुष्याच्या कर्तृत्वशक्तीची परमावधि आहे रोग असे पळतील कीं जसे हवेमुळें मच्छर आजारातील अशक्तता नाहींशी होईल कीं जसें वाघास पाहून हरीण तुमची विचारशक्ति कुठित होईल कदाचित् क्षणभर आपलें देहमान विसराल आणि सौंदर्यमिश्रित विलक्षण तारुण्याचें उबदार गुलाब-पाणी तुमच्या अगातून झुळझुळ वाहायला लागेल

रोगी निरोगी, हौसी बिनहौसी, विश्वासू गैरविश्वासू, फूलमूलवाला जातिवत कवि, टिंगल्या विठोबा, लघुकथा-लेखक– सर्वांना वापरण्यालायक असून पथ्य नाहीं गुण मात्र विजेच्या वेगाने किंमत बाटलीस ४ रुपये. श्रीमत, जहागिरदार, सस्थानिक, राजेरजवाडे यानीं वापरण्यालायक किंमत ८ रु (यात जास्त जास्त अमूल्य द्रव्यें खेंचून भरलीं आहेत.)

आमच्याविषयीं लोकमत पहा.—

१ सुटणपुराहून रिटायर्ड रेलवे इजिनियर कळवितात— थक्क झालों. आणखी एक स्पेशल येऊं द्या २ आय. सी एस बुद्रुके याचे क्लार्क पी चेट्टम् नगरकिंडीहून लिहितात— पृथ्वीवरचें अमृत. या कलियुगात जाहिरातीवर विश्वास बसत नाहीं, पण बसला देव तुम्हाला दीर्घायुष्य देवो. दोन स्पेशल ३. टिवरगावकर, मुबई, कळवितात— गुण आला. आमच्या हिच्याकरता एक स्पेशल धाडा.

पत्ता— वैद्य नानाशास्त्री पढरीनाथशास्त्री दुधनीकर, G I.P , पुणें.

औषधाच्या सेवनानें वृद्धास तरुणावस्था प्राप्त होण्याची जबरदस्त आशा

होती पण त्या औषधाच्या जाहिरातीनें मात्र एका तरुणाला वृद्धावस्था प्राप्त होण्याचीं चिन्हें दिसू लागलीं ! डोळ्यावर माझा विश्वासच बसेना वैद्य नानाशास्त्री अ ! वा रे कुडमुड्या !

अन् स्वतः शास्त्री होण्याबरोबर बिचाऱ्या पढरीनाथपतानासुद्धा आपल्या पत्तीस ओढलें होतें अन् हें 'G I P, पुणें' ही काय भानगड ?

अभिप्रायात नमूद केलेली मडळी कोणत्या ग्रहावर वस्ती करून राहिली होती हें छातीठोकपणें सागणें कठीण होते आणि जाहिरातींत नमूद केलेलें जर अक्षरन् अक्षर खरें असतें तर— तर मोठा अनवस्था प्रसग प्राप्त झाला असता यात शका नाहीं या पृथ्वीवर पाऊल ठेवण्याची सोय नव्हती

मला सर्वांत आश्चर्य वाटले तें निराळ्याच कारणामुळें. हें इतकें दिव्य वाङ्मय निर्माण करणारे नानाचें डोकें ही जाहिरात लिहून जाग्यावर राहिलें तरी कसें ? एक साधा नोकरीचा अर्ज खरडणें असलें तर ते माझ्या लेखनशैलीची प्रशसा करू लागत आणि आता हें जगड्व्याळ औषध ! जगाला नदनवन करू पाहणारी ही वल्ली— हा जगप्रसिद्ध पाक— आणि त्याची जाहिरात ! मनुष्याचें डोकें लोखडाचें असेल तरच ही उष्णता सहन होईल !

मी घरीं आलों. नाना मला पाहिल्याबरोबर आपल्या खोलींत पळाले —जसें माजरास पाहून उदीर ! पण लगेच बाहेर आले— जसें लोहचुबकास पाहून लोखड.

मीं नुकत्याच पाहिलेल्या जाहिरातीचा आराखडा माझ्या दृष्टीसमोर होता !

'नाना, ही तुमची नवीन कल्पना पाहून हसावें कीं रडावें तेंच मला समजत नाहीं !' उद्वेगानें मी म्हणालों.

'रडण्याची अमगळ भाषा आता काय म्हणून ? आता यापुढें मौज, गमत, बहार, हुलुलुलुलू !' नाना चमत्कारिक मुद्रा करून उत्तरले. 'बाळू, आजपर्यंत झालेला त्रास विसरून जावें यातच आपलें कल्याण आहे. आज हा धदा मीं सुरू केला पैसा ? लागेल तितका ! पैसा सांचवायला म्हणून दुसरें एक घर बाधलें पाहिजे मनुष्याच्या कर्तृत्वशक्तीला उपमाच नाहीं !'

'नाना, हें वाङ्मय रचायला तुम्हाला किती दिवस लागले ?' मी म्हणालों.

'अरे, मनुष्यजात जन्मतःच लवचीक बुद्धीची असते त्यात पडलें म्हणजे सर्व काहीं जमतें. प्रथम प्रथम उसनवारी झाली थोडीशी. पण एकदा गाडी निघाली अन् प्रतिभादेवी चमकली! बाळू, हसू नकोस जाहिरात देण्यातसुद्धा प्रतिभा लागते. जाहिराती लिहिणें हें एक स्वतंत्र शास्त्र आहे.' नाना आपल्या करामतीकडे साभिमान मुद्रेनें पहात म्हणाले.

खरेंच, प्रतिभेची नानाच्यावर पूर्ण कृपा होती उद्या रस्त्यातला एखादा कारागीर हत्याराला पाणी लावण्याससुद्धा प्रतिभा लागते म्हणून दडपून द्यायचा!

'नाना, पण ही जाहिरात थोडीशी सभ्यतेला सोडून नाहीं का? यात अश्लीलपणा—' मी म्हणालों.

'दुसऱ्याला अश्लील म्हणणारे स्वत.च अश्लील असतात स्वतःचा अश्लीलपणा झाकण्यासाठीं दुसऱ्यावर तुटून पडायचें म्हणजे मग स्वतः सुटले! बाळू, माझें ऐकून घे. तसें पहायला गेलें तर तू अश्लील आहेस, मी अश्लील आहें— सारें जग अश्लील आहे. पण आपण त्याचा विचार करता कामा नये धदा म्हटला म्हणजे बाकी सर्व विचार गेले– उडाले– पळाले! धदा अश्लील नसतो. निदान असला तरी आपणास तो दृष्टिआड करावा लागतो.' नाना जोरानें म्हणाले

'नाना, तुम्हीं काय लिहिलेत याचा तुम्हाला तरी अर्थ समजला का?' मी हसून म्हणालों.

'बरोबर आहे तुझा प्रश्न! जाहिरात लिहिणाऱ्याला आपण काय लिहितों आहोंत हें समजलें कीं मग आटोपला कारभार. अरे, तुम्हा लेखकवर्गाप्रमाणें आम्ही जाहिरातदार आहोंत कोणीकडून तरी लोकाचें लक्ष वेधून घेण्याइतका आचरट मजकूर असला कीं झालें काम!' नाना म्हणाले.

'तुमची जाहिरात पाहून मनुष्य चागलाच आश्चर्यचकित व्हायचा— जशीं विमानास पाहून लहान मुलें!' मी त्याच्याकडे पाहून म्हणालों. नाना मोठ्यानें हसले.

'नाना, यात सत्याची– प्रामाणिकपणाची– शेकडा किती सरासरी?'

'जोंपर्यंत मीं नमूद केलेली किंमत मोजायला जगात वीर जिवत आहेत

तोंपर्यंत शेकडा सरासरी शेकडा! तुला त्यांतली माहिती करून देतों म्हणजे मग तुला फारसें आश्चर्य वाटणार नाहीं' म्हणून म्हणत नानांनीं मला बऱ्याच गोष्टी उलगडून सांगितल्या.

हें पृथ्वीवरील अमृत नानांनीं स्वत. शोधून काढलें होतें. (कसें तें सांगता येणार नाहीं.) असल्या तात्पुरत्या औषधापायीं क्रोडों रुपये आपल्या देशातून बाहेर परदेशी लोकांच्या खिशात पडत आहेत. ते स्वकीयांच्या पदरात पडणें अवश्य आहे. बहात्तर रोगांवर चालणारें हें एक टॉनिक होतें याचा गुण पुष्कळ लोकांना येण्याचा संभव आहे. कारण बरेचसे रोगी केवळ श्रद्धेवर जगतात जगामध्यें पुष्कळ लोक विनाकारण स्वत:ला रोगी म्हणून समजणारे आहेत त्यांची गरज पाहिली पाहिजे तसेंच, अकालीं वृद्धावस्था प्राप्त झालेले तरुण योगी हरप्रयत्न करून तारुण्यावस्था प्राप्त करून घेण्याच्या उद्योगात असतात त्यांची सोय लावली पाहिजे चार, पांच अशा लागोपाठ सोंगट्याप्रमाणें जिंकून आणलेल्या अबलांचे वृद्धरूपी यजमान आपल्याला विसरता कामा नयेत. त्यांना तारुण्याची बिजली पुन्हा चमकेल असा आशीर्वाद देण्याचें आपलें काम आहे —

कांहीं तरी काम करून जगलें तर पाहिजे? महाराष्ट्रांत आता फक्त एक धन्वंतऱ्याचाच काय तो धंदा टिकून राहिला आहे. ह्या धंद्यात आपण हात घातला नाहीं तर उद्या जीव देण्याची पाळी येईल. कबूल, अप्रामाणिकपणाचा दोष आहे त्यात! पण स्वत:ला फसवून घेण्यातच जगाला समाधान वाटत असेल तर तें समाधान आपण नको पुरवायला?

साशंक मनानें मीं नानांचें हें नवें तत्त्वज्ञान ऐकून घेतलें.

  

पुण्यात जन्म घेणारा इसम स्वत:ला चिकित्सक बुद्धीचा, शान्त डोक्याचा आणि मोठा विनोदी समजत असतो पण वास्तविक पहाता त्याच्यासारखा दुसऱ्याचा उणेपणा पहाणारा, तिस्मारखानी डोक्याचा, टवाळखोर प्राणी महाराष्ट्रांत सापडेल कीं नाहीं शंकाच आहे. आणि याच कारणामुळें पुण्यात कोणताहि धंदा नेटानें चालणें अशक्य होऊन बसलें आहे. पुण्यातलें गिऱ्हाईक पुण्यातल्या धंदेवाल्याकडे नेहमीं तिरक्या नजरेनें पहात असतें.

आणि आजपर्यंचा अनुभव असा आहे कीं पुण्यात जे धंदे आजतागाईत जीव धरून आहेत ते केवळ परगावच्या भोळ्या गिऱ्हाइकामुळें आमच्या नानाच्या बाबतींत तोच अनुभव आला !

पुण्यात एकहि बाटली खपली नाहीं. जाहिरात तरी वाचली गेली असेल कीं नाहीं याचीच शंका ! नाहीं म्हणायला एक गिऱ्हाईक आलें होतें पण पुन्हा त्या गिऱ्हाईकाचें तोंड पाहण्याची नानाची छाती नाहीं.

'हा पाक घेतल्यानें काय होतें ?' प्रश्न.

'सर्व प्रकारच्या मानसिक आणि शारीरिक व्याधि दूर होतात.' नानाचें उत्तर

'तुम्ही स्वतः हा पाक घेतला होतात का ?' प्रश्न

'मला कोणत्याच प्रकारचा रोग नाहीं ' नानाचे उत्तर.

'आश्चर्य आहे ! ऋतु पालटला कीं डोकें धरणें, ताप, थंडी, आळस इत्यादि प्रकार सर्वांनाच जाणवतात तुम्ही त्याला अपवाद आहात असें दिसतें तुम्ही आजपर्यंत कधींच आजारी पडला नाहींत ?'

'म्हणण्यासारखा नाहीं ' नानानीं उत्तर केलें

'बरोबर आहे. तुम्ही नियमित व्यायाम घेत असाल अजमासें जोर किती काढता ?' प्रश्न

'मी तसला व्यायाम सहसा घेत नाहीं आपलें शरीर सुव्यवस्थित चालण्यापुरता ' नानाचे उत्तर

'म्हणजे कोणता ?' या प्रश्नाला नानानीं उत्तर देण्याच्या ऐवजीं जरा घरात डोकावून पाहिले

'मग मी म्हणतों असलीं थोतांडें छापण्याऐवजीं व्यायाम मासिकांत तुम्ही शरीर निकोप राखण्याबद्दल एखादा निबंध का छापीत नाहीं ? बाटलीपाठीमागें चार रुपये हें जरा अवाच्यासव्वा नाहीं दिसत ? अशी अमूल्य औषधी तुमच्याजवळ काय आहे ?' प्रश्न.

'तो धंद्याचा प्रश्न आहे. तें तुम्हाला सांगण्याकरता कांहीं मी इथें बसलों नाहीं.' नानाचें उत्तर.

'तुम्ही विनाकारण का रागावता ? गिऱ्हाईक या दृष्टीनें चार प्रामाणिक प्रश्न विचारणें हा कांहीं गुन्हा होत नाहीं. आणि मी काय विकत घेतों

आहे हे मला नको कळायला ? तुम्ही जर उद्या बाजारात गोडें तेल आणायला गेलात तर वाणगट काय देतो आहे याची परीक्षा करणार नाहीं ? का गोडें तेल म्हणून डबाभर पाणी आणायला तयार व्हाल ? बरें काय हो, तुमच्या औषधाचा खप किती होतो ? रागावू नका. आपलें कुतूहल म्हणून विचारतो.' पुन्हा या प्रश्नाला नानांनीं उत्तर दिलें नाहीं

'आणि एक मामुली प्रश्न विचारू का ?' प्रश्न

नानांनीं मानेनेंच हाकार दर्शविला.

'तुमच्याविषयींचें लोकमत फारच समाधानकारक आहे बुवा ! सुटणपूरचे रिटायर्ड रेलचे इंजीनिअर— माझे लगोटीयारच म्हणा ना ! त्यांनीं तुमच्याविषयीं फारच स्तुति केली म्हणून तर मी तुमच्याकडे एक बाटली खरेदी करायला आलों आणि आय् सी एम् बुद्रके याचे क्लार्क पी चेट्टम् !— तो अन् मी नगरकिंडीला एकाच टेबलावर बसून ऑफिसचें काम पहात होतों पण हा टिवरगावकर, मुबई, कार्टीं माझ्या ओळखीचा नाहीं— त्याचा पत्ता काय ?' प्रश्न

'देतों अ' म्हणून नाना आत आले. मी आतल्या बाजूस उभा होतों.

'दे त्या गाढवाला हाकलून !' नाना सतापून म्हणाले

मी बाहेर आलों आणि शास्त्रीबोवा आघोळीला गेल्याची वर्दी दिली

'अहो, पण तुम्ही असें काय करता ? मला टिवरगावकराचा पत्ता पाहिजे !' गृहस्थ म्हणाले

'त्याना वेळ नाहीं तुमच्याशीं बोलायला उद्या या. अन् बाटली पाहिजे असली तर चार रुपये टाका नी घेऊन चला मलाहि पण बोलायला वेळ नाहीं.' मी म्हणालों.

'मग उद्याच बाटली घेईन अनायासें पत्ताहि मिळेल' म्हणून पुटपुटत स्वारी एकवार मिस्किलपणें हसून चालती झाली.

मीं ओळखलें. हें पुणेरी गिऱ्हाईक. उद्या येणें शक्य नाहीं.

त्यानतर एके दिवशीं अगदीं करकरीत तिन्ही साजाच्या वेळेला एक तरुण आमच्या घरात शिरला. कपड्यांनीं मनुष्याला मनुष्यपण दिलेलें आहे हें मला पूर्णपणें पटलें. त्यानें अडखळत अडखळत सुरुवात केली, 'माझा एक फ्रेन्ड आहे. त्याच्याकरितां एक तुमची स्पेशल द्या '

स्पेशल म्हणून हिरव्या कागदात गुडाळलेली एक बाटली मीं त्याच्या-पुढें केली

आणि आठ रुपये टाकून ती त्यानें नेली परमेश्वर जाणे त्याला त्या बाटली-पासून काय उपयोग झाला तें ! खात्रीनें ही मित्राची कहाणी म्हणजे एक थापाथापीचा प्रकार होता. तें तुम्हाला मनुष्याच्या चर्येवरून तात्काळ ओळखता येतें. मनुष्याचे डोळे त्याचे शत्रु होत !

नानाना हें कळताच त्यानीं या औषधाचे भाकीत करण्यास सुरुवात केली.

जगातल्या तरुण मडळींना हें औषध जीव कीं प्राण होऊन राहील. ज्या-प्रमाणें हिंदुस्थानच्या वाट्याला असले मित्रप्रेमी तरुण आलेले आहेत त्या-प्रमाणे इग्लडच्याहि वाट्याला येतील मित्रप्रेम जगभर पसरलें आहे. मित्र-प्रेम जगात आहे म्हणून तर ८ रु चा शक्तिवर्धक पाक आयुष्यात एक गरजेचा विषय होऊन बसलेला आहे. मित्राचें कल्याण व्हावें असें कोणाहि मित्रास वाटणारच ! अन् बाटल्या खपणारच ! काहीं दिवसानीं हा धदा वाढविणें भाग पडेल शाखा ! सोल एजन्ट ! गावोगाव एजन्ट ! लडनला एक शाखा न्यूयार्कला एक शाखा मास्कोला एक शाखा. जिनिव्हाला एक शाखा एडनला एक शाखा ! अन् पुण्याला एक मध्य ऑफिस ! साठ हजार तरुण पदवीधराना कामच काम देशात पुढारलेल्या समाजाची अन्नाची हाकाटी दूर झाली राष्ट्रीय धदा. हिंदी करामत. हिंदी मजूर. हिंदी भाडवल आता सर्व धदे स्वदेशी होण्याची पाळी आली आहे.

आणि जाहिराती ?— खरोखरीच तें एक स्वतत्र शास्त्र आहे जाहिरात म्हणजे 'पाहिजे'ची नोटीस नव्हे जाहिरात म्हणजे 'गृहसस्कार' नव्हे ! जाहिरात म्हणजे जाहिरात !

नानाचा हा आशावाद त्याच्या नेहमींच्या स्वभावास साजेसा होता यात शका नाहीं. हातात हात अडकवून, ती हाताची जुडी (मेरे प्यारे भाईओं और भगिनिओं ! या अवसानात) छातीवर टाकण्याची त्याची लकब बघून घेण्यासारखी होती. आणि हें वरचें भाषण जवळ जवळ शून्यतेला उद्देशून झाल्यासारखें असल्यामुळें मीं मध्यें बोलण्याचें धाडस केलें नाहीं. एकदम नाना जागे झाल्याप्रमाणें मला उद्देशून म्हणाले, 'बाळू, आपण एक मोठी चूक करतों आहोंत—केवढी ही चूक ? सबध धदा एखाद्या फुग्याप्रमाणें फुटून जाईल.'

मी काहींच बोललों नाहीं. माझ्या दृष्टीनें नानाचें अस्तित्व हीच मुळीं विधात्याची चुकी होती

'टपाल खर्च माफ! आपण हें कलम अजिबात विसरलों होतों! तीन बाटल्या एकदम मागविणारास ट ख माफ! कोणताहि मनुष्य तीन बाटल्याची किमत देण्यास तयार होईल पण हा वरचा ट ख देताना मात्र त्याच्या कपाळावर आठ्या पडल्यावाचून रहाणार नाहींत. शभर मैल प्रवास करणें असेल तर ९९ मैल काहीं वाटत नाहीं पण शेवटचा मैल अत्यत तापदायक वाटतो. ट.ख माफ! उद्या नवी जाहिरात '

माझ्या अगावर काटा उभा राहिला।

* * *

मी इटर पास झालो. हें वाक्य लिहिताना मला कोण कौतुक वाटतें आहे!

पण ज्यूनिअर वर्षांचा मनमुराद उपभोग घेण्याचे माझ्या नशिबीं नव्हतें. आणि नाहीं तरी चैन म्हणजे तरी काय?— कुठल्या तरी लग्यासुग्या जागेकरता निवडून येणें, चारदोन कळवट दाताच्या पोरींशीं सलगी दाखवणें, सायकलवरून त्याच्या घरीं खेटे मारणें— वगैरे वगैरे

माझी चैनीची व्याख्या म्हणजे दोन शेर शेंगा आणून एकट्यानें त्या खाणें!

पण तीसुद्धा चैन नानानीं मला उपभोगू दिली नाहीं.

नानाच्या जाहिराती खरडणें हीच माझी चैन बनू लागली

अत्यत महत्त्वाची जाहिरात म्हटली म्हणजे नाना माझा सल्ला घेत असत.

'ह लिही वरती— 'श्रीसिद्धेश्वरमहाराज प्रसन्न!' नाना शुद्धलेखन सागू लागले.

'पुढें 'उद्धरेत् आत्मना-मानम्' 'चिंतासम नास्ति अन्यद्रोग'.'

'आता कशाला काळजी करता? काळजी करण्याचे दिवस गेले— पळाले महात्मा योगी जडजोगेश्वर याजकडून हिमालय, काश्मीर गुफेंतून ५७ वर्षें भ्रमण करूनच ही जडी व तात्रिक कवच मोठ्या मेहनतीनें आणि तपश्चर्येनें मिळविलेले आहेत. याचे योगानें सर्व कामना परिपूर्ण झाल्याच पाहिजेत यात तिळमात्र सशय नाहीं. मात्र ज्यांना विश्वास असेल त्यानींच

मागवणें. ज्या नरास श्रद्धा, भक्ति, भाव नसेल त्यानें विनाकारण तसदी घेऊ नये. कारण त्याप्रमाणें आमच्या योगीमहाराजांनीं आज्ञा केली असे.

सूचना — हें आरोग्यासाठीं अपूर्व वस्ताद गुणी आहे.

ता. क.— काम सिद्ध न झाल्यास पैसे परत करू.

सूचना — वकील लोकांनींसुद्धा याचा उपयोग केला तरी चालेल. खटले मिळतील.

ता क.— ताबूराज करमली, मु येरपर्लें, पो. टोरकीटक येथून ता. १ नव्हेंबरच्या पत्रात लिहितात— चमत्कार आहे ! विश्वास बसला. जशी प्रशसा तसा मजा आला आता आणखी एक मजसाठीं आणि दुसरी आमच्या हिच्यासाठीं ताबडतोब धाडून देणे

मीं लेखणी खालीं ठेवली आणि कौतुकानें नानाच्याकडे पाहू लागलों.

'बाळू- धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचें आदिकारण मनुष्यदेह होय परतु तो निरोगी आणि बलवान् असला तरच त्याजकडून हे पुरुषार्थ साध्य होतील ह्यात मनुष्याच्या ऐहिक आणि पारमार्थिक सुखाचा साकल्येकरून अतर्भाव होत असल्याकारणानें त्याच्या प्राप्तीसाठीं प्रयत्न करणें हें मानवाचें कर्तव्य आहे. पण व्याधिग्रस्त पुरुषाकडून हें साध्य होणें कठिण आहे— नव्हे अशक्य आहे करिता व्याधि दूर केली पाहिजे. आणि म्हणून ह्या जडी ताईताचा जन्म !' नाना गभीरपणानें म्हणाले.

'शेवटच्या वाक्याखेरीज इतर वाक्यें मला पूर्णपणें कबूल आहेत. मनुष्यानें रोगरहित रहावें हें कांहीं नव्याने सागायला नको. पण प्रश्न आहे तो हा कीं तुमच्या या लुच्चेगिरीने तें कितपत साध्य होईल. उलट एखादा साधाभोळा जीव वैतागून आत्महत्यासुद्धा करायचा !' मी म्हणालें.

'हें ज्याचें त्याचें मनोदौर्बल्य !' नाना म्हणाले.

'आणि ह्याला कारण तुम्ही ! मनुष्याच्या भाविकपणाचा फायदा घेऊन त्याची सर्वस्वीं हानि करणारे लोक तुम्ही नाहीं तर कोण ? वैतागलेल्या जीवाला काडीचा आधार वाटत असतो. पण त्याला आधार देण्याचें आपल्या मनात असेल तर खरोखरीची काडी पुढें करून भागणार नाहीं.' मी म्हणालों.

'पण बाळू, मला हें समजत नाहीं कीं लोकांनीं काडीच्या आधाराची

तरी का अपेक्षा करावी ? मनुष्य हा जर प्रयत्नवादी प्राणी आहे तर त्यानें नशिबाची लगडी सबब पुढें का करावी ? आम्हा ताईतवाल्याचा हा दोष नसून नशिबावर हवाला ठेवून कुजणाऱ्या किड्याचा हा दोष आहे. तुम्ही जर स्वतःला फसवून घेण्यास तयार आहात तर आम्ही तुम्हाला फसवायला तयार आहोंत !' नाना म्हणाले

'पण असे करण्यात तुम्ही मानवजातीची सुधारणा कुचंबत ठेवता आहा. पुढें पाऊल पडूं लागलेलें दिसताच तुम्ही दोरखंड घेऊन धावता.' मी म्हणालों.

'बाप रे ! तुला मानवजातीची सुधारणा दिसते आहे काय ? पण बाळू, लक्षात ठेव कीं मीहि पण तुझ्याचप्रमाणें डोळे उघडून जगाकडे पहातों आहें मानवजातीच्या सुधारणेस जर कोणी शत्रु असेल तर तो खुद्द परमेश्वरच होय !—बरें, पण ती जाहिरात नेहमींप्रमाणें जाऊ दे.' नानांनीं चांगलाच डोझ पाजला होता

* * *

नानाच्या म्हणण्याप्रमाणें खरोखरीच का आपण हा लपडावाचा खेळ खेळतों आहोंत ? आणि मानवांच्या उद्धाराची कळकळ बाळगणारे स्वतः असेच गंडेदोरे ताईतवाले आहेत कीं काय ? असें असेल तर विश्वास तरी कुणावर ठेवावा ?

नानाचा आशावाद बऱ्याच अंशानें प्रत्ययास आला. इंग्लंड वगैरे राष्ट्रांना आमच्या औषधाची गरज पडण्याचें कारण नव्हते, त्यांचे बांधव त्यांचे हित पहायला समर्थ होते पण हिंदुस्थानात मात्र आमच्या औषधाचा खप कल्पनेबाहेर झाला.

त्यात मौज पहाण्यासारखी होती. एकदा आलेलें गिऱ्हाईक पुन्हा तोंड दाखवीत नसे कीं स्वतःची झालेली शोभा दुसऱ्याला सांगण्याचा त्याला धीर होत नसे.

मोठे लोक आपल्याच महत्त्वाचें चिंतन करीत असतात. त्यांना आमच्याकडे पहाण्याची मुळींच इच्छा नव्हती आणि आम्हालाही पण त्यांच्याकडे पहाण्याची दुर्बुद्धि झाली नाहीं. एखाद्या वाकड्या केसाच्या जमादाराला श्रीमंत, जहागीरदार, राजेरजवाडे यांच्याकरतां केलेल्या स्पेशल

बाटलीचा पुरवठा केला कीं त्यात त्याचा गौरव आणि आमचे ८ रु. वसूल!

आम्हाला शत्रु म्हणजे हे विलायती शिक्षणाचे डॉक्टर लोक. पण त्यालाहि तोड होती. ह्या लोकाच्या विरुद्ध तोडगा म्हटला म्हणजे आयुर्वेदाची हाकाटी. आम्ही पूर्णपणें आयुर्वेदाला धरून होतो (निदान नानाचें तरी तसें म्हणणे होतें) पुन्हा विचार असा करावयाचा कीं इतके पैसे बेडकाची चिरफाड करण्यात घालवायचे पण त्याप्रमाणें ज्ञानाचा पुरवठा नाहीं! आणि जोंपर्यंत आपल्या देशातल्या डॉक्टर लोकाना बाहेरच्या देशात मिळावा तसा मान मिळत नाहीं तोंपर्यंत आमच्यासारख्या आयुर्वेदवाल्याना दुखवून घरात एक शत्रु निर्माण करण्याचे त्याना मुळींच परवडणार नाहीं. आम्ही त्या बाबतींत पूर्णपणें निर्धास्त होतों.

त्यातून आमचें बरेंचसे काम पत्रव्यवहारानें चाले तोंडी जी गोष्ट सांगायला मनुष्याला महिनेन् महिने विचार करावा लागतो ती गोष्ट पत्राने चट्दिशीं होते. खासगी अडचणींचा सविस्तर खुलासा आमच्याजवळ करण्यात लोकाना फारसा त्रास पडत नव्हता अर्थात् त्याच्या अडचणी वाचून आमचा करमणुकीपेक्षा निराळा फायदा होत नव्हता हे निर्विवाद आहे.

औषधाच्या आणि ताईताच्या खपाबरोबर आमची सांपत्तिक स्थिति सुधारली. बाळगोपाळाच्या बरोबर मीं स्वतःस एक नवी टोपी विकत घेतली. वहिनींनासुद्धा किरकोळ खर्चाकरता म्हणून दहाची नोट महिन्याकाठीं मिळू लागली.

आणि ही आमची सुस्थिति कशाच्या जोरावर उभारली गेली होती! प्रामाणिकपणानें महिनाभर खपून ६० रु मिळवणारा जीव अप्रामाणिकपणानें जगात वावरू लागला आणि तो महिना ६०० रु. कमावू लागला!

जगामध्यें जर काहीं करणेंच असेल तर तें परमेश्वराचें भजन-पूजन नव्हे, जगामध्यें दुसऱ्याच्या भोळेपणाचा फायदा घेण्यास शिकलें पाहिजे. थोडासा प्रयत्न केला असता ही धूळ पसरण्याची कला साध्य होते!

आणि त्याच वर्षीं नानाना एक गौरवपर पत्र आलें. आयुर्वेदाचार्यांच्या समितीला नानाना आमंत्रण आलें होतें.

'बाळू, आपण आपल्या जन्मदात्यांचें नाव काढतों आहोंत.' नाना

अभिमानानें म्हणाले.

'नाना, माझें ऐकाल तर तुम्ही कार्यबाहुल्याची सबब सांगून या भानगडींतून आपलें अंग काढून घ्या. कारण, या लोकांशीं खेळणें सोपें नाहीं ' मी म्हणालों.

'पण त्यामुळें आपल्या धंद्यावर परिणाम होईल ' नाना म्हणाले

'परिणाम होईल, पण तो चांगला होणार नाहीं. नाना, कोणत्याहि गोष्टींत भरभराट होत गेली तरी त्या भरभराटीचा मद आपल्या डोळ्या वर चढतां कामा नये हें मीं तुम्हाला कशाला सांगायला पाहिजे ! आपण हा धंदा केवळ फसवेगिरीच्या तत्त्वावर चालविलेला आहे. आणि ही गोष्ट केव्हाहि दृष्टिआड करून चालणार नाहीं ' मी म्हणालों

'पण त्यांत आपण लोकांच्या गैरसमजास विनाकारण वाव देतों आहोंत. मला गेलें पाहिजे.'

'विचार करून जा. समिति ही जाहिरात नव्हे आपलें बिंग बाहेर फुटण्याची मला खात्री आहे जन्मदात्याच्या नावाकरतां हें साहस करू नका. मेले ते गेले आतां आम्हा जित्याच्या नावाकरतां तरी तुम्ही तो विचार सोडून द्या.' मी निर्वाणीच्या आवाजांत म्हणालो

नाना त्या समितीला गेले नाहींत. पण त्यांच्या मनाला ती गोष्ट लागून राहिली. समितीचे कार्यक्रम वाचण्यांत त्यांना जेवणाचीहि शुद्ध नसे. आम्हाला त्याची शुद्ध असल्याकारणानें ते उपाशी राहिले नाहींत.

जगांतील कीटकांकडे पाहण्यास आम्हाला फुरसत नव्हती. केवळ धाडसानें आम्ही पुढें सरसावलों होतों. आणि आम्हीं अखेर गांठली होती.

आणि एकाएकीं अकस्मात् आम्हाला एक प्रतिस्पर्धी उभा राहिला.

आमच्या नेहमींच्या जाहिरातीखालींच दुसऱ्या एका 'काश्मिरी हिमा-लयामृत' पाकाची जाहिरात होती अर्थातच आश्चर्यानें मीं ती जाहिरात वाचली.

सदरहू जाहिरात इतर जाहिरातींप्रमाणेंच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

लहान मुलें तें औषध हौसेनें घेत असल्याचें नवलवृत्त आपल्याला ती जाहिरात कथन करीत होती. शिवाय इतर औषधें घेऊन निराश झालेल्या

जीवाना हें औषध म्हणजे स्वर्गलोकींची सजीवनी होय हेंहि पण तींत नमूद केलें गेलें होतें. आशेचा किरण न दिसणाऱ्या आधळ्याना हा केवळ सूर्यच होय हजारों लोक वाचल्याबद्दल पुरावाही पण थोडाथोडका नव्हता. नकली औषधापासून सावध रहाण्याचा इशारा होता. प्रत्येक कुटुबात हीं औषधे पाहिजेत हा आग्रहाचा सल्ला होता. आणि मोठ्या कळवळ्यानें विचारलें होतें कीं क्षुल्लक कारणाकरता डॉक्टरकडे जाऊन वेळ आणि पैसा याची का खराबी करता ? 'धिक्काराल तर क्षीणता राखून ठेवाल थोडक्या खर्चासाठीं व्यर्थ क्षीणता राखू नका खऱ्याची दुनिया आहे काय पाहू ! औषधाच्या गुणानुभवाबद्दल शेकडों सर्टिफिकीटा मिळाल्या आहेत आणि मिळतहि आहेत '

आणि कोणत्याहि दोन बाटल्यास ट ख माफ.

नानाच्या करामतीवर ही ताण होती. एवढेंच नव्हे तर नानाना चारी मुड्या चीत करण्याचा हा पेंच होता.

नानानीं ती जाहिरात वाचली. त्याचे निराळेच विचार वाहू लागले.

'बाळू, नक्कल निघू लागली कीं अस्सलाला एक प्रकारें जोर चढतो. दोन बाटल्याना यानें ट ख माफ केला आहे तर आपण एक बाटलीला सुद्धा ट ख माफ करू !' नाना म्हणाले

सध्याकाळीं नाना घरीं आले तों रागानें त्याचा शब्दसुद्धा वड उमटेना सगळ्या जुन्या शिव्या ! पण वीररसाचें नुसतें थैमान माजून राहिले

'निव्वळ सोदेशाही फरस झाडण्याच्या खराट्यानें या चोराना झोडपून काढलें पाहिजे नाहीं तर याच्या तोंडावरून पोतेरें मारलें पाहिजे याचें पेकाट मोडून टाकलें पाहिजे. हात तोडून टाकले पाहिजेत. नाक ठेचून टाकलें पाहिजे. अन् तोंडात शेंदूर कोंबला पाहिजे.'

'पण कायद्याकडे दुर्लक्ष करून कसें चालेल ?' मी हळूच म्हणालों.

'कायदा ? या लोकाना कसलाच कायदा उपयोगीं पडणार नाहीं. याचीं पावलेंसुद्धा उलटीं आहेत. याना बाजारात दीडदमडीचीसुद्धा किंमत मिळणार नाहीं.' नाना उसळून म्हणाले

'नाना, काय झालें तरी काय ?' मीं वैतागाने चिडून म्हटलें.

'काय झालें ? काय झालें नाहीं म्हणून विचार.' नाना आवेशानें म्हणाले.

'बरें तसें विचारतों. पण काय झालें तें आधीं सागा आणि नतर काय झाले नाहीं या प्रश्नाचें उत्तर द्या !' मी म्हणालों.

'बाळू, जग म्हणजे चोराचा बाजार ' नाना म्हणाले

'पण आपणहि त्याच बाजारातले चोर आहोंत जगाची मागाहून चौकशी. आधीं—' मी म्हणालों.

'तुला आठवतें आहे ? अगदीं सुरवातीला तो गृहस्थ माझ्या व्यायामाची चौकशी करून गेला ? किती जोर काढता म्हणून विचारलें त्यानें ! ह ! तोच तो हरामखोर. काश्मिरी हिमालयामृत काढतो काय ? अन् दोन बाटल्याना ट.ख माफ ! साभाळ चोरा, साभाळून रहा.' नाना म्हणाले.

* * *

चढाओढीस चागलेंच तोंड लागलें.

नानांनीं आता जाहिरातीमध्यें इतर औषधाचा फोलपणा सिद्ध करण्यास सुरुवात केली आणि स्वत ची भरमसाट स्तुति चालू केली. एक चित्रही पण तयार केलें त्यात एक अस्मानची परी पख वगैरे लावून आकाशांतून उडत असताना दाखविली, आमच्या पाकाच्या बाटल्या तिच्या हातात दिल्या, खालच्या बाजूस अठरापगड जातींचा एक समुदाय वर तोंड करून उभा असलेला दाखविला, आणि बाटल्याच बाटल्या खालीं येत होत्या. एक हत्तीच्या पायाचा मनुष्य बाजूला उभा राहून या नितान्तरम्य दृश्याकडे आपलें लक्ष वेंधून घेण्याचा प्रयत्न करीत होता आणि स्वतः याच बाटल्या घेऊन प्रसन्नचित्त झाल्याचें कबूल करीत होता.

पण महिन्याचा आढावा काढताच निराळाच देखावा दिसला. जाहिरातींचीं बिलें वजा करता २०० रुपयाच्यावर प्राप्ति दिसेना.

आणि याला कारण तो चोर ! काश्मिरी हिमालयामृतवाला दरोडेखोर !

नानानीं पुन्हा एक जाहिरात दिली. तींत 'आमच्या वाढत्या खपामुळें हें साहस करण्याची आम्हास स्फूर्ति झाली आहे. यापुढें साध्या बाटलीस दोन रु. आणि स्पेशल बाटलीस चार रु. याप्रमाणें अल्प किंमत घेण्यात येईल. गोरगरिबाना ही अमूल्य दवाई मिळावी म्हणून किंमत स्वल्प करण्यात आली आहे. म्हणून औषधात फेरबदल होईल ही शका बाळगण्याचें यत्किंचित्‌ही कारण नाहीं आम्हाला गोरगरिबाच्या मुक्या मुरगाळण्याची

मुळींच इच्छा नाहीं. इतर लोकाप्रमाणें आम्ही सट्टेबाजी करणारे नाहींत. आमच्या ग्राहकाचें जें हित तेंच आमचें हित एक बाटलीस ट. ख. माफ' इत्यादि आश्वासने दिलीं होतीं.

आणि शिवाय आमचें औषध खोटें ठरविणारास २०० रु. इनाम देण्याचें नानानीं जाहीर केलें होतें आणि बारा बाटल्या एकदम घेणारास ट. ख माफ होईलच शिवाय वर इनाम म्हणून एक बाटली मोफत देण्याचें आश्वासन दिलें होतें

'बाळू, आता मात्र it's a hot bed for him ! नाना म्हणाले.

आमच्या प्रतिस्पर्ध्यानें निराळीच टूम काढली

'आमच्या खरेपणाची खात्री पटवून देण्यासाठीं आम्हीं एक नवीनच शक्कल काढण्याचा विचार केला आहे. दोन आण्याचीं तिकिटें पाठवल्यास आम्ही एक सापल बाटली धाडण्यास तयार आहोंत आठ दिवस पुरण्याजोगें अमृत तींत भरलेलें आहे.'

ही जाहिरात वाचताच नाना उद्वेगाने म्हणाले, 'काय ही पोरसवदा थट्टा ! सापल बाटली ! बाळू, आपल्या औषधावर एक जडी ताईत देण्याचें आपण करू '

प्राजलपणानें कबूल करणें भाग आहे कीं आम्हीं फसवलेलें गिऱ्हाईक पुन्हा आमच्या हातून फसवून घेण्यास तयार नव्हतें. काश्मिरी हिमालयामृतवाला त्याना आता देवासमान वाटत होता

'नाना, यातून मार्ग काढायला एक उपाय आहे.' मी एके दिवशीं म्हणालों.

'एक का हजारों आहेत ! थाब. असा चीत मारतों.' नाना म्हणाले.

'छे ! नाना, आपल्याला एक ध्यानात ठेवल पाहिजे कीं काहींही झालें तरी आपण एकदम लठ्ठालठ्ठीवर येता कामा नये ! आपसातील यादवी आपसातच मोडून टाकण्यात धंदेवाल्याचें शहाणपण दिसतें.' मी म्हणालों.

'म्हणजे त्या अक्कलशून्याला—त्या शेंगाखाऊला— मीं शरण जावें असेंच तुझें म्हणणें कीं नाहीं ?'

'हा वस्तुस्थितीचा विपर्यास आहे. मी असें मुळींच म्हणत नाहीं. उलट माझें म्हणणें हें कीं त्याला आपण हें शहाणपण शिकवण्याचा आव आणू.' मीं म्हणालों.

'यव रे मेरे भाई ! त्याला आपण जेवायलाच बोलावू. स्नेहासवघार्ची बोलणीं सुरू करू. प्रथम त्याचे स्तुतिपाठ गाऊ आणि नतर—' नाना हर्षोत्फुल्ल मुद्रेनें म्हणाले.

माझ्या म्हणण्याप्रमाणें नानानीं त्या गृहस्थाला पत्रानें आमत्रण धाडलें, आणि त्या गृहस्थानें आमत्रण स्वीकारले.

आम्हीं त्याची योग्य ती बरदास्त राखली पाय धुवायला ऊन पाणी, पुसायला पाडरा स्वच्छ टॉवेल, जेवायला मव्वा हात केळीचे पान— साधुसत येती घरा तोचि दिवाळी दसरा ! आमच्या कुटुबातील बाळगोपाळाचीही माहिती त्याला करून दिली.

'आणि हा आमचा सदू— मोठा नशिबवान !' नाना अभिमानानें म्हणाले.

सदूनें गैरसमज करून घेऊन भोकाड पसरले

आणि दवाखान्याच्या सीमा त्याला दाखवण्यात आल्या

नतर मूळ मुद्यावर भाषण सुरू झालें

'म्हटले, अनायासे आपली ओळखही होईल सहवासानें आपुलकी वाढते तें काहीं खोटे नाहीं आता तुम्ही आम्ही धद्याच्या दृष्टीने कोणीही असलो तरी खासगींत आपण मित्रपणच कायम राखलें पाहिजे ' नाना डोळे किलकिले करून म्हणाले

'केव्हाही ! केव्हाही !' म्हणून म्हणत स्वारी पान चघळू लागली.

'दिवस मोठे कठीण आले आहेत कोणताही धदा चालवू म्हटलें तरी अडचणी फार. त्यामुळे धदा प्रामाणिकपणानें चालवणे जवळ जवळ अशक्य होऊन बसल्यासारखे झाले आहे पुन्हा परस्परातील चढाओढी अत्यत त्रासदायक विनाकारण पैशाची उधळपट्टी ' नाना म्हणाले.

'ह ह ह' म्हणून मारुतिरायाप्रमाणें स्वारी हुकारली.

'आता आपलेंच पहा ना ! किती जाहिरातीचा खर्च झाला ! अन् कशाकरिता ?' नाना म्हणाले.

'ह ! मी तेच म्हणतों कशाकरिता ?' धन्वतरी आश्चर्यानें म्हणाले.

'हे वर्तमानपत्रवाले तर आपल्याला लुबाडण्यालाच बसलेले आहेत. कायम जाहिरातींनासुद्धां मिळावी तशी सवलत नाहीं. अशानें स्वदेशी धदे चालावे तरी कसे ?' नाना म्हणाले.

‘खरेंच हो ! चालावे कसे ?’ म्हणून आमच्या प्रतिस्पर्ध्यानें आश्चर्य प्रकट केलें.

‘सुधारलेल्या देशातून मात्र धदे चागले चालतात. आता त्याच्याकडे-सुद्धा आपल्यासारखीं औषधें थोडींथोडकी का आहेत ? पण आपल्याप्रमाणें त्याचा जीव धोक्यात पडत नाहीं ’ नाना म्हणाले.

‘सरकार ! सरकार ! सरकारचा त्याना पाठिंबा आहे.’ आमचे पाहुणे म्हणाले

‘सरकार ? कदाचित् असू शकेल पण मुख्य गोष्ट निराळीच आहे. मीं त्या कारन्याचा थोडासा अभ्यासच केला आहे म्हणानात !’ नाना त्याच्या-कडे प्रश्नार्थक मुद्रेने पहात राहिले

‘बर, म्हणा !’ या मुद्रेनें तो सद्गृहस्थ नानांच्याकडे पाहू लागला.

‘त्या लोकाचे धदे टिकण्यास एकच कारण आहे. आणि तें म्हटलें म्हणजे त्याचा सर्व व्यवहार जॉइट पद्धतीनें चालतो एक एका कपनींत हजार बाराशें मजूर काम करतो. सल्लागारमडळ पैसे मोजून ठेवण्याची त्याची तयारी असते.’ नाना म्हणाले

‘चाललें आहे पश्चिम आणि पूर्व एक होणे कधीं तरी शक्य होईल का ?’ तो गृहस्थ म्हणाला

मीं पाहिले कीं नानाना पुरून उरणारा हा गृहस्थ होता. मी मध्येंच म्हणालो,

‘का बरें ? धद्याचीं मूलभूत तत्त्वे सर्व ठिकाणीं सारखींच लागू पडतात. आता आपणच प्रयत्न करून पाहू तुमचे आणि आमचे हितसबध एक करू या ’ मी म्हणालों

‘तुमचें भाडवल किती ?’ सद्गृहस्थानें प्रश्न केला.

‘तुमचें किती ?’ नानानीं प्रश्न टाकला.

‘हें पहा. भाडवलाचा प्रश्न तूर्त बाजूला ठेवू. सध्या आपली दिलजमाई करू आणि गोडीगुलाबीनें दोन धद्याचा एक धदा करून टाकू.” मी म्हणालों.

‘औषधाचें नाव मात्र माझें कायम राहील.’ तो गृहस्थ निश्चयानें म्हणाला.

'त्याला एक उपाय आहे—तुमचेंहि नाव नको आणि आमचेंहि नको. नवीन नाव. 'नैनिताल तिबेटामृत' हें नाव कांहीं कमी जोरदार नाहीं ' मी म्हणालों.

'पण त्यात माझी नाचक्की नाहीं का होणार ?' तो गृहस्थ म्हणाला.

'आणि आमचीहि पण नाहीं का तितकीच होणार ? हें पहा. धंदेवाल्या इसमाची आणि अब्रूची कायमची फारकत असते. आणि नाव बदललें म्हणून औषधाच्या गुणामध्यें थोडाच फरक होणार आहे ?' मी हसून म्हणालों

'हें तुमचें विधान थोडेंसें कुत्सितपणाचें आहे. तसें पहायला गेलें तर तुमच्या तरी औषधाचा काय एवढा मोठा गुण लागून राहिला आहे ?' सद्गृहस्थ किंचित् चिडखोर आवाजानें म्हणाले

'मनुष्यानें स्वतःच्या पायाखालीं काय जळतें आहे याची आधीं नीट चौकशी करावी.' नाना म्हणाले.

'कांहीं कांहीं माणसाना स्वतःच्या वाक्पाण्डित्याची मोठी घमेंड असते.' गृहस्थ म्हणाले.

'आणि काहींना नुसतीच घमेंड असते ' नाना म्हणाले

मी पुन्हा मध्यें पडलों.

'हें पहा आपलीं हीं दोन्ही औषधें तशींच चालू ठेवावींत. पण तिसऱ्याच नावाखालीं आणखी एखादें निराळें औषध आपण पातींत सुरू केलें तर काय हरकत आहे ?' मी म्हणालों

'तरुण मनुष्या, तुला नवीन औषध चालवणें म्हणजे कॉलेजातल्या एखाद्या नवीन पोरीच्या नावाची चौकशी करणें वाटलें काय ?' सद्गृहस्थ म्हणाले.

त्यानतर नानानीं त्या गृहस्थाला आपलें मत ऐकविलें. आणि त्या गृहस्थानेंहि पण नानाना स्वतःचें मत ऐकविलें.

अशा तऱ्हेनें परस्परमतें कळविल्यावर मैत्रीला काय बाध येणार ?

माझ्या अपेक्षेप्रमाणें लवकरच एक खरमरीत पत्र आमच्या नावावर आलें.

'सा. न. वि. वि आपणास मी पत्र लिहिण्याचीसुद्धा आपली लायकी नाहीं. पण केवळ सद्धेतूनें प्रेरित होऊन मी हें आपणांस कळविण्याचें धाडस

करण्यास उद्युक्त झालों आहें. मध्यतरीं मी मलेरियाच्या आजारानें बराच क्षीणशक्ति झालों होतों इतर सर्व औषधें घेऊन बसलों. पण शेवटीं आपल्या सत्यतेची परीक्षा पाहाण्याकरता आपलें एक बाटलीभर औषध आणि एक ताईत अशा दोन वस्तु मुद्दाम मागविल्या. ताइताचा एकच फायदा झाला. आणि तो म्हणजे माझ्या बहिणीच्या नवऱ्याचा मृत्यु ! आणि औषधासबधीं एकच सूचना करावीशी वाटते. ती ही कीं आता यापुढें निवडुगाच्या बोंडाचा उपयोग न करण्याची खबरदारी बाळगावी. मी स्वत॰ डॉक्टर असल्यामुळें मला तेव्हाच सशय आला आणि मीं औषधाचें पृथक्करण केलें आपल्या आचरटपणापुढें हात जोडले आता एकच सूचना करतों कीं जर दोन महिन्याच्या आत तुम्ही हा आचरटपणा न थाबवाल तर— पण तें मी आत्ताच बोलू इच्छित नाहीं. कळावें. आपल्या लोभाची मला मुळींच गरज नाहीं.

आपला
**डॉ. पिसाटे**

मीं नानाच्या हातात पत्र टाकलें.

पत्रामध्यें उल्लेखिलेल्या गोष्टींवरून मीं तत्काळ ओळखलें कीं आमच्या प्रतिस्पर्ध्यानेंच दुसऱ्याच्या नावावर ही धमकी स्वतःच पाठवली असावी.

कारण, कोणताहि डॉक्टर प्राण गेला तरी आमच्या रामबाण औषधाना शिवणार नाहीं. आणि ताईत मागवणारे प्राणी धद्यानें डॉक्टर म्हणून म्हणवत असतील ही कल्पनाच मुळीं सभवनीय वाटत नाहीं. आणि जरी आमच्या औषधाचें पृथक्करण केलें गेलें तरी ते शोधून काढायला एखादा डॉक्टरच पाहिजे होता असें नव्हतें तसेंच जरी आमच्या लबाडीविषयीं सशय आला असला तरी डॉक्टर आपले रोगी सोडून आमचे प्राण कशाला घेईल ? कारण, एक प्रकारें आम्ही डॉक्टर लोकाचे हस्तकच आहोंत. निरोगी मनुष्याला रोगी बनवण्याचें काम आमचें. एरवीं कोणते गामा-कल्लु डॉक्टरांच्या पायां पडायला जातील ?

आणि हें प्रत्येक डॉक्टरला माहीत असतें आणि म्हणूनच आमचे पाक खपतात. नानानींहि पण ह्या पत्रातील डॉ. पिसाटे ही व्यक्ति कोण हें तात्काळ ओळखलें.

'पण मला आश्चर्य वाटतें कीं निवडुगाच्या बोंडाची याला कुणीं माहिती दिली ?' नाना म्हणाले.

'नाना, जग बोळ्यानें दूध पितें अशी का तुमची कल्पना आहे ? ही गोष्ट मलासुद्धा माहीत होती तुमच्याकडे बोंडें घेऊन येणाऱ्या महारावर पाळत ठेवली म्हणजे--' मीं हसून म्हटलें.

'या पत्राचें काय करायचें ?' नाना पत्राकडे पहात म्हणाले.

'वा ! आता चोरावर मोर ! हेंच पत्र जाहिरातींत द्यायचें. फक्त आपल्याला अनवश्यक असा मजकुर गाळायचा आणि ताइताचा चमत्कार म्हणून—' मी म्हणालों.

'माझ्या बहिणीच्या नवऱ्याचा जन्म झाला म्हणून दडपश्चमे करायचें !' नाना म्हणाले.

'वा ! खासा रोजगार नाना, आज तुम्ही शुद्धींत आहात का ? नवऱ्याचा जन्म बायकोच्या जन्मानतर होत असतो वाटतें !' मी हसून म्हणालों.

'खरेंच. बोलण्याच्या नादात अगदींच घसरत होतो मग त्या जोडप्याला एखादा मुलगा झाल्याचें लिहिलें तर !' नाना पत्राची घडी करीत म्हणाले.

'एकाच्या ऐवजीं दोन म्हटलें तरी अधिकस्य अधिक फलम् !' मीं उत्तर केलें.

'आमच्या खरेपणाचा हा पहा ताजा अस्सली नमुना' म्हणून दुसऱ्या दिवशींच्या जाहिरातींत उपरिनिर्दिष्ट पत्राचा गोषवारा देण्यात आला

औषधाच्या आयुष्याची मुदत सपल्याचें थोडक्याच दिवसात स्पष्टपणें कळून आलें पण लबाडी का होईना, आजवर जीव लावून केलेल्या धद्याबद्दल कोणालाहि प्रेम वाटणारच. आणि अगदीं शेवटचा म्हणून प्रयत्न करून पाहिला.

पण पुढच्या महिन्यात एकहि बाटली खपली नाहीं आणि यापुढें खपेलसें लक्षण दिसेना. साहजिकच प्रश्न येऊन पडला कीं आता पुढें काय करणार ?

'हिंमत मर्दा तो मदत खुदा. बाळू, डरू नकोस. दोन आण्याला बाटली गेली तरी त्यात आपला फायदाच आहे. आणि त्यातहि खोट आलीच तर

—तर पाहू पुढें.' नाना म्हणाले

आणि 'दोन आण्याला साधी, चार आण्याला स्पेशल' इत्यादि मजकूर मी खरडत असता वहिनींनीं मला हाक मारली

'भाऊजी, सदूला ताप आला आहे तेव्हा म्हटल आपल औषध द्यायच का त्याला ?' वहिनींनीं भोळ्या भावानें विचारलें आमचें औषध देऊन त्याला तडकाफडकी परलोक दाखवण्याची माझी इच्छा नव्हती. मी बापूला डॉक्टरकडे पिटाळलें

डॉक्टर तरी काय ? आमचेच भाऊ ! त्यानीं भेलेल्या माजराला डिव-चण्याप्रमाणें सदूचें अग तपासलें आणि ठराविक 'अच्छा' म्हणून चालते झाले जाताना क्विनाईनचें गोमूत्र मात्र ठेवून दिलें नानानीं मुकाट्यानें पाचाची नोट त्याच्या हातात कोंबली.

पण सदूचा ताप हटेना.

आणि एके दिवशीं सध्याकाळीं सदू गेला ! वहिनींच्याकडे पहाण्याची सोय नव्हती.

रात्रीं बाराचा सुमार असेल बाटल्याचा आवाज झाल्यामुळें मला जाग आली होती मी हळूच नानाच्या 'तुरुगा'कडे गेलों

आतल्या बाजूस नाना बाटल्याचे कागद फाडीत होते, बाटल्यातील पाणी मोरींत ओतून देत होते, होत नव्हतें त्याचा विध्वस करीत होते !

'नाना !' मी हळूच पुढें झालों

'शेवट ! अखेर ! जन्म आणि मृत्यु ! त्या पोराबरोबर या औषधानें जन्म घेतला. आता त्याच्याबरोबरच याचा शेवट झाला पाहिजे उद्या-पासून धदा बद !'

नानांच्या डोळ्याला आलेलें पाणी माझ्या नजरेतून सुटलें नाहीं.



# सदूची बायको

सदूची बायको खरोखरीच दहा हजारात एक होती.

आणि सदूने तिला वाचवण्याकरता रोख दहा हजार रुपये तिच्यावरून ओवाळून टाकले होते हेंही तितकेंच खरें होतें परतु दुर्दैव त्याचें कीं पाण्यासारखा पैसा खर्च करून त्याला यश आले नाहीं.

काय योगायोगाच्या गोष्टी असतात पहा !

सदू नागपूरचा राहणारा. शिक्षणाकरिता म्हणून मुबईस बहिणीच्या नवऱ्याकडे त्या वेळीं रहात असे. अखिल स्त्रीजातीविरुद्ध, का कोण जाणे, लहानपणापासूनच एक प्रकारची विलक्षण अढी मनात बसून गेल्याकारणानें सदूचें प्रत्यक्ष थोरल्या बहिणीशीं फारच थोड्या वेळीं सूत जमत असे. जन्मदात्री आई लहानपणींच निवर्तल्यामुळें तिच्याविषयीं बरे वाईट असे उद्गार त्यानें कधींच काढले नव्हते. परतु एवढें मात्र खरें कीं 'आई म्हणोनि कोणी' म्हणून घोगऱ्या स्वरानें गाणाऱ्या कवींच्याविषयीं त्याच्या मनात यथा यथाच आदर होता.

सेंट झेविअरसारख्या नांवालाच रोज उघडणाऱ्या कॉलेजमध्यें तो शिकत असूनही सुमारें तीन वर्षें त्यानें एकाही विद्यार्थिनीवर उघडपणें वा मनातल्या मनात बिलकूल प्रेम केलें नाहीं आम्हा मित्रमडळीमध्यें जर मुलींच्याविषयीं काहीं गप्पा निघाल्याच तर यानें तेथून उठून जावें हें नेहमींच चालत असे पॅंट, बूट, सूट करून एकदा मुलींच्या समोरून हिंडून आलें की पितर स्वर्गांत गेल्याचा, कॉलेजातील मुलाचा ब्रह्मानद त्याला कधींच झाला नाहीं बहुतेक शनिवार-रविवार व सुट्टीचे दिवस कापाच्या मैदानावरील साडेतीन तासात आटपणाऱ्या क्रिकेट मॅचेस पहाण्यात किंवा खेळण्यात तो घालवीत असे

घरीं फारच कटाळा आला तर तो गिरगावातल्या एका इराण्याच्या हॉटेलात बसून तीन दिडक्याच्या चहाच्या आधारावर रस्त्यावरची करमणूक पाहण्यात तासन् तास घालवीत असलेला दिसे.

त्या दिवशीं रात्रीं दहा वाजण्याच्या सुमारास अशाच स्थितींत त्या नेहमींच्या हॉटेलात बसलेला सदू मीं पाहिला आणि मला मोठेंच आश्चर्य वाटलें.

कारण नेहमींचा त्याचा बेफिकीर चेहरा आज कसल्या तरी गूढ विचारात गर्क होऊन गेला होता. टेबलावर बॉयनें आणून ठेवलेला चहा तसाच होता. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं सिगारेटला कधींही न शिवणारा सदू आज सिगारेटच्या धुराचे लोटच्या लोट सोडीत होता. मला त्यानें पाहिलें परंतु सिगारेटच्या धुराचे कौतुक करण्यातच त्याला विशेष मौज वाटत होतीसें दिसलें !

मी त्याच्याच पुढें एक खुर्ची ओढून घेऊन बसलों त्यानें माझ्याकडे न पाहताच बसल्या जागेवरून शान्तपणें म्हटलें— 'अरे शेटजी, आता तुमचें गिऱ्हाईक यायचा वेळ नाहीं. जरा इकडे या ना अन् येताना एक आखलें पाकीट घेऊन या''

'म्हणजे ? आज काय विचार काय आहे ? मीं हसत म्हटलें.

'गप्प रे बुवा ! जरा विचार करू दे मला.' किंचित् तुसडेपणानें त्यानें उत्तर केलें

* * *

दुकानचा इराणी शेटजी सदूचा तीन वर्षांचा जानी दोस्त होता. लठ्ठ पोटाच्या अवडबराखालीं दोन काटक्या लुटुलुटू चालताना पाहून कोणासही शेटजीची मोठी मौज वाटली असती कातडी पट्ट्याचें कमरेस बंधन टाकण्याचें शेटजीस काहींच कारण नव्हतेसें दिसत होतें. अंगात लांब्या बाहीची बुतावी बंडी, डोक्याला उलट्या घमेल्यासारखी दिसणारी काळी टोपी आणि पायघोळ चोळणा हा शेटजीचा बारा महिन्याचा कायम पोशाख होता. शेटजीचा चेहरा खरोखरीच उन्हानें तडकलेल्या टॉमॅटोसारखा दिसत असे. या दोघा प्राण्याची दोस्ती कोणत्या कारणामुळें झाली हें सांगणें कठीण होतें.

'हे काय शेट ! अरे, आज तुम्ही तो बिलायती बिडी घनचक्कर फुकते आहे ? काय मेंदुमधीं बिघाड झ्याला काय ?'' शेजारच्या खुर्चीवर भार टाकीत शेटजी म्हणाला.

'शेटजी, तुम्हीं कधीं एखाद्या मुलीवर प्रेम केलें होतें काय ?' सदूनें धुराआडून विचारलें.

मी आश्चर्यचकित होऊन म्हणालों, 'म्हणजे ? खरेंच का तू ह्या माडवाखालीं सापडला आहेस ?'

'अरे दोस्त, तुम्हाला काय पछान आहे ? एक दिन आमीबी तुमच्यासारखाच बायडीकरता जीवाचा पुलाव बनवून राह्यले होते. पण हे आवालोक कोणते टाईमला दगा देल काय बी समजत नाय. अरे, आमी एका बायडीपछे तुमच्यासारखाच फकीर बनले होते. बिगर एक दिन अस्पतळमदी ज्याऊन छोकऱ्याला जलम द्यावयाला गेले अन बस्स ! खल्लास ! त्या टाईमपासून हा रेस्टॉरट खोलून बसले. पेटकेवास्ते धदा तो करायलाच पायजे कीं नाय ? बिगर आता बायडीचा नाव नको काढू दोस्त !' शेटजी खिन्न मुद्रेनें म्हणाला.

'शेटजी, तुम्हाला कटाळून गेली असेल बिचारी !' सदू मिस्किलपणानें हसून म्हणाला.

'अरे, काय बोलते तुमी दोस्त ! बायडी होते ते वक्ताला या अख्ख्या बबईतला एक सिनिमा थिएटर एक दिन नाहीं छोडला ! हर एक दिन आइस्क्रिम खायला एकबी रेस्टॉरट छोडला नाय तो काय फुकटच ? सबूर. आमच्या दोस्तीचा हे तुम्ही म्हणता तो सुवेनीर (स्मूण) अजून या आमच्या डोक्शीवर ठेवून देते ते काय फुकटच ?' असे म्हणून शिरस्त्राणाच्या आतल्या बाजूस ठेवलेलें एक लहानसें मोराचें पीस शेटजीनें बाहेर काढून दाखविलें.

'हें पीस तुम्हाला तुमच्या बायडीनें दिले होतें ?' मीं आश्चर्यानें विचारलें.

'अरे, हेच्यामुळें तर आमी जुगले. तवा आमची बायडी इस्कूलमदीं जाणारी छोकरी होते. तेच्या पुस्तकामधून हे एक दिन पडलेले आमी पायले. तवा ते वापस करण्याकरता आमी एक दिन साजचे तेच्या घरीं गेलो. तवा आधारात तेच्या हाताचा पापा घेऊन अन एक <u>ठोकरबी</u> खाऊन आले. त्याच हाताला धरून रातोरात एक दिन मुबईला पळून आले.' शेटजी म्हणाला. शेटजीची ही मर्दुमकी ऐकताना सदूच्या डोळ्यांत विलक्षण तेज चढलेलें मीं पाहिलें. इतक्यात शेटजीला एका गृहस्थाच्

मोड देण्याकरिता म्हणून जावें लागलें मीं सदूकडे पाहिलें.

'पण मुलगी तरी कोणती ठरविली आहेस तू ? आणि कोणत्या जादूच्या गुरुकिल्लीनें तिच्या हृदयाचें कपाट तू उघडण्याचें ठरविलें आहेस ?' मीं सहजच विचारलें.

'मुलगी पण मुलगी आहे हें तू तात्काळ कबूल करशील. आपल्याच कॉलेजातली— आपल्याच वर्गातील— सबंध कॉलेजात जिची स्वरूपराणी म्हणून ख्याति आहे ती मदाकिनी' सदू म्हणाला सदूची उडी फारच मोठी होती हें त्याला सुद्धा कबूल करावें लागलें असतें. जिच्याजवळ जायला सुद्धा इतर लोक टरकत असत तिच्याशीं लग्न करण्याची सदूची इच्छा म्हणजे अशक्य कोटींतील महत्त्वाकांक्षा होती असेंच म्हणावें लागेल.

मदा अत्यंत सुंदर होती असें म्हणणें म्हणजे माघी पौर्णिमेच्या दिवशीं चंद्र आल्हाददायक असतो असें घरात बसून एखाद्या ब्रह्मचाऱ्यानें म्हणण्यासारखे होतें. खरोखरीच त्या दिवशीं त्याची आल्हाददायकता पटवून घेण्याकरिता बरोबर नवीन लग्न झालेल्या बायकोला घेऊन दूर कोठें तरी रानातच जायला हवें. संस्कृत कवींनीं सुंदर स्त्रीची ओळख करून देताना ज्या अतिशयोक्तीच्या विद्वत्तापूर्ण विदुषकी उपमा योजिल्या आहेत त्या दृष्टिआड केल्या असता मदाची ओळख मराठी वाचकास बरोबर येईल.

'मग ? ती तुला मिळणार का ? नाहीं तर तुतारी फुकण्याची हौस म्हणून एखादी विडीच फुकीत बसावें लागेल बरें का ?' मी हसून म्हणालों.

पैसे देण्याकरिता मी पुढें झालों आणि नेहमींच्या सवयीप्रमाणें सदूनें उगीचच आत घातलेला खिशातला हात बाहेर काढला. शेटजीनें हसत हसत पैसे टेबलाच्या ड्रॉवरमध्यें ढकलून सदूस म्हटलें,

'अच्छा तो दोस्त ! तुमच्या छोकरीला आमाला दावेल तर कीं नाय ? एक पावणा कप पिवायला जर तुमी त्याना घेऊन येल तर आमी तुमाला प्रायवेटमदीं आखा एक घंटा आराम करायला तुमाला टाइम देल बरं का ! लईच उमदी घोडी राहते तर आमीबी दोन शब्द त्येला सुनवून घेल. काय साहेब, खरा कीं नाय ? दोस्ताचें काम ते आपला काम.'

'या कामात, शेटजी, ज्याचा तो बरं का !' मीं हसून म्हटलें.

आम्ही दोघेही हसत हसत बाहेर पडलों.

वरील गोष्टीला दोन वर्षें होऊन गेलीं. मध्यतरीं मला पेण पनवेल येथें एक वर्ष मास्तरकीकरता म्हणून देवाला द्यावें लागल्याकारणानें मी मुबईत नव्हतों. खेड्यात जाऊन तेथें सुधारणा करावी या कॉंग्रेसच्या आज्ञे-नुसार मी दोन वर्षांत स्वतःच खेड्यातील लोकाकडून पुष्कळ शिकून पर-तलों होतों. मुबईला आल्यावर मीं सदूची चौकशी प्रथम आमच्या इराणी दोस्ताकडे केली. त्यानें मला बरीच मनोरजक माहिती पुरवली.

'अरे दोस्त, तो सदूभाऊ तर आता एक छोकऱ्याचा बाप जाला हाय् अन् कोटातल्या पिंडेल पिंडेल पिंडेल ॲण्ड पिंडेल कुपनींत साला कॅशीअर झाला हाये. छोकरा नव्हता तोंवर रोज साजचा आयस्क्रिम खायला बायडीला घेऊनशान येत होता. बिगर आता नाव कशाला ?

'एक दिन अकेलाच आला होता. लई घुस्सा करून एक आखखा पाकीट जाळलान्! त्येला आमीं विचारले तर 'बायडी बीमार आहे' म्हणून म्हणाला. अरे, बायडी एक दोन दिस बीमार झाली तो इतका घुस्सा करते काय पुसू नाय!'

मी ताबडतोब सदूच्या बिऱ्हाडी गेलों. काय युक्त्या केल्या त्याच्या त्यालाच माहिती पण सदूनें अखेरीस मदाकिनीच्या हृदयाचा ताबा घेतला! आता तो आपल्या बायकोसह आणि चिमुकल्या छोकऱ्यासह स्वतत्र बिऱ्हाड थाटून आयुष्याची नौका इतका वेळ सथ पाण्यातून वल्हवीत होता. ससारात उपस्थित होणारीं नवरा-बायकोंतील लुटुपुटीचीं वादळें बुडबुड्या-प्रमाणें तेव्हाच विराम पावून— एकदरीनें सदूचें बरें चाललें होतें. मीं त्याच्या घरीं चहा घेतला, चिमुकल्या यशवताला थोडा वेळ खेळवलें, व सदू कामाला गेला असल्याकारणानें मदाशीं थोडा वेळ बोलत बसलों.

एकदर सभाषणामध्यें मला मदेचा थोडासा सशय आला. काहीं तरी माझ्यापासून ती लपवून ठेवीत असावी असें मला वाटलें. अर्थात् स्वतःच्या बायकोला तर मी कधींच खोदखोदून विचारीत नसें. सदूच्या बायकोला तसें विचारणें शक्यच नव्हतें. आणि स्वतःची बायको मरत असली तरी विनोदाच्या कोट्याखालीं जीव उबवून टाकून दुसऱ्याच्या बायकोला तर एक दिवस ताप आला तरी सबध जग उलटेंपालटें झाल्याप्रमाणें भयभीत होण्याइतका हळुवार अतःकरणाचा एखादा समाजसुधारक मी नव्हतों.

संध्याकाळीं रस्त्यात सदूची आणि माझी गाठ पडली. त्या वेळीं सदूनेंच थोडासा प्रकाश पाडला. मदाची प्रकृति जशी असावी तशी नव्हती वर वर दिसणाऱ्या गुलाबी तकाकीआड भयंकर खोल गर्ता पसरलेली होती यश-वन्ताच्या जन्मापासून तिला बारीक ताप येऊं लागला होता आणि तो ताप असाच आणखी कांहीं दिवस चालला तर—?

मीं सदूला धीर दिला!

'खरेंच तू म्हणतोस त्याप्रमाणें कांहीं धोका नाहीं!' त्यानें अधिऱ्या नेत्रानीं मजकडे पाहून म्हटलें. मी तरी काय सांगणार! इतर लोकांप्रमाणें गुळमुळीत शब्दांचा आधार देऊन मी त्याच्यापासून निसटलों. मात्र डोक्यामध्यें एक बारीक विचार चमकून गेला कीं दिसायला अत्यंत सुंदर दिसणाऱ्या स्त्रिया संसारात पडल्या कीं कचकड्याच्या जपानी बाहुल्यापेक्षा जास्त उपयोगाच्या नसतात जगातल्या उत्तमोत्तम खाद्यपेयांचा त्यांना नैवेद्य दाखवावा, उत्तमोत्तम वस्त्रानीं लपेटून टाकावें व नाजूक साजूक भाषणाने त्याना खुलवावें यातच त्यांच्या सौंदर्याचें चीज! त्यांच्या सौंदर्याचा आरशात पहाण्याइतकाच त्याना उपयोग एरव्हीं इतराना त्यांचा कांहीं उपयोग नाहीं.

नंतर मी पुण्याला आलों.

* * *

बरोबर दोन वर्षांनीं मला कळलें कीं सदूची बायको गेली!

माझा विश्वासच बसेना या गोष्टीवर.

चार वर्षांपूर्वीच जिच्या सौंदर्याविषयीं कित्येक कवींच्या मेंदूला सूज आल्याप्रमाणें झालें होतें, आणि जिच्या सौंदर्याकडे पाहून खरोखरच पाहाणाऱ्याच्या मनात लगेच आब उत्पन्न व्हावा, ती हसरी खेळकर स्वभावाची मंदाकिनी इतक्या लहान वयात कालवश होईल ही कल्पनाच कांहीं चमत्कारिक होती. बारा बारा पोरांना जन्म देणाऱ्या स्त्रिया दिवसें-दिवस फोफावतच जात असतात. त्यांच्या नवऱ्यानाही त्यांच्याकडे पाहून छातींत कळ आल्यासारखें होतें. आणि इकडे पहावें तर एका मुलाला जन्म देऊन पुरतीं दोन वर्षेंही लोटलीं नाहींत अशा स्थितींत मांडलेला डाव मध्येंच उधळून मंदाकिनी निघून जाते. काय म्हणावें तरी काय

ह्या प्रकाराला ?

दोन वर्षांमध्यें सदूकडून अधून मधून मला पत्रें येतच असत. परंतु त्यात क्षयाचें दुखणें आहे आणि काहीं दिवस बरें वाटतें व काहीं दिवस त्रास होतो यापलीकडे मला काहींच समजण्यासारखें नव्हतें. मंदाकिनी गेल्याचें सदूनें मला पत्र पाठवल्याबरोबर मी ताबडतोब मुबईस निघून गेलों.

सध्याकाळचा सुमार होता रस्त्यावर मोटारींची नेहमींप्रमाणेंच लगीन-घाई चालू होती. हॉटेलातील पोऱ्याचें ओरडणें, मध्येंच एखाद्या कुत्र्याचे दीनवाणें केकाटणें आणि इतरत्र होणारे लहान मोठे आवाज एकत्र होऊन एकदर देखावा इतका भेसूर दिसत होता कीं जणू काय आपण माणसानीं गजबजलेल्या शहरात वावरत नसून हातात जळते पलिते घेऊन कर्णकटू किंकाळ्या फोडून अक्राळविक्राळ चेहऱ्याचीं भुतेंच एखाद्या स्मशानात अमावास्येच्या मध्यरात्रीं नाचाचा कल्लोळ उडविण्यात गर्क आहेत असें वाटावें निदान माझ्या चमत्कारिक मनःस्थितीमुळें मला तसें वाटलें.

एकवार तिरस्कारपूर्ण दृष्टीनें त्या नाचणाऱ्या भुताकडे पाहून मी सदूच्या फ्लॅटवर चढून गेलों. यशवन्ताला माडीवर घेऊन त्याच्या केसातून बोटे फिरविण्यात सदू गर्क झाला होता

मी आलेला पाहताच त्याला थोडेंसे समाधान वाटल्यासारखें दिसले.

थोडा वेळ कोणीच कोणाशीं बोललें नाहीं शेवटीं राहवेना म्हणून मींच बोलून गेलों—

'सदू, पुरे आता विचार'

'विचार ? मीं मंदेचा विचार केव्हाच सोडला होता. आता विचार फक्त इतर लोकांविषयीं करतो आहें. गमत वाटते आहे मला त्यातच.' एकवार खिन्नपणें हसून सदू म्हणाला

खात्रीनें त्याला गमत वाटत नव्हती मनुष्यस्वभावच आहे हा. ज्या गोष्टीविषयीं कमालीचा तिरस्कार वाटत असतो त्या गोष्टी तो शक्य तितक्या लवकर विसरण्याचा प्रयत्न करीत असतो पण त्याच नेमक्या तो लवकर विसरू शकत नाहीं, उलट जास्त भडकपणे त्या गोष्टी आला आठवू लागतात ! त्याचा विचार करण्यात कोणाला गमत वाटत असते ?

'सदू, एकदरींत शेवटीं क्षयावरच गेलें का रे ?' त्याच्या आठवणी

बुजाव्या म्हणून मी प्रयत्न करीत होतों. पण नेमक्या नकोत त्याच गोष्टी माझ्या तोंडून अचानकपणें बाहेर पडत होत्या.

'मदाचें दुखणें ना ! क्षयावर कसलें आलें आहे ! डॉक्टवर अन् हॉस्पिटलवर गेलें म्हणेनास !' तो खिन्नपणानें म्हणाला. मीं कांहींच बोललों नाहीं. सदू पुढें बोलू लागला—

'यशवताचा जन्म तिच्या बापाच्या इच्छेप्रमाणें मुबईच्या एका प्रसिद्ध हॉस्पिटलमध्यें झाला आणि शेवटीं दुसऱ्या एका हॉस्पिटलमध्येंच तिला या जगाला मुकावें लागलें औषधाकरता, हवेकरिता, याकरिता अन् त्याकरिता मिळून वडिलाच्या इस्टेटींतून मिळालेल्या दहा हजार रुपयावर या दोन वर्षांत पाणी सोडलें. आणि मिळवलें काय ! फ्री म्हणून समजल्या जाणाऱ्या इस्पितळातल्या लोकाना खूश ठेवण्याकरिता म्हणून काहीं नाहीं तरी हजार एक रुपये मीं ओतले.

'मदाच्या वडिलानीं मला एक कवडीची मदत केली नाहीं. उलट मरायला टेकलेल्या मुलीला चार दिवस माझ्याच खर्चानें तुमच्या घरीं ठेवा म्हणून परोपरीनें मीं त्याना विनविलें असता त्यानीं उसळून एकच उत्तर केलें कीं 'हा रोग माझ्या घरात नको. मला इतर मुलें आहेत. त्याना हा रोग ससर्गानें जडणार नाहीं कशावरून !' साग जन्मदाता असा फिरल्यावर मुलीनें कोणाच्या तोंडाकडे पाहावें ! तिचे वडील स्वतः एक डॉक्टरच आहेत. आणि म्हणून त्याना ससर्गाची भीति वाटली. मला नाहीं वाटली, कीं माझ्या या छोकऱ्याला नाहीं वाटली. मी कबूल करतों कीं मनुष्यानें योग्य ती काळजी घेतलीच पाहिजे. परतु मनुष्यानें साध्या माणुसकीला मद्दाग व्हावें ही रीत कुठल्या मुलखाची ! मला कटाळा आला आहे या जगाचा. जगात अत्यंत स्वार्थी, भेकड आणि नीच जात जर कोणती असेल तर ती मानवाची.'

सदू बोलता बोलता थाबला.

मीं मुकाट्यानें त्याच्या खाद्यावर हात ठेवून म्हटलें—

'सदू, बाहेर जाऊ या चल.'

मुकाट्यानें माडीवरचा मुलगा मोलकरणीच्या ताब्यात देऊन सदू माझ्याबरोबर बाहेर पडला.

—आम्ही नेमके आमच्या चिरपरिचित इराण्याच्या दुकानापुढें येऊन उभे राहिलों आत जाताना मी त्या इराण्याला वस्तुस्थिति पटकन सांगून टाकली. त्याचा चेहरा खरकन् उतरला.

काहीं एक न बोलता आम्ही चहा पिऊन दुकानाबाहेर पडलों.

* * *

सदू वेडा झाला नाहीं आणि त्याने आत्महत्याही केली नाहीं रोज सकाळीं दहा वाजता मोलकरणीच्या ताब्यात मुलाला देऊन तो ऑफिस-मध्यें नियमित जात असे दिवसभर काम करून नियमित सध्याकाळीं सहाला घरीं परत येत असे. रात्रीं यशवन्त निजला म्हणजे हळूच बाहेरच्या बाजूनें दाराला कडी लावून तो आपल्या ठराविक दुकानीं चहा पिण्या-करिता येत असे इराण्यानें त्याला एका शब्दाने आठवण दिली नाहीं आणि सदूही त्याच्यापाशीं बोलला नाहीं

रोज रात्रीं नवाचे सुमारास कोपऱ्यातल्या ठराविक खुर्चीवर बसून एक पावणा कप पुढें ठेवून सदू शून्य मनस्कतेने एक दान सिगारेट्स ओढी, गार झालेला चहा पिऊन टाकी व पैसा देण्याकरिता त्या इराण्यासमोर उभा राही.

काहीं एक न बोलता तो इराणी मोठ्या खिन्नपणें दोनतीनदा मान हालवी आणि पुढ्यात टाकलेले पैसे पुन्हा सदूच्या खिशात टाकी.

# लतेची माई !

त्या मुलीचें नाव लता होतें. परतु त्या मुलीकडे एकच वार पाहिलें की ही जाईजुईचा वेल नसून तांबड्या भोपळयाचा वेल असावा हें चटकन् लक्षात येत असे.

मूळचीच कपाळपट्टी अरुद, त्यातून केव्हाहि वेणी घातली तरी कपाळावर केस ओढून घेण्याची कला मुलीनें आत्मसात् करून टाकलेली असल्यामुळें ब्रह्मदेवानें तिच्या नशिबाचीं चार अक्षरें कपाळाऐवजीं गालावरच खरडलीं होतीं कीं काय असे तिच्या नेहमींच दिसणाऱ्या खरवडलेल्या गालावरून कोणासहि वाटलें असतें फुगीर गालाच्या मधोमध दाटीवाटीनें अग चोरून बसलेल्या नाकावर म्हशीनें पाय दिल्याचें स्पष्ट दिसत होतें. पानाच्या गर्द दाटीआड लपलेल्या कोकीळ पक्षाच्या युगलाप्रमाणें तिचे डोळे शोधून काढावे लागत असत.

मुलगी अक्षरशः बेडौल होती यात शका नव्हती. अशा मुलीचें 'लता' नाव ठेवणाऱ्या आईची कींव करावी तितकी थोडीच असें कुणींहि म्हटलें असतें. परतु हो ! मृताविषयीं वेडेंवाकडें बोलू नये म्हणतात ! लतेची आई सुमारें दोन वर्षांपूर्वींच या स्तुतिनिंदेच्या पलीकडे गेली होती आणि तिच्या जागीं अठ्ठाविसाव्या वर्षी वैराग्य शोभत नाहीं या विचारानें म्हणा अगर शक्य नाहीं म्हणून म्हणा, किंवा आजूबाजूच्या लोकाच्या आग्रहाला मान देण्याच्या मामुली सबबीखालीं म्हणा, यशवतरावानीं लतेला नवीन एका 'माई'ची सोबत जोडून दिली होती.

त्या वेळीं लता अवघी चार वर्षांची होती. पुढें पुढें लता वाढू लागली आणि तिची अक्कलही पण आश्चर्यकारक रीतीनें वाढू लागली.

—लग्न झाल्यावर मंगळागौरीकरता माईला माहेरीं जायचें होतें आणि लता हट्ट धरून बसली. लतेलाही आपल्या माईबरोबर नवीन आजोळीं जायचें होतें.

'लतेला नाहीं नेल बरोबर तर चालायच नाहीं का !' माईनें यशवंत-

रावाना भीत भीत विचारलें.

'का ? जा कीं घेऊन तिला. आता ती तुझी मुलगी आहे.' यशवतराव हसून म्हणाले

माई कांहींच बोलली नाहीं. परतु लतेला बरोबर नेणें तिला तितकेंसें पसत नव्हतें. 'तुझी मुलगी' असें म्हणणें सोपें असतें परतु नुसत्या शब्दानें मातृत्वाचा जिव्हाळा कसा उत्पन्न होईल ! अठरा वर्षांच्या अल्लड पोरीनें लग्नाच्या दुसऱ्या दिवसापासून आजपर्यंत कधींहि न पाहिलेल्या मुलीवर मातृत्वाची पाखर घालावी हें कितपत शक्य आहे ? वात्सल्याचा उगम सहवासापोटीं होत असतो. निद्रितावस्थेंत वा जागृतावस्थेंत, सुखाचे वेळीं वा दुःखाचे वेळीं, दिवसा, रात्रीं अशा सर्व परिस्थितींत कमींत कमी नऊ महिने उरापोटाशीं बाळगल्याशिवाय त्या व्यक्तीविषयीं उमाळा येणें शक्य नाहीं.

आणखी दुसरें एक कारण होतें आणि तें कारण म्हणजे खुद्द लताच होय. ज्या गोष्टी दुसऱ्याला सागू नयेत अशा गोष्टी लता एका पेपरमिंटाच्या गोळीच्या आशेनें अगदीं मोकळ्या मनानें दुसऱ्याला सागून टाकीत असे.

'लते, दादा कुठ झोपतात ?' या शेजारच्या रमाकाकूच्या प्रश्नाला लता हातातला पेढा मिची मिची खात अगदीं निःसकोचपणें उत्तर देत असे, आणि माईला चोरट्यासारखें होई.

माईचें माहेर गावातच होतें. तिकडचीं माणसें नेहमीं येत जात, त्याचप्रमाणें पूर्वाश्रमातील मैत्रिणींचा घोळकाहि मधूनमधून पूर आलेल्या नदीच्या लोंढ्याप्रमाणें येऊन जाई. त्या वेळीं लतेच्या दोन्ही हातात झग्याच्या घोळात न मावेल इतका खाऊचा ढीग तिच्यावर लादला जाई आणि त्याबदला जितक्या बारीकसारीक गोष्टी काढून घेता येतील तितक्या काढून घेतल्या जात. विचारी माई रडकुडीला येई. लतेचा फाजील स्पष्टवक्तेपणा तिला जाचक होई. नको नको त्या गोष्टी लता दुसऱ्यास सागू लागली कीं तिचा जीव खालवर होई. मैत्रिणी तिची खूपच चेष्टा करीत. ती चेष्टा सहन करणें कधीं कधीं अशक्य होत असे. पुष्कळ वेळा चेष्टेला कुचेष्टेचें स्वरूप येई, आणि काहीं कांहीं शब्द तिच्या मनावर प्रहार करून जात.

यशवंतरावाना खरोखरीच तितकासा पोंच नव्हता म्हटलें तरी चालेल.

च्चार वर्षांच्या मुलीला काय कळणार आहे या विचारानें ते लतेच्या देखत एखादे वेळीं माईशीं थोडीशी जास्त लगट करीत– आणि 'कशी माईची जिरली ऽ ऽ ! दादा झाले टांगेवाले अन् माई झाली घोडा. माईची वेणी धरून तिला दादानीं घोडा केला ऽ ऽ' इत्यादि नवलपूर्ण कथा लतेनें शेजारच्या लोकाना सागावी. असें प्रत्येक बाबतींत होऊ लागलें.

लतेला माईनें गोडीने सागून पाहिले यशवतरावाकरवीं तिला जरब बसविण्याचेंही तिनें करून पाहिलें, आणि एकदोनदा अती झाल्यावर एक दोन तोंडात देऊनही पाहिल्या लता तात्पुरतें कबूल करी. परतु परकीं माणसें घरात आल्यावर तिला निर्भय झाल्यासारखें वाटे आणि माईला धरणीमाता पोटात घेईल तर बरें असें वाटायला लावी.

आधींच सावत्रपणाचें नातें म्हणजे लोकाना एक करमणुकीचा भाग असतो रोजच्याच अळणी आयुष्याला कटाळलेल्या आणि रिकामपणचाच उद्योग आवरता आवरता नाकीं नव आल्यासारखें वाटणाऱ्या महाभागाना ही सावत्रपणाची जिवत फोडणी जरा चटकदार वाटल्यास त्यात नवल कसलें ? आपल्या पायाखालीं काय जळत आहे हें पाहण्यापेक्षा दुसऱ्याचे हातपाय केव्हा निखाऱ्यावर पडतील याचीच काळजी वाहणारे प्राणी जगात भरपूर भरलेले आहेत. यशवतरावाच्या प्रथमपत्नीला जिवतपणीं नावें ठेवणारा स्त्रीवर्ग आता पहिलीची अफाट स्तुति आणि दुसरीची निंदा करायला एका पायावर तयार होता. लतेला माईनें मगळागौरीकरतां आपल्या माहेरीं नेलें नाहीं हें पाहिल्याबरोबर वाड्यातल्या स्त्रीजनाना उल्कापाताचा भास व्हावा यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीं नव्हतें.

माई पाच सहा दिवस घरीं नसल्यामुळें वेणीफणी करायला लता वाड्यातल्या रमाकाकूकडे जात असे सोन्यासारखी पोर आई नसल्यामुळें जमिनींत शिरायला लागल्याचें रमाकाकूनीं स्पष्ट बोलून दाखविलें लतेला थोडेंसें आश्चर्य वाटलें 'जमिनींत शिरणें' हा प्रयोग तिला नवीन वाटला !

'अग, जमिनींत शिरलीस म्हणजे तुझी वाढच खुटली अस हो !' रमाकाकूनीं तिला समजावून सागितलें.

'पण मी तर चागली मोठी झाले आहें.' लता गभीर चेहरा करून म्हणाली.

'कर्माची मोठी ! काय पोर तरी ! अग, आईची माया निराळी. अन्

माईची माया निराळी किती झालं तरी सावत्र पोरगी तू !" रमाकाकू जास्त खुलासा करून म्हणाल्या.

'सावत्र म्हणजे काय ?' लतेनें पुन्हा विचारलें

* * *

त्या दिवसापासून लतेच्या डोक्यात निराळेंच वारे खेळू लागलें. सावत्र-पणाचा तितकासा तिला बोध झाला नाहीं परंतु माई आपल्याला केव्हा ना केव्हा तरी मारणार आहे, डागणार आहे आणि सरते शेवटीं आपण आपल्या आईसारखें मरणार आहोंत म्हणजे कुठें तरी जाऊं तें पुन्हा परत येणार नाहीं इत्यादि अर्धवट विचार तिच्या डोक्यात वावरू लागले माईने आपल्याला का मारावें अन् का डागावें हे कोडे तिला उलगडले नाही आणि जर मारलेच तर दादा तिला ठोक देतील हा विचार तिला आधाराला पुरे होता माई घरीं आल्याबरोबर लता आता पूर्वीसारखी तिच्याशीं मोकळेपणाने वागेनाशी झाली दाराआड उभी राहून किंवा दूर अंतरावर उभी राहून लता ऐकीव माराची व डागाची वाट पहात असल्यास न कळे ! माईच्या लक्षात ही गोष्ट प्रथम आली नाहीं परंतु जेव्हा दोन तीन दिवस लता वेणीसाठीं तिच्याकडे येईना, आणि जेवायचे वेळेस तिच्यापासून शक्य तों दूरवर बसू लागली, तव्हा तिला आश्चर्य वाटले

एके दिवशीं सकाळीं वेणीकरता लतेला तिने वाडाभर शोधली परंतु लतेचा पत्ता नव्हता सकाळचें दूध पिऊन लता जी अदृश्य झाली ती दहा वाजायच्या सुमार झाला तरी परत आली नव्हती. आजूबाजूच्या वाड्यातून माइ तिची चौकशी करून आली. शेवटीं नाइलाज झाल्यावर तिनें यशवन्तरावच्या कानावर ही गोष्ट घातली यशवन्तरावाना प्रथम आश्चर्य वाटले आणि नंतर त्याचें मन भीतीने गोंधळून गेलें अलीकडे माई घरात आल्यापासून लतेकडे फारसे लक्ष द्यावयाला त्याना सवडच मिळाली नव्हती, आणि मुलाची सर्व टीप बायकानीं पहावयाची असते व बापानें फक्त कपडेलत्ते बरोबर आहेत येवढें पाहिलें कीं पिता या नात्यानें आपलें कर्तव्य योग्य पार पडलें अशी याची लाडिक समजूत होती. परंतु दोन तीन तास बेपत्ता झालेल्या चार पाच वर्षांच्या पोरीला स्वतःची नोकरी बाजूला टेवून भरदुपारच्या उन्हांत वणवण करीत भटकून धुंडाळावी लागते

हें पित्याचें कर्तव्य त्याना तितकेंसें सोपें वाटलें नाहीं.

सध्याकाळीं दिवे लागणीच्या सुमारास लता आपण होऊन घरीं आली यशवन्तराव दिवसभर हिंडून इतके त्रासले होते कीं त्यानीं याद राहील अशा बेतानें तिला पिट्टी दिली अगणात बायकाचा घोळका जमला होता कोणी काहीं, कोणी काहीं आपआपल्या परीनें लतेच्या या अचानक पलायनाचें समर्थन करीत होत्या.

'आईवेगळी पोर ! घर खायला उठल तर उंबरठा ओलाडील नाहीं तर काय करील '' एक जण नाक फुगवून ताठरपणानें म्हणत होती

'येवढ्याचकरता बर बाई आमच्या चिंगीला तें पोस्टातल बिजवराच स्थळ मीं नको म्हटल ! सवतीच पोर वागवण भारी बाई कठीण ! तशी माझी चिंगी 'हु' म्हणता 'हा' म्हणायची नाहीं पण माणसाचा नियम नसतो ग बाई ! अलीकडच्या पोरी या ! याना नुसत मियाबिब्बीच राज्य हव !' दुसरी एकजण ठसक्याने म्हणाली.

'आणि असलीं पहिलींच पार तर उकिरड्यावर का नेऊन सोडायचीं आहेत ? आता मना नाहीं का निसरणी दिली ! पहिल्या दोघींचे चांगले चार मठोबा आहेत पण–' तिसरी अभिमानानें म्हणाली.

'ते नका सागू ! दोघाना देशोधडीला लावले आहत आणि एकाला घरकाम्या करून सोडला आहे अन् एक बसला आहे आजोळीं जाऊन तुमच्या त्रासान !' पहिलीने स्पष्टपणे म्हटले !

माईला यापुढचीं बोलणी ऐकणे शक्य नव्हते ! तिनें रागारागानें सगळ्या खिडक्या व दारे फडाफड लावून घेतलीं

यशवन्तराव कधीं नव्हत ते आज खूप सतापले होते लग्न झाल्या दिवसापासून आज वर्ष दीड वर्ष त अत्यत सहनशीलपणाने लतेचा हा सगळा बावळटपणा सहन करीत होते अत्यत उदार मनानें त्यानीं वेळो-वेळीं तिच्या मूर्खपणाकडे साफ दुर्लक्षच केले होतें परतु आज मात्र त्याच्या सहनशीलतेची दोरी तुटली ते आज आपल्या लाडक्या लतेला मारीत नसून जणु काय एखाद्या लतकोडग्या कुत्र्यालाच बडवून काढीत होते. लतेनें पहिले दोन तडाखे मोठ्या धैर्यानें सहन केले परतु पुढें तिचा धीर सुटला. आता तर ती धाय मोकलून रडू लागली होती.

आश्चर्याची गोष्ट ही कीं, पहिले दोन तीन तडाखे लतेला बसतांच माईला जो एक योग्य न्याय झाल्याचा आनद वाटला होता तो पुढें प्रत्येक चापटीसरशीं हळुहळू मावळू लागला. इतका मार तिनें स्वतः कधींच खाल्ला नव्हता व दुसऱ्याला बसलेलाही तिनें कधीं पाहिला नव्हता. हळुहळू तिच्या छातींत कसेंसेंच होऊ लागलें न्याय देण्यात सुद्धा पुष्कळ वेळा आपण नकळत अन्याय करीत असतों. शान्त चित्तानें न्यायदान करणें निराळें आणि सतप्त डोक्यानें बाजवीपेक्षा सढळ हातानें हा असला न्याय देणें निराळें. ज्या लतेच्या चह्याडबुचक्या तोंडामुळें माई तिच्यावर मनातून सतापत असे त्याच लतेच्या आताच्या असहाय परिस्थितीनें ती गांगरून गेली. आणि—

'काय हें मारण? जरा सुमार तरी!' म्हणून त्वेषानें ओरडत ती मध्यें पडली.

यशवन्तरावानीं ठेका धरला होता. शेवटची समेची टाळी लतेच्या पाठीवर बसण्याऐवजीं ओझरती मध्यें पडलेल्या माईच्या हातावर पडली फटका तितकासा जोराचा बसला नव्हता. तरी मुईमारख्या बारीक बागडीला तो सहन होणारा नव्हता माईची बागडी खळ्दिशीं खालीं वाजली, हातावर काचेचा ओरखडा पडला आणि त्यातून रक्ताची धार गळू लागली परतु पोटाशीं धरलेल्या लतेला माईनें जास्तच घट्ट धरून ठेवलें!

* * * *

त्या दिवशीं रात्रीं मुसमुसणाऱ्या त्या चिमुरडीला पोटाशीं धरून निजलेल्या माईच्या डोक्यात विचाराचे प्रचड काहूर माजले. ज्या मुलीविषयीं आपल्याला यत्किंचितही प्रेम वाटत नव्हतें त्या मुलीला आपण आज स्वतःचें शरीर धोक्यात टाकूनही वाचवलें इतकेंच नव्हे तर पोटाशीं धरलें! का? कर्तव्याच्या भावनेनें माईनें लतेला जवळ केलें होतें? छे:! मग कर्तव्य म्हणून आपण आजपर्यंत तिला कसें जवळ केलें नाहीं? लोकनिंदेला भिऊन लतेची बाजू आपण धरली? लोकनिंदेला भिऊन भिऊन तरी कोठपर्यंत भिणार! लोकाना निंदा करायला कारण लागतेंच असें नाहीं. निंदा करणारा मनुष्य वाऱ्याची सुद्धा निंदा करील. मग आपण लतेला का सोडवली? वात्सल्य म्हणावें तर एक दिवसात तें येणें शक्य नाहीं! मग का?

दु:खात पिचणाऱ्या प्राण्याविषयीं आपल्याला कळवळा उत्पन्न होतो, त्याचें दुःख पाहून आपल्यातील मानवता जागृत होते आणि आपण नकळत त्याच्या बाजूला ओढले जातों. प्राण्याची असहायता मोठी केविलवाणी असते. आणि तेंच कारण आज लतेच्या बाबतींत घडलें होतें. मात्र त्याची जाणीव माईला नव्हती आणि लतेला तर नव्हतीच नव्हती !

अर्धवट झोपेत लतेने कळवळून 'आई ऽऽऽ अ' असे काढलेले उद्गार माईच्या कानात तापलेल्या तेलाप्रमाणे घुसले, आणि 'नाहीं अ–! माझी बाई ती '' म्हणून तिच्या कानाशीं हलकेच पुटपुटत तिच्या अर्धोन्मीलित ओष्ठाचे तिनें मोठ्या आवेगानें चुंबन घतले !

परंतु या सर्व प्रकाराचा लतेने निराळाच अर्थ लावला त्या दिवशीं सकाळीं ती जी बाहेर गेली होती ती एका ओळखीच्या मुलीकडेच गेली होती लतेच्या आईची आणि त्या मुलीच्या आईची पूर्वीची ओळख होती, म्हणून लतेला तिने दिवसभर ठेवून घेतलें होतें. येवढ्याकरता आपल्याला माईने दादांकडून मार बसवावा हें त्या एवढ्याशा मेंदूला सहन झालें नाहीं. शेजारच्या रमाकाकूंनीं तर स्पष्ट निकाल दिलेला तिने ऐकला होता– 'ही पोरगी जेव्हा आपल्या आईला भेटायला स्वर्गांत जाईल तेव्हा त्या बयाचे पाय धरणीला लागतील '' हे रमाकाकूचे शब्द ऐकून लतेनें अदाजानें तर्क बांधिला कीं माईला आपण नको आहोंत.

दोन तीन दिवसानीं लतेने हातावरचा गुळाचा चाटून चाटून झालेला पाक जिभेनें मटकावीत रमाकाकूना हलकेंच म्हटलें– 'काय हो काकू, माणूस मरत म्हणजे कुठ हो जात ?'

आश्चर्यानें आ वासून रमाकाकू तिच्या झिपऱ्या केसाकडे पहात राहिल्या !

'इडा पिडा टळो ! अग, अस अशुभ का आठवल ?' त्या किंचित् भित्रेपणाने म्हणाल्या.

'नाहीं, पण सांगा मला मरायच म्हणजे फार दिवस दूर जायचच असेल तर मी मोठी होईतोंवर मरतें आणि मग चांगली माईएवढी झालें कीं परत येईन ' निष्पाप मुद्रेनें लता म्हणाली.

'ऐकाव तें एक एक नवलच ! बाकी नवल कसल म्हणा ! शिळ्या कढीचा हा असाच आंबट वेत व्हायचा काय नवरावायको तरी ! पोरीला

जगण सुद्धा नकोस करून सोडल आहे !' रमाकाकू पळीनें वैलावरचें वरण ढवळीत म्हणाल्या रमाकाकूच्या घरीं पोराबाळाचा त्रास नसल्यामुळें लतेला त्याच्या घरात केव्हाही येण्यास मुभा होती, आणि लताही पण या गोष्टीचा पूर्ण फायदा घेण्यास चुकत नसे

'काकू, आपल्याला एखादी गोष्ट पाहिजे असली म्हणजे आपण काय कराव ?' लतेनें पुढें विचारलें.

'आता देवाला शरण जा तरण्या बायकाच्या नादान हे दोनदा बाशिंग बाधणारे असेच चळतात बर ! याची होते चैन पण तुझ्यासारख्या पोरीला हा फास. देवाच्या पुढें नाक धरून बैस म्हणजे देव तुझी सुटका करील ' रमाकाकू करपलेल्या भाकरीचा भाग नखाने कुरतडीत म्हणाल्या.

त्या दिवसापासून लतेनें घरातल्या देवासमोर ठाण माडून तासन्तास बसण्यास सुरवात केली. घरात इन् मिन् दोन देव, आणि तेही गौरीहारात पुजलेले माहेरून येताना माईनें आणलेले हे माईचे देव आपल्याला वश करून घेता येतील कीं नाहीं हा एक लतेला प्रश्नच पडला होता परतु 'देव इथून तिथून सगळे एक असतात, तुझ्यासारख्या मुलींची त्याना दया आलीच पाहिजे' या रमाकाकूच्या आश्वासनामुळे तो प्रश्न सुटला होता. परतु आपण डोळे मिटून बसलो असताना आपल्याला ते दव चापट बिपट तर मारणार नाहींत ना ? या सशयानें ती हळूच मिलमिल्या नजरेने त्याच्याकडे पाही परतु खेळातल्या पैशाच्या बाहुलीप्रमाणे निमूटपणे वागणारे हे देव पाहून तिची भीति कमी झाली आणि आता मात्र ती तासन्तास देवासमोर डोळे मिटून काहीं तरी तोंडाने पुटपुटत बसू लागली

घरात न ठरणारी लता आता केव्हाही पहा देवासमोर बसलेली पाहून माईलाही अतिशय आश्चर्य वाटले. तिनें एकदोनदा थट्टेनें लतेला बोलूनहि पाहिलें परतु लतेनें आपलें आसन मोडू दिलें नाहीं प्रथम प्रथम स्वतःचें नाक धरून बसणें तिला फारच जड गेले मधून मधून तिनें लगड्या बाळकृष्णाचेंही नाक धरून ठेवावें. परतु देवाना शिवणे बरें नाहीं असे माईनें सागितल्यावरून देवाची ही हालअपेष्टा थोडक्यावरच निभावली देवाचें नाक नको तर आपलेंही नको या विचारानें लतेनें फक्त डोळे मिटण्याचें

तेवढें चालू ठेविलें.

*  *  *

तीन चार महिने लोटले. एके दिवशीं संध्याकाळीं माईला अंग मोडून आल्यासारखें झालें दुसऱ्या दिवशीं तिने अंथरूण धरलें. तिसऱ्या दिवशीं डॉक्टर आणावा लागला चवथ्या दिवशीं डॉक्टरनें Malarial Influenza किंवा Influenzal malaria असावा असें दोन दगडावर हात ठेवून जाहीर केलें पाचव्या दिवशीं निदान कायम झालें माई विषमानें आजारी होती, आणि पांच दिवसांत तिचे केवळ अस्थिचर्म शिल्लक राहिलें होतें

यशवंतरावांनी तिसऱ्या दिवसापासून रजा मागून घेतली होती डॉक्टरांच्याकडे हेलपाटे घालावयाचे, आणि ते सांगतील तीं औषधें बिनतक्रार आणून घरांत त्यांची अडगळ माजवायची, आणि साधल्यास दोन घांस कसे तरी पोटांत ढकलून माईच्या बिछान्याशेजारीं पहारा जागवायचा, हा त्यांचा उद्योग चालू होता लतेचें जेवण कोठेंहि होई परंतु काय असेल तें असो, तो आतां देवापुढें न बसतां माईच्या मिटलेल्या डोळ्याकडे टक लावून पाहूं लागली ज्या प्रमाणांत माईच्या अंगाची उलघाल होत असे त्या प्रमाणांत, कां कुणास ठाऊक, लताहि बेचैन होत असे यशवंतरावांनीं तिला बळें नेऊन तिच्या अंथरुणावर निजवलें तरी ती जागी झाली कीं ताडकन् माईच्या उशाशीं येऊन बसत असे का कुणास ठाऊक, माईची ही स्थिति तिला पाहवेना कांहीं तरी आपलें चुकतें आहे असें लतेला राहून राहून वाटूं लागलें त्यातून सातव्या दिवशीं रमाकाकूचे शब्द ऐकल्यापासून तर तिला आपला अपराधीपणा पुरता जाणवूं लागला

'दुसऱ्याच्या पोरींना छळायला पाहिजे ! भोग म्हणावं आपल्या कर्मांचं फळ ज्या हाताचें झाडे त्या हाताने दिल्याशिवाय सुटका नाहीं बरं सत्यकाकू !' हें रमाकाकूचें भविष्य तिला तितकेंसें रुचलें नाहीं. रमाकाकूंना ती कांहीं बोलली नाहीं परंतु आपल्या माईवर हे लोक कां उगाच संतापतात हा विचार तिच्या डोक्यांत आल्यावांचून राहिला नाहीं. आणि त्याच वेळीं लतेला समजून आलें कीं आपली माई फार गरीब आहे आणि या बायका फार वाईट आहेत.

दिवस आठवा उजाडला. माईची स्थिति जास्तच चिंताजनक होती. आजचा दिवस कसा तरी निभावला तर आशा आहे हें डॉक्टराचें वाक्य लतेच्या कानावर पडलें होतें सध्याकाळचे सुमारास माईला वात झाला. माईची आई आणि तिचे वडील तिच्या अथरुणाशीं बसून राहिले होते. सैंपाकघरात एका लहानशा फळकुटावर माईचे माहेरचे देव डोळे मिटून बसले होते. आणि त्याच्यासमोर डोळे मिटून यशवतराव आणि त्याच्या शेजारीं लता हीं उभीं होतीं.

'देवबाप्पा, तू चागला आहेस मीं म्हटल्याप्रमाण माईला आजारी पाडलीस, पण आता तिला बरी कर मला ती पाहिजे आहे रमाकाकू, सत्यकाकू– सगळ्या सगळ्या वाईट आहेत. माझी माई चागली आहे तिला बरी केलीस तर बर आहे नाहीं तर—'

लतेची धमकी तोंडावाटे बाहेर पडण्याचे आधींच यशवतरावानीं तिला चट्दिशी उचलून घेतलें यशवतरावाचे ओले झालेले डोळे आपल्या चिमुकल्या बोटानें पुशीत लता स्वतःच मुळुमुळू रडू लागली होती

देवाना लतेची धमकी समजली कीं नाहीं कुणास ठाऊक परतु एवढें मात्र नक्की कीं माईनें आपला काढता घेतलेला पाय पुन्हा ससारात रोवला. बोलाफुलाला गाठ क्वचित्‌च पडते. परतु केव्हा केव्हा पडते एवढे मात्र नक्की. आणि त्या अनिश्चिततेमुळेंच बोलाफुलाला महत्त्व प्राप्त होतें

माई थोडक्याच दिवसात हिंडू फिरू लागली. लतेच्या नवसाची अद्भुतरम्य कहाणी यशवतरावाकरवीं समजली तेव्हा प्रथम तिला आश्चर्य वाटलें, नतर कौतुक वाटलें, आणि शेवटीं लतेविषयीं तिच्या मनात एकाएकीं कसला तरी उमाळा आला. आणि तेव्हापासून लतेची आपण खरीखुरी आई असल्यासारखें तिला वाटू लागलें !

'मी तिला एकदा आपल्या रागाच्या सपाट्यातून सोडवली होती, तिच्याकरता मला आपल थोडस रक्त साडाव लागल होत आज तिन मला यमाच्या तडाक्यातून सोडवलं आहे. आपल्या निष्पाप मनाची सारा पुण्याई तिन पणाला लावली होती.' माईला धन्यता का वाटणार नाहीं ?

'लता, तू शहाणी मुलगी आहेस ना ? अन् शहाणी असून पुन्हा माझी आहेस ना !' तिच्याकडे हसून पहात माई म्हणाली.

लतेनें हातातला खेळ दूर भिरकावला, ती धावत आली आणि माईच्या गळयाला बिलगली.

'माई ! तू माझी, मी तुझी, दादा माझे, मी दादाची अन्– पण आपण सगळींच आपलीं बर का !' म्हणून म्हणत लतेने माईच्या कुशींत तोंड लपवलें.

मायलेकींकडे पाहून यशवतराव कोणास ठाऊक कसला विचार करीत होते ते !



# समेट !

लहान मुलें चंद्राकरता हट्ट धरतात आणि तरुण मुलें चांदण्यांत सतत बरोबर हिंडावयास सापडेल अशा नाजूक माणसाकरता हट्ट धरून बसतात. लहान मुलांना आरसा पुढें करून फसविता येते परंतु मोठ्या मुलांना मात्र स्वतःच्या थोबाडींत मारून घेऊन स्वस्थ बसावें लागत असा हा जगाचा व्यवहार आहे

तसें म्हटलें तर हे सगळे मन मारण्याचेच प्रकार आहेत असेंच नाहीं का ? आरशातल्या प्रतिबिंबावर खूश होणाऱ्या बालजीवाला मोठेपणीं उपयोगी पडणाऱ्या ज्ञानाचेच प्राथमिक पाठ घ्यावे लागतात— फरक इतकाच कीं अजून त्याचें मन तितकेसे बनलेलें नसते

मोठेपणीं त्याचे मन बनतें आणि त्याच्याबरोबर होडींत पाऊल टाकणाऱ्या दुसऱ्याही एका व्यक्तीचे मन तितकेच बनलेलें [illegible] दोन बनलेल्या मनाचा बनाव तितकासा उपेक्षणीय नसतो हे त्यांना पटतें. आणि नंतर !

अगदीं असाच प्रकार विनूच्या मनाचा बनलेला होता. लहानपणापासून आईवडिलांच्या प्रेमळ पंखाखालीं वाढलेला जीव— स्वतःच्या जीवाच्या कोडकौतुकापलीकडे जगांत दुसरा कांहीं न्यारा प्रकार असेल या विचाराची त्याला पुसटती सुद्धा ओळख नव्हती जग आपल्याकरता आहे, आपण जगाकरता नाहीं ही त्याची ठाम समजूत झालेली होती.

बी. ए च्या परीक्षेंतून अर्धमेला होऊन कसाबसा सुटलेला त्याचा जीव जगाकडे विजिगीषु डोळ्यांनीं पाहू लागला. आपण केलेल्या धडपडीचें कौतुक इतरांनीं करावें म्हणून त्याचें मन आसावल्यासारखें झालें. आणि पुष्कळशा प्रमाणांत त्याच्या मनाचें समाधान झालें होतें.

घरातल्या वृद्ध आत्याबाईनीं त्याला कुठें ठेवू नी कुठें नाहीं असें करून सोडलें. वडिलांनीं स्वतः कृतकृत्य झाल्याच्या झोकांत काय काय कष्ट घरातील कर्त्यासवरत्या माणसांना सोसावे लागतात, त्याची फेड तरुण

मंडळींनीं कशा रीतीनें करावी इत्यादि वक्तृत्वपूर्ण वाक्यांनीं त्याचा मोठे-पणा त्याला सुचविला आणि स्वतःचाही ध्वनित करून घेतला आईनें त्याला एकदा डोळे भरून पाहिलें आणि नतर डोळे भरून आल्या कारणानें डोळ्याला पदर लावला.

साहजिकच विनूची कल्पना झाली कीं आपण आता सामान्य मनुष्य नाहीं आता आपण जबाबदार नागरिक आहोंत. आणि आपली जबाबदारी पार पाडण्याकरिता वडिलाच्या सूचनेनुसार त्याच्याच ऑफिसात अनायासें (वडिलाच्या दृष्टीनें प्रयासें) मिळत असलेल्या नोकरीवर रुजू होऊन चार पैसे घरीं आणले पाहिजेत

पण त्यापूर्वीं तो आता मुली बघू लागला. इतके दिवस तो मुली बघत होताच— पण फक्त रस्त्यात ! आता त्याच्या घरात राजरोस हक्काने, गुडा-ळलेल्या गाद्यावर पाढरें धोतर टाकून तात्पुरत्या तयार केलेल्या लोडला टेकून तो मुलींना पास-नापास करू लागला. जबाबदार नागरिकाला लायक अशी आणि 'तें' रोमरोमात भिनलेली छुन्नक तारा अजून त्याला भेटली नव्हती. रस्त्यात दुरून दिसणारीं इन्द्रधनुष्यें जवळून पाहताक्षणींच लाल गोंडे लावलेल्या टांगेवाल्याच्या आडगिऱ्हाइकी विकत घेतलेल्या चाबका-प्रमाणें सौंदर्यहीन असतात हा अनुभव त्याला प्रथमच आला तरटात गुडाळलेलें खव्याचें गाठोडें म्हणून बुभुक्षितानें जवळ करावें तो आत घोड्याची लीद निघावी असली सौंदर्याची फ़सवेगिरी त्यानें प्रत्यक्ष अनुभवली

एवींतेवीं बाजारच आहे मग त्यातल्या त्यात चांगली वस्तु का न पाहून घ्यावी हा विचार प्रत्येक तरुणाच्या डोक्यात वावरत असतो. त्यात स्त्री-वर्गाचा जाणूनबुजून अपमान करण्याची त्याची इच्छा बिलकूल नसते. विनूनें सुमारें पचवीस तीस मुलींना नापास करून मुंबई विश्वविद्यालयातील परीक्षकांच्याही लहरीपणावर ताण केली.

शेवटीं त्यातल्या त्यात एका बऱ्या दिसणाऱ्या मुलीवर पसतीचा शिक्का मारून त्यानें आपलें सौंदर्यसशोधन आवरतें घेतलें.

तशी सुधा मोठी गोड मुलगी होती. तिचा हा गोडपणा तिच्या नाका-डोळ्याचा ठसठसशीतपणा व रेखीवपणा यावरच पुष्कळसा अवलबून होता.

कपाळ थोडेंसें अरुदच होतें. परंतु (मुद्दाम केलेल्या) केसाच्या बटांमुळें ती उणीव सुदर तऱ्हेनें झांकून गेली होती. जिव्हणी चागली ऐसपैस आणि रसरशीत ओष्ठद्वयाची आव्हानपूर्ण बैठक या गोष्टींनीं सुधा आकर्षक दिसत असे.

विनू या गोष्टीवर खूश होताच. परतु त्यातल्या त्यात तिचे बघणाऱ्याच्या अंतःकरणाचा ठाव घेऊ पाहणारे डोळे पाहून तो अगदीं मुकाट्यानें 'मम' म्हणायला तयार झाला.

—आणि नतर सुमारें सहा महिने तो तिच्या पुढें पुढें नाचला.

तिचें घामानें डवरलेलें कपाळ पाहून त्याचा जीव गलबलल्यासारखा होऊ लागला तिच्या डोळ्यात गेलेलें कुसळ त्याच्या डोळ्यात मुसळाप्रमाणें त्याला सलू लागलें. तिला ठेंच लागणाऱ्या दगडाकडे तो काळिकाळाच्या क्रूरतेनें पाहू लागला. एके दिवशीं रात्रीं तिला तहान लागली असता नळ बद होते यावरून खवळून जाऊन या नरशार्दूलानें ऐसे एकेका मेंबराचे वाभाडे काढले आहेत म्हणता— त्याचें नशीब थोर म्हणून ते ऐकायला तेथें नव्हते नाहीं तर बिचाऱ्याच्या हृदयाला किती खोल जखमा होऊन बसल्या असत्या राम जाणे !

थोडक्यात, तिला यत्किंचितही दुःख सहन करावयास लागू नये म्हणून तो कमालीच्या तत्परतेने डोळ्यात तेल घालून तिला जपू लागला. परतु बाहेरील बागूलबुवाची भीति घालविण्याकरता छातीशीं घट्ट धरलेल्या मुलाचा श्वासोच्छ्वास रोखल्यामुळें त्यानें हातपाय झाडण्यास सुरवात करावी तसा कांहींसा प्रकार सुरू झाला.

एके दिवशीं दोघेंजण अगणात फुलचेंडू खेळत होतीं. सुधेनें हा खेळ नव्यानेंच हस्तगत केला होता. त्यामुळें दर क्षणाला ती तें फूल कोणत्या दिशेला मारील हें चचलपणाबद्दल मशहूर असलेल्या वाऱ्याला सुद्धा अजमावता आलें नसतें. विनूला हें सहन होत नव्हतें. परतु फुलाकडे लक्ष देण्यापेक्षा सुधेच्या आनदानें उमललेल्या चेहऱ्याकडे पहाणेंच जास्त मनोरजक असल्यामुळें त्याचें खेळाकडे थोडेंसें दुर्लक्षच झालें होतें.

खेळता खेळतां मधेंच 'आईऽऽऽग ! मेलेंऽमेलें !' करीत सुधा मटकन् खालीं बसली. एका हातानें पायाचा घोटा चोळीत दुसऱ्या हातानें ती कपाळावरच्या बटा सावरूं लागली. तिची ही असहाय स्थिति अवलोकन

करून विनू हातातील बॅट दूर भिरकावून तिच्याजवळ विजेच्या वेगानें धावत आला.

'तरी मी सांगत होतों कीं जरा जपून !' विनू किंचित् चिडखोरपणाच्या सुरात म्हणाला.

'आईऽऽऽग ! पाय लचकला—आईऽऽऽ' सुधा जास्तच विव्हळून म्हणाली.

आणि विनूनें तिला जाहिरातींतल्या चित्राप्रमाणें दोन्ही हातावर उचलून घरात नेलें.

दुसऱ्या कोणीं हा देखावा पाहिला नाहीं म्हणून बरें. परंतु आईच्या नजरेंतून हा देखावा सुटला नव्हता ! त्या दिवशीं संध्याकाळीं तिनें विनूला चार शब्द ऐकवले !

'पण आई, एकमेकानीं एकमेकाला जपायला नको का ?' विनू अजीजीनें म्हणाला !

'जपू नये असं कोण म्हणेल ? परंतु त्याच्यातही परी असतात. विनू, प्रेम पोटांत असावं नेहमीं नेहमीं ओठातून त्याचा उच्चार केल्यानं त्यातली गोडी नाहींशी होते अतीची माती होत असते हें ध्यानात धरावं. अरे, आम्हीं काय एकमेकाशीं धुसपूस करीतच का जन्म काढला आहे ? पण प्रेमाचं प्रदर्शन करणं आम्हाला पसंत नाहीं.' त्याची आई गंभीरपणानें म्हणाली.

'बरें तर. उद्यापासून मी एक अक्षर बोलणार नाहीं तिच्याशीं.' विनू फुरगटून म्हणाला.

परंतु दुसऱ्याच दिवशीं टाचणीशीं खेळणाऱ्या सुधेशीं खेळल्याशिवाय त्याला राहवलें नाहीं.

सुमारें एक महिन्यानंतर वडिलांची सुरतला बदली झाल्यापासून तर विनूला पाठीमागें राहणारी एक अष्टपुत्रा सौभाग्यवती आणि तिचा सहधर्मचारी या लोकाखेरीज कोणाचीही तमा बाळगण्याचें कारण उरलें नाहीं. जाताना मातोश्रीनें विनूला खूप समजावून सांगितलें आणि वडिलांनीं सुनबाईला जपून राहण्याबद्दल सुचविलें. परंतु टांगा दृष्टिआड होताच विनूनें सूचक मुद्रेनें सुधेकडे पाहिलें आणि सुधेनेंही त्याच्या नजरेस नजर भिडवली.

दोघेहीजण लहान पोराप्रमाणें हातात हात अडकवून नाचत नाचत घरात गेलीं.

पुढचा आठवडा आजारीपणाच्या राजमान्य सबबीवर विनूनें घरातच काढला त्यानें आणि सुधेनें वारा प्यालेल्या कोकराप्रमाणें काय नाहीं नाहीं ते प्रकार करून पाहिले— काहीं काहीं म्हणून बाकी ठेवलें नाहीं. सिनेमा म्हणू नका—नाटक म्हणूं नका—करमणुकीचे जे जे यच्चयावत् प्रकार असतील त्याची लयलूट अनुभवली. अलीकडच्या तरुणात धडाडी नाहीं म्हणून म्हातारीं माणसें हळहळतात पण त्यानीं या जोडप्याकडे एकवार पाहिलें असतें तर आपलीं विधानें जरा जपूनच केलीं असतीं

पण पक्वानाची गोडी अवीट नसते तृप्तीनतरचें सेवन सुखकारक तर नसतेंच पण प्रसगीं अनुपकारक होऊन बावल्याशिवाय रहात नाहीं हा नवीन अनुभव विनूला हळू हळू येत होता

रात्रीच्या प्रशान्त समयीं शेजारींच दुपारच्या अति श्रमानें थकलीभागलेली सुधा शान्तपणें झोपलेली पहाताक्षणींच त्याला थोडेंसें चमत्कारिक वाटू लागे. श्वासोच्छ्वासाबरोबर नियमितपणें वर खालीं होणारा तिचा उरोभाग पाहून त्याचें हृदय पुन्हा उचल खाई परतु यात काहींतरी चुकत असलें पाहिजे या विचारानें तो कावराबावरा होई व पुन्हा स्वतःशींच विचार करण्यात गर्क होई. आपणही तिच्याइतकेच दमलों असताना आपल्याला जाग का यावी आणि तिला शान्त झोंप लागावी— का ! जबाबदारी सारी आपण सहन करावी आणि आपल्या बावरलेल्या मनाला धीराच्या, समाधानाच्या गोष्टी ऐकवण्याकरता पत्नीनें जरासुद्धा जागें राहण्याचा उदारपणा दाखवू नये हा अन्याय नाहीं का ? आपल्याबरोबर सुखाच्या वेळीं सुधेनें जी तत्परता दाखवावी ती अथरुणावर पडताक्षणींच नाहींशी का व्हावी !

आणि याच क्षणीं त्याच्या डोक्यात एक चमत्कारिक विचार येऊन जाई.

वरून वरून सुधा आपल्या जीवनात एकरूप झालेली दिसली तरी दिवसातून काहीं क्षण असे येत कीं त्या वेळीं ती आपल्यापासून फार दूर दूर जात असे. लोकरीच्या धाग्याप्रमाणें नवराबायकोचें आयुष्य गुरफटून गेलेलें असावें ही त्याची एक लाडकी कल्पना होती. पण वरून एक भासणाऱ्या लोकरीच्या तुकड्यात आतून अगदीं निरनिराळे असे अनेक धागे स्वतंत्र-

पणें वावरत असतात हें त्याला समजत नव्हतें.

विचारासरशीं तो अथरुणावर इकडचा तिकडे वळे. ह्या हालचालीमुळें सुधेची तद्री भग पावे. परतु एकच क्षण! डोळे किलकिले करून ती विनूकडे पाहिल्यासारखें करी आणि पुन्हा डोळे मिटून घेऊन ती निद्राधीन होई.

विनू दुखावलेल्या अतःकरणानें पुन्हा विचार करू लागे

एके दिवशीं या धुमसणाऱ्या वन्हीनें एकदम पेट घेतला.

सबध जगाला होरपळून काढणाऱ्या महाभयानक युद्धाला अगदीं मामुली स्वरूपाचीं कारणे पुरीं होतात. रानात पेटणाऱ्या वणव्याला खडीभर पेटलेले कोळसे लागत नसतात वर वर क्षुल्लक भासणाऱ्या गोष्टीवरून नदनवनाचें श्मशान एका क्षणात बनू शकतें.

त्या दिवशीं सकाळीं उठताना सुधा जरा थोडासा उशीर करून उठली. रात्रीं बारा एक वाजेपर्यंत कोणत्याशा एका भिकार चित्रपटाकरता त्यांनीं जागरण केलें होतें. घरीं आल्यावर सुधा अल्लडपणानें 'एवढ एवढ वाग्याच देठ अन् तुमची माझी सकाळीं भेट' असला आचरट विनोद करून झोपीं गेली आणि विनू मात्र जागाच राहिला!

या महिन्यात या जबाबदार नागरिकानें स्वतःचा पगार तर केव्हाच उडवला होता परतु मागच्या बिऱ्हाडाचे भाड्याचे पैसेही वाटेस लावले होते. पोस्टबुकात आता एक दमडा शिल्लक उरला नव्हता. महिन्याचे उरलेले पधरा सोळा दिवस कसे जाणार या विचारानें विनूला बेचैन करून सोडलें होतें. आणि त्यात एक दोन दिवसापूर्वी वडिलाकडून एक उपदेशवजा पत्र आलें होतें. त्यातील 'तुम्ही सुज्ञ आहात— तुम्हास आम्हीं सागावें असें नाहीं परतु—' इत्यादि निऑन साइन्सप्रमाणें लखलखीत दिसणारीं वाक्यें सहजासहजीं विसरण्याजोगीं नव्हतीं भडक प्रकाशाचा परिणाम डोळ्यावर तात्कालिक स्वरूपाचा होणारा असला तरी मेंदूवर तो बराच वेळ टिकून राहतो.

काय असेल तें असो, सुधेला त्यानें या अडचणींची एका अक्षरानें ओळख दिली नव्हती. एरवीं कोणत्याही गोष्टीची तिच्याशीं समग्र चर्चा करणारा विनू या बाबतींत तिच्याशीं एक अक्षरही बोलला नाहीं हें वाटतें तितकें आश्चर्यकारक नव्हतें. स्त्रियाना जगातील यच्चयावत् उलाढाली समजत असल्या तरी त्याना आपल्या पगारातील चाळीस रुपयाचा व्यवहार समजणें

अशक्य आहे हीच प्रत्येक पुरुषाची सरळ समजूत असते स्त्रियाना पैसे घेणें समजतें पण खर्च करणें समजत नाहीं ही त्याची कल्पना होती. स्त्रियाच्या दलित स्थितीविषयीं कळवळा येऊन त्याना आपलें अधिकारक्षेत्र समजावून सागण्याचा आव आणणाऱ्या संभावित लोकानीं जर स्त्रियानीं केस कापावेत किंवा विकच्छ नेसावें इत्यादि गहन विषयाव्यतिरिक्त पैशाचे व्यवहार कसे चोख पार पाडावेत हें शिकविण्याचें मनावर घेतलें तर जगावर मोठे उपकार होतील विनूच्या दुर्दैवानें अजून असा एकही महाभाग पुढें आलेला नव्हता.

सबध रात्रभर विनू अथरुणावर तळमळत पडला होता आणि सुधा शान्तपणें झोपीं गेली होती. मध्येंच एकदा ती जागी झाल्यासारखी होऊन अर्धवट आश्चर्यानें विनूच्याकडे पहात त्याच्या कुशींत डोकें खुपसून पुन्हा झोपीं गेली होती विनूला एरवीं उन्मादकारक वाटणारा तिचा स्पर्श आज जरा निराळाच वाटला सहानुभूतिशून्य मनानें आपली पत्नी झोपीं जाते याचें त्याला वैषम्य वाटू लागलें त्यानें तिच्या मानेखालचा आपला हात अलगत काढून घेतला व जाग्रणानें चुरचुरणाऱ्या डोळ्यावरून कढत कढत भासणारे हाताचे तळवे फिरविले नतर त्याला केव्हा झोप लागली त्याचें त्यालाच कळलें नाहीं

सकाळीं तो तिच्या आधींच जागा झाला. चिमणीसारखें तोंड करून, अगाचा कानवला करून सुधा तशीच झोपेंत पडली होती. आज विनूच्या डोक्यात सैतान शिरला होता. रोज सकाळीं तिला तो काव्यमय पद्धतीनें जाग आणीत असे पण आज तो काव्य विसरला होता. दोन्ही दडाला धरून त्यानें तिला वुसळून जाग आणण्याचा प्रयत्न केला सुधा थोडीशी दचकून जागी झाली. काय होतें आहे हें समजण्याच्या आत विनू तुटक-पणानें म्हणाला—

'झाली का निवान्त झोप ? उठा आता आणि नवरोजींच्या घशात चहाचें पाणी ओतण्याची तयारी करा.'

'नवरोजी !' सुधा आळोखेपिळोखे देत आश्चर्ययुक्त मुद्रेनें हसत म्हणाली.

'होय नवरोजी. म्हणजे मी. आलें लक्षात ! एखादी पाचट कोटी करू नकोस. ऊठ ! किती वेळ झोपतेस ? मला सकाळीं चहा लागत असतो

त्याचा काहीं अंदाज तरी आहे का तुला ? माणसानें मर मर मरावें आणि घरीं त्याच्याच बायकोने ही त्याच्याविषयीं आस्था बाळगावी ! काय न्याय आहे !' विनू अंगावरचें पांघरूण दूर भिरकावून देत म्हणाला

सुधेला हा विनूचा अवतार अगदीं नवीन होता. ती थक्कच झाली. एकाएकीं काहीं कारण दिसत नसता चिडलेला विनू अजून तिनें कधींच पाहिला नव्हता प्रथम तिचा विश्वासच बसेना. परंतु विनूचीं यापुढचीं भाषणें ऐकून तिची खात्री झाली कीं मिय्यासाहेब खरोखरीच बहोत गरम पडलेले असावेत पण तिला हे कळेना कीं का

विनू तावातावाने उठला आणि तिच्याकडे एकवार ढुंकूनही न पाहतां तो खोलीबाहेर तडक निघून गेला

स्पिरिटच्या बाटलींत खडखडाट होता स्टोमध्यें तेलाचा मागमूसही नव्हता. रागारागात पपाचा शक्य तितका आवाज करीत त्यानें डब्यातून तेल हपसलें, बरेचसे जमिनीवर सांडू दिलें आणि स्टोचा भडका उडवून दिला

'मी चहा करतें.' सुधा मध्येच म्हणाली

'माणूस मरायला लागले तर त्याला पाणी देण्याचें औदार्यसुद्धा तुमच्या-च्यानें दाखवणें होणार नाहीं रात्रभर मी तडफडत होतों. डोळ्याला डोळा नाहीं माझ्या अन् तू मात्र तीन महिन्याच्या पोरासारखी खुशाल पसरली होतीस.' विनू चिडून म्हणाला

'पण मग मला उठवल का नाहींत ?' किंचित् खजील होऊन सुधा म्हणाली

'असें सांगून मला सहानुभूतीची भिक्षा नको आहे. मारे थापा मारतेस कीं आपण मनानें सुद्धा अगदीं एकजीव आहोंत, अन् इकडे मी इंगळ्या लागल्याप्रमाणें तळमळत पडलों तर तुला निवान्त झोप सुचते. एकदरींत काय ? चार सामान्य लोकांप्रमाणेंच आपणही आहोंत. उगाच लब्या-चवड्या बाता मारून स्वत.ला फसवण्यात काहीं अर्थ नाहीं. जगामध्यें कोणी कुणाचें नाहीं, ज्याचा तो हेंच खरें ' विनू स्टोच्या निळ्या प्रकाशा-कडे स्थिर नजरेनें पहात म्हणाला.

आता मात्र सुधेच्याही मनानें थोडीशी बडखोरी करण्यास सुरवात केली.

उगाच माणसानें आग पाखडावी— कोण सहन करून घेईल ? रागात खालचा ओठ दातांनीं चावून ती मिस्कीलपणानें म्हणाली—

'पटल ना हें ? बरी लवकरच शुद्धि आली म्हणायची ! आता माझा चहा टाकू नका माझा मला करून घेता येईल बर का ! आणि सागून ठेवतें— तुम्हाला काय तत्त्वज्ञान बडबडायच असेल तें स्वतःशींच बडबडत जा. मला एक अक्षर सुद्धा सागू नका तुम्हाला जस कळल तस मलाही आता कळल आहे ' तिचा फणकारा और होता

दोघाचेंही चहापान एकएकट्यानें उरकण्यात आलें दोघाच्याही अतः-करणाचा पीळ बराच तीव्र स्वरूपाचा होता जगाकडे केवळ उपभोगाच्या दृष्टीनें पाहणाऱ्या विनूला हलकें हलकें समजून येऊ लागलें होतें कीं जग तितकेंसें दुधखुळें नाहीं आईबापाची मुलाकडे पाहण्याची दृष्टि निराळी असते आणि तिऱ्हाईताच्या घरातून आलेल्या पत्नीची दृष्टि निराळी असते. मुलानें कितीही फाजील हट्ट धरला तरी आईबाप आपल्या जिवाला त्रास सहन करून प्रेमळपणानें मुलाच्या सुखाकरता धडपडतात. परतु दुसऱ्याची मुलगी जेव्हा आपण सुखाचा फुंकर घालावा तेव्हाच खुलते. एरवीं ती चटकन् आपल्या पाकळ्या मिटवून घेऊ शकते कितीही झालें तरी कलम केलेली फादी मूळ वृक्षासारखी कशी असेल ?

बबातल्या पाण्यानें विनूनें मुकाट्यानें अघोळ करून घेतली. रागारागानें परतु सुधेला ऐकू जाईल अशा बेतानें बादली खाड खाड वाजवीत तो मागच्या परसातल्या नळावर धोतर धुण्यास निघून गेला. सुधा सर्व काहीं पहात होती. पण तीही जरा कुऱ्यांतच होती विनू काय काय करील तें मुकाट्यानें पहाण्याचें तिनें ठरवून टाकलें होतें.

नळावर अष्टपुत्राच्या सावित्रीचा सत्यवान नबर चार का पाच याला अघोळ घालण्यात गुतलेला विनूला दिसला त्याने विनूच्या बादलीकडे पाहून आश्चर्यानें पाहून म्हटलें,

'का हो विनायकराव, आज काय स्वातत्र्याचें निशाण उभें करायला आलात काय ? आमच्या स्वातत्र्यसूर्याची आजची शेवटची मर्यादा आहे— तुमची सुरवात दिसते आहे.'

विनू बादली खालीं ठेवीत कपाळाला आठ्या चढवून त्याच्याकडे पाहूं

लागला.

'अरे, तुम्ही तर अगदीं जिव्हारीं लागल्यासारखेंच करतां आहात ! विनायकराव, अहो असें त्रासून कसें चालेल ? अठरा वर्षं मी बायकांची ही झोटिंग पादशाही सहन करतों आहे पण त्याचें मनावर काहीं दडपण ? ऊं हूं ! अच्छा बञ्या, तू घरात पळ आता. आणि नंतर पाच अघोळी-ला चलो.' कवाइती थाटात ते गृहस्थ ओरडून म्हणाले.

सुमारें पधरा मिनिटानतर विनूला नळ मोकळा मिळाला. विनूनें बादली नळाखालीं ठेवली आणि आता धुणें जरा जड लागल्यासारखें वाटलें म्हणून तो बादलीकडे जरा निरखून पाहू लागला. इतक्यात शेंडीला फटकारे मारून पुरुषसूक्त म्हणणाऱ्या ह्या पुराणपुरुषानें मोठ्यानें हसावयास सुरवात केली. विनू गोंधळून त्याच्या तोंडाकडे पाहू लागला.

'भले गुरु ! मडळींचें पातळही धुवायला आणलेंत वाटतें ?' ते गृहस्थ पुरुषसूक्त म्हणण्याचें विसरून हसू लागले.

विनूला आपली चूक कळून आली सुधेचें पाढरें पातळ न्हाणीघरात पडलें होतें तेंच तो गर्दीगर्दीनें घेऊन आला होता आणि धोतर आणण्याचें तसेंच राहून गेलें होतें. कशाला बायका पाढरीं पातळें वापरतात कोणास ठाऊक ! तशीच बादली घेऊन विनू गडबडीनें घरात पळाला. दाराआड उभी राहून स्वतःशींच हसत असलेली सुधा पाहून तो जास्तच चिडला. त्यानंतर धुण्याचें काम तसेंच टाकून देऊन तो आपल्या खोलींत जाऊन बसला.

सुधेनें केलेल्या स्वयपाकाचे उडत उडत चार घास पोटात ढकलून तो ऑफिसात जावयास निघाला. आजचें त्याचें ऑफिसात जाणें म्हणजे शेक्सपीअरनें वर्णन केलेल्या विव्हळत शाळेंत जाणाऱ्या पोरासारखें होतें. कामाची हौस त्याला कधींच नव्हती त्यात पुन्हा आज तो घरात चिडून बाहेर पडत होता. सुधेशीं एक अक्षरही न बोलता तो घराबाहेर पाऊल टाकणार तोंच सुधेनें त्याला हटकले. तो शक्य तितका चेहरा तप्रउग्र करून तिच्याकडे पाहू लागला.

'मी माहेरीं जाणार आहें.' सुधा हातांतल्या बिल्वराशीं खेळत म्हणाली.

'तुझी तूं स्वतत्र आहेस. मला काय विचाराचें कारण ?' विनू सतापून बाहेर पडत उद्गारला.

'बर आहे. समजलं. पुन्हा नाहीं विचारायची' म्हणून म्हणत सुधेनें धाडकन् दरवाजा लावून घेतला.

त्यातल्या त्यात विनूला थोडेंसें बरें वाटलें. ज्याच्यावर आपण रागावलों आहोंत त्याला आपल्या रागावण्यानें त्रास होत आहे यातच माणसाला एक प्रकारचें समाधान वाटत असते. सुधाला त्रास होत आहे हें तिचे डोळेच जाहीर रीतीनें सागत होते.

विनू रागातच ऑफिसात शिरला. दारात उभा असलेल्या मीरमहमद पट्टेवाल्यानें केलेल्या हसतमुख सलामाकडे त्यानें बिलकूल लक्ष दिलें नाहीं. ऑफिस बॉयच्या अगावर तो जरा बेतानेंच दोनतीनदा खेकसला साहेबानें हाक मारली असता प्रथम दोन वेळेला त्याने बेफिकीरपणानें पट्टेवाल्याच्या विरोधाकडे लक्षच दिलें नाहीं. शेवटीं 'साब बिलकूल गरम हो गया है. जल्दी करो' या पट्टेवाल्याच्या धमकावणीवजा सूचनेला मान देऊन तो निरुपायानें साहेबाच्या खोलीकडे गेला साहेबानें उपटून दिलेले लाक्षणिक कान चोळीत तो धुसफुस करीतच बाहेर आला आणि साहेबानें बजावून सागितलेली पुनमचद रामनारायण कत्राटदाराची फाईल जोरानें टेबलावर आदळून तो रागारागानें आकडेमोड करू लागला. शेजारच्या एका कारकून दोस्तानें शेळीचा सिंह झालेला पाहून जसे डोळे फाडावे त्याप्रमाणें त्याच्याकडे एकवार आश्चर्यकारक मुद्रेने न्याहाळून पाहिलें आणि मुकाट्यानें आकडेमोड करणाऱ्या विनूकडे पाहून खिन्नपणानें मान हालवीत त्यानें आपल्या कामात डोकें खुपसलें. ऑफिसातून सिंहाच्या शेळया बनविण्यात येत असतात. उलट प्रकार झालेला अजून कोणीं पाहिलेला नाहीं.

संध्याकाळीं विनू विमनस्क मनःस्थितींत घरीं आला. दाराला बाहेरून लागलेले कुलूप पाहून त्याला एकदम धक्का बसल्यासारखें झालें. खरोखरीच सुधा माहेरीं गेलेली दिसत होती. ती अशी तडकाफडकीं माहेरीं निघून जाईल अशी त्याला कल्पना सुद्धा नव्हती. —आणि आता दार तरी कसें उघडणार !

इतक्यात मागच्या अष्टवालापैकीं एकाने त्याच्या हातात किल्ल्यांचा जुडगा आणून दिला.

आपण आज घरात एकटेच तर ! आज सकाळीं घरांत सुधा होती

तरी तो एकटाच होता. ऑफिसात पचवीस माणसें वावरताना त्याला दिसत होतीं तरी पण तो एकटाच होता. आणि आता या भयाण वाटणाऱ्या, खायला उठणाऱ्या घरात तो एकटाच होता ! रस्त्यातून जाणाऱ्यायेणाऱ्याचे आवाज इच्छेविरुद्ध त्याच्या कानावर आदळत होते. मागच्या बाजूला आठ आणि दोन दहा जीव एकमेकाशीं मडईतल्या दलालाना लाज वाटेल इतक्या तारस्वराने ओरडून काहींतरी बोलत होते. पण तो एकटा होता. कारणानिमित्त चार जीव एके ठिकाणीं येतात आणि नतर एकएकटेपणानें आल्या वाटेनें परतीचा प्रवास सुरू करतात ! खरोखरीच जगात आपलें असें कोण आहे ? वडिलाची आणि आईची सोबत आपल्याला कितीशी पुरेल ? वृद्ध आत्याबाईनीं तर आपल्या लग्नानतर नाशकास सुवाल्या केला होता. प्रत्येकजण एकएकटेपणानें आपआपली सोय लावून घेण्यात चूर असतो. आपण आलों एकटे, जाणार एकटे आणि मग मध्यतरींच्या काळात तरी दुसऱ्याच्या सहवासाची अपेक्षा आपण का धरावी ? 'अः ! गेली तर गेली माहेरीं' म्हणून पुटपुटत तो दिव्यापाशीं वाचीत बसला.

पण हें तत्त्वज्ञान विनूला फार वेळ झेपणें शक्य नव्हते. एकलेपणाचें तत्त्वज्ञान विचार करायला मोठें गोड असले तरी मनुष्यप्राणी दुकट्यासाठीं तहानेला असतो हें निर्विवाद आहे

तहान लागली म्हणून पाण्याच्या शोधार्थ विनूनें स्वयंपाकघरापर्यंतचा प्रवास सुरू केला. घड्याळाने आठ वाजल्याचें जाहीर केलें. पाठीमागच्या बाजूनें एकाचा हसण्याचा व दुसऱ्याचा सतापण्याचा आवाज त्याला ऐकू आला.

चुलीवर भाडीं पाहून विनूला आश्चर्य वाटलें. त्यानें जवळ जाऊन भाड्यावरचीं झाकणे काढून पाहिलीं तों भात, भाजी, पोळ्या इत्यादि जिन्नस तयार केलेले त्याला दिसून आले. हे कोणाकरता ?

सुधा रागावून गेली तरी विनूच्या जेवणाची काळजी तिला होती. विनूला थोडेंसें फिरल्यासारखें झालें. आपण अविचार तर करीत नाहीं ना ? उगाच तऱ्हेवाईकपणानें वागून आपल्याबरोबरच दुसऱ्याही जिवाला आपण विनाकारण दुःखाच्या खाईत होरपळून तर काढीत नाहीं ना ? देवाण घेवाण हा जगाचा न्याय आहे, त्यात आपण फक्त घेवाण सभाळतों आणि देवाणीकडे दुर्लक्ष करत नाहीं ना ?

तसें पाहिलें तर सुधेकडे काय दोष होता ? स्त्रियाना पैशाच्या जबाब-दाऱ्या कळत नाहींत हा त्याचा दोष कसा असेल ? त्यातून अपल्या दुःखाशीं सहभागी होण्याची आपण त्याना तशी संधि देतोंच कोठें ? त्यानीं सुंदर राहून नवऱ्याला प्रसन्न ठेवावें एवढेंच आपण त्याना शिकवतों पण जगाचा कटुतर मार्ग त्याच्या प्रत्ययाला आणून देऊन त्याना नवऱ्याशीं दुःखाच्या प्रसंगीं सुद्धा कसें सहभागी व्हावें हें कोठें शिकवतों ? विनूनें डोकें दोन्ही हातानीं घट्ट दाबून धरलें त्याला काहीं सुचेना.

ताबडतोब तिच्या घरीं जाऊन तिला घेऊन आलों तर ?

विचारासरशीं तो पाणी पिण्याचें विसरून एकदोन पावलें मागें परतला. आणि आश्चर्यानें व आनंदातिशयानें तो समोर पहातच राहिला ! समोर सुधा व तिच्या मागें मागच्या बिऱ्हाडातील सावित्री ह्या उभ्या होत्या.

'संभाळा आपल्या या गृहिणी अजून एक पोर झाल नाहीं तर इतका हा कडवटपणा— माझ्यासारखीं आठ होतील तर रानातच पळून जातील.' ती सावित्री हसत हसत निघून गेली

'सुधा !' विनू तिच्याकडे पाहून म्हणाला

सुधेनें भरल्या डोळ्यानीं त्याच्याकडे एकवार मोठ्या मुश्किलीनें पाहिलें व मोत्याचे सरच्या सर तिच्या गालावरून ओघळू लागले. विनूनें तिच्या खांद्यावर हलकेंच हात ठेवला.

'सुधा, आपलें हें पहिलें आणि शेवटचेंच युद्ध ! मला तुझ्यावाचून करमणार नाहीं.' तो म्हणाला.

'आणि मलाही पण.' सुधा स्फुंदत स्फुंदत त्याच्या छातीवर डोकें ठेवून म्हणाली.

'पुढें केव्हा एकटेपणाचा प्रवास सुरू होईल तो होवो परंतु आज मात्र आपण एकमेकाला क्षणभरसुद्धा मोकळें सोडायचें नाहीं हं ! ठरल ना ?' विनू तिच्या हनुवटीला हात लावून तिचें तोंड वर करीत म्हणाला.

सुधेनें हसत हसत त्याच्या तोंडाकडे आतुर नजरेनें एकवार पाहिलें आणि—'

—आणि त्या दोघानीं तहनाम्यावर सह्या ठोकल्या !

———

# पहिला नंबर !

अस्तास जाणाऱ्या लाल गोळ्याकडे पहात किंचित् अभिमानानें श्री. देशपाड्यांनीं आपल्या करड्या दाढीवरून प्रशस्तपणें डाव्या हाताचा तळवा फिरवला. लहानपणीं नादिष्टपणा म्हणून ज्या ताठर डोळ्यानीं ते घटकान् घटका उगवत्या वा मावळत्या सूर्यांकडे टक लावून पहात असत त्या अभ्यासाची आज त्यानीं न कळत उजळणी केली. त्याच अभिमानानें त्यानीं आपली विशाल छाती आणखी थोडीशी रुंदावून समोरच्या शेल्फवर ठेवलेल्या विष्णुशास्त्र्याच्या अर्धपुतळ्याकडे क्षणभर नजर टाकली. ह्याच थाटात त्यानीं समोरच भिंतीवर व्यवस्थितपणें टांगलेल्या आपल्या फ्रोबेल, स्पेन्सर, रूसो इत्यादि पूर्वसूरींकडे एकवार पाहिलें आणि नतर डाव्या हाताला भिंतींत बसवलेल्या बिलोरी आरशात स्वतःचें प्रतिबिंब त्यानीं किलकिल्या डोळ्यानीं न्याहाळून पाहिलें

बाजी देशपाडे स्वतःच्या कर्तबगारीवर जितका निहायत खुश झाला नसेल इतके ते आजच्या स्वतःच्या कर्तबगारीवर फिदा होते. स्वराज्याच्या ऐन रणसग्रामात मर्दुमकी गाजवणाऱ्या वीराच्या वशजानें आज आपलें नाव बरेंच सार्थ असल्याचें कृतीनें पटवून दिलें होतें. श्री. देशपाडे आज वयाच्या पचेचाळीसाव्या वर्षी आरशातल्या स्वतःच्या रूपावर बेहाय खूश होते. आज त्याच्या हातून कामगिरीहि पण तशीच अलौकिक घडून आली होती.

एखाद्या शाळेचा गडी म्हणून ह्यात काढणें अतिशय सोपें असतें परंतु जबाबदार मुख्याध्यापक म्हणून एक वर्ष सुद्धा सहीसलामत पार पडणें मुश्किलीचें असतें. आश्चर्य वाटेल परतु सत्यकथन असें आहे कीं एरव्हीं कितीहि जुलूम सुनेच्या सथपणानें सहन करण्यात अपवादादाखल निर्देशिलेला शिक्षक शुष्क वादविवादात आपल्या निर्मात्याला सुद्धा हार जाणार नाहीं. शिक्षक, भिक्षुक आणि देशभक्त हे रगात आले कीं श्रोत्यानीं भरलीच म्हणून समजायला हरकत नाहीं. निसर्गानें आपल्या डोक्यावर आकाशाची अनत पोकळी निर्माण करून ठेवली आहे हें आपलें भाग्य आहे नाहीं तर जगा-

तील या त्रिमूर्तीच्या तोंडाच्या पट्टयामुळें सारी जनता हवालदील होऊन गेली असती, किंबहुना 'घड कानाचा' हा शब्दप्रयोग सुद्धा कोशात पहावा लागला असता.

पैकीं श्री. देशपाडे याना जगातील या आपत्तीच्या एकतृतीयाशाशीं सामना द्यावयाचा होता. आणि आजपर्यंत सुमारें दोन वर्षाच्या कारकीर्दीत त्यानीं तत्त्व आणि व्यवहार यांचा योग्य समन्वय घालून आपल्या उच्च आकाक्षाना बिलकुल धक्का लागू दिला नव्हता. श्री. देशपाडे यानीं आजपर्यंत या सस्थेंत सुमारे वीस वर्षे विद्येचा एक प्रेमळ पाईक या नात्यानें चोख कामगिरी बजावली होती. विद्यादानाचें व्रत त्यानीं आजपर्यंत अत्यत कसोशीने पार पाडलें होतें. दुसऱ्या कुठल्याहि क्षेत्रात जागा नाहीं म्हणून ते मास्तर 'बनले' नव्हते. त्यानीं शिक्षा म्हणून हा पेशा स्वीकारला नसून दीक्षा म्हणून ते शिक्षक झाले होते परतु कोठल्याहि सस्थेंत दुय्यम दर्जाचें काम पत्करायचें तर आपल्या तत्त्वाचें गाठोडे घरीं ठेवूनच कामावर हजर राहावयाचें असतें दोन वर्षापूर्वी जेव्हा त्याना ही कर्णधाराची मानाची जागा मिळाली तेव्हा त्याना अत्यानद झाला, तो आनद स्वार्थमूलक नव्हता, तर ज्या तत्त्वाना त्यानीं अडगळीच्या जिन्नसाबरोबर माळ्यावर ठेवून दिलें होतें त्या तत्त्वाना आता मोकळें अगण मिळालें म्हणून. गुरु सादीपनींचा काळ आता राहिला नव्हता. त्या वेळची पद्धतही आता निरुपयोगी ठरली असती हें त्याना पूर्णपणें कळत होते परतु आज शिक्षणाचा जो व्यापार चाललेला आहे त्याला पायबद घातलाच पाहिजे आणि शिक्षणाचें कार्य उच्च दर्जाचें बनलें पाहिजे हें त्याचे ठाम मत होतें.

त्या दृष्टीनें त्यानीं मागच्या दोन वर्षात खूप परिश्रम केले. त्याच्या पत्नीनें सुद्धा थट्टेनें म्हणावें कीं चुकलेला फकीर मशिदींत सापडतो म्हणून म्हणतात त्याप्रमाणें बेपत्ता शिक्षक शाळेच्या आवारात सापडायचा अशी अशी एखादी नवीन म्हण बनवावी.

—आणि खरोखरीच श्री. देशपाडे आपल्या कार्याशीं इतके तन्मय झाले होते कीं त्याना बाह्यजगाचा अलिकडे पूर्ण विसर पडल्यासारखें झालें होतें. शाळा सुटल्यावर उद्या काय करायचें हे बेत आपल्या एकदोन सहकाऱ्याबरोबर ठरवीत असताना दिवेलागण होत आहे याचाही त्याना पत्ता

नसे. शेवटीं नेहमीं उभ्या उभ्या झोप घेण्याचा चाळा लागून राहिलेला रामा गडी जेव्हा बाहेरच्या बाजूस भुईसरपट होऊन मोठमोठ्यानें घोरू लागे तेव्हा ते नाइलाजानें खुर्चीवरून उठत. या त्याच्या नादिष्टपणाचें बाह्यतः कौतुक करण्यात येत असलें तरी त्यामुळें त्यानीं शत्रुत्वाचीं बीजें आपल्या भोंवतीं पेरून ठेविलीं होतीं याचा त्याना पत्ता नव्हता. प्रथम प्रथम त्यानीं एखादी सूचना करावी आणि त्याच्या हाताखालच्या मडळींनीं ती शिरोधार्य मानून तनमनधनेंकरून ती अमलात आणण्याचा प्रयत्न करावा असें सुमारें पाच सहा महिने चालू होतें. परतु पुढें ती सूचना म्हणजे आज्ञा असा अर्थ करण्यात येऊ लागला— आणि कामें बिनबोभाट होत पण त्यात जीव नसे. अधिकाऱ्याच्या पुढें निर्भीडपणें आपलें मत माडणारा सेवक अजून जन्माला यायचा आहे. अजूनपर्यंत तरी निदान तोंडावर सुरात सूर मिळविणारे आणि पश्चात् फाटे फोडणारे वीर शेकड्यानीं सापडतील.

आपल्या सहकाऱ्यात आणि हाताखालच्या मडळींत थोडासा बदल झाला आहे याची जाणीव त्याना हळू हळू होऊ लागली होती. प्रथम त्यानीं दुर्लक्षच केलें. पण पेटणारे घर आपोआप विझत नसतें. काहीं शिक्षक-मडळींच्या बोलण्यातून, क्वचित् प्रसगीं कृतींतून, होणारा उपहासगर्भ विरोध वारवार जेव्हा त्याच्या दृष्टोत्पत्तीस येऊ लागला तेव्हा त्याना प्रथम आश्चर्य वाटलें. लोकोपयोगी कार्य करीत असताना आपल्याला लोकानीं विरोध करावा याचें त्याना आश्चर्य वाटलें. नतर त्याना वाईट वाटलें. कोणतीही चागली गोष्ट होऊ नये असा निसर्गाचा एखादा नियमच असावा कीं काय याचें त्याना राहून राहून वाईट वाटत होतें. शिक्षक हा दिवसाच्या काहीं ठराविक वेळीं विद्यार्थ्यांचा पिता, नेता इत्यादि जबाबदारीच्या भूमिकेवर उभा असतो. ज्या गोष्टी शिकवायला, समजावून द्यायला घरीं त्याच्या जन्मदात्याला इतर व्यवसायामुळें फुरसत मिळत नाहीं त्या गोष्टी शिक्षकानें वर्गात करावयाच्या असतात. तेव्हा शक्य तोंवर विद्यार्थी जास्तींत जास्त त्या शिक्षकाच्या सहवासात राहील तितका तो परिणाम जास्त ठशीव घडून येईल हें उघड आहे. या सदिच्छेनें प्रेरित होऊन शाळेचा वेळ अर्ध्या तासानें वाढविण्यात आल्यावर त्याच्यावर बरीचशी मंडळी घुस्सा झाली. परंतु विद्यार्थ्यांचें कल्याण हा एकच विचार त्याच्या डोक्यांत घोळत

असल्यामुळें त्यांनीं विरोध जुमानला नाहीं. जणू काय काहींच झालें नाहीं अशा पद्धतीनें त्यानीं आपला क्रम सथपणें चालू ठेवला होता.

—आगींत तेल ओतल्याप्रमाणें प्रकार झाला तो अगदीं क्षुल्लक कारणावरून. वाळलेला पाचोळा ठिणगीचीच वाट पहात असतो. पुण्या-मुंबईकडच्या शाळातून शेवटच्या श्रावणी सोमवारी सुट्टी देण्याचा प्रघात असतो त्याप्रमाणें येथेही तो प्रघात अलिकडे काहीं वर्षे पाडण्यात आलेला होता. श्री देशपाडे याच्या मतें ही सुट्टी निष्कारण देण्यात येत होती. धर्मांची सबब पोकळ होती. ज्याला देवदर्शन घेतल्यावाचून जगवत नाहीं असा एकही प्राणी जगात नाहीं हें अगदीं सत्य होतें त्यातूनही ज्याला इतकी तळमळ होती त्याला सकाळ आणि सध्याकाळ मोकळी होतीच— तेवढ्याकरता सुट्टी कशाला— या विचारानें त्यानीं आपल्या अधिकारात त्या दिवशीं शाळा भरवली.

—आणि दुसऱ्या दिवशीं सस्थेच्या सेक्रेटरीसाहेबाचें त्याना आमत्रण आलें. त्यानीं त्या निर्बुद्ध चिटणीसाला खूप समजावण्याचा प्रयत्न करून पाहिला परतु जन्मात एकदाही देवळाची पायरी न चढणारा तो महात्मा धर्माच्या ओंढक्याला घट्ट चिकटला गावात दोन शाळा. एका शाळेला सुट्टी आणि दुसरी शाळा चालू—आणि ती सुद्धा श्रावणी सोमवारीं गावातल्या लोकाची सहानुभूति कशी राहील हा चिटणीसाचा मुद्दा बिनतोड होता. यावर सर्वसाधारण जनता अज्ञानी असते, ज्याचें त्याला हित कळायला सुद्धा अक्कल लागते, आपल्यासारख्या लोकानीं इतराची समजूत घालून त्याना योग्य तें वळण दाखविणें हें कर्तव्य आहे इत्यादि वचनाचा श्री. देशपाडे यानीं भडिमार केला. परतु चिटणीसानीं चक्क उत्तर दिलें, 'इग्लंडच्या राणीसाहेबानीं सुद्धा धर्मांत हात घालणार नाहीं अशी कबुली दिली आणि तुम्हीच एवढे कोण लागून गेलात ? तसें पाहिलें तर आम्हा व्यापारी मंडळीपेक्षा तुम्ही मास्तर मडळीच खूप सुट्टी खाता. आम्हाला समजतें तें. पण त्याला काय करणार ? अशा धर्माच्या सुट्ट्या दिल्या नाहींत तर धार्मिक पालक खवळून उठतील आणि शाळा ओस पडेल.'

थोड्याशा खिन्न मनानें श्री. देशपाडे त्या दिवशीं शाळेंत आले होते. त्याच्या मनाची पुरेपूर खात्री झाली होती कीं आपण शिक्षक मंडळी

चुकारपणा करीत आहोंत. वर्षाच्या तीनशेंपासष्ट दिवसातून जेमतेस १९० ते २०० दिवस शाळा भरवायची म्हणजे शुद्ध लुच्चेगिरी आहे विद्यार्थ्यांच्या पदरात आपण ज्ञानाचें पुरेपूर माप एवढ्या थोडक्या काळात कसें टाकू शकू ? कोणतीही सुट्टी तोडायची म्हणजे विरोध हा ठरलेलाच. आणि पालकाना सुद्धा हा प्रकार मान्य असेल ?

त्या दिवशीं त्यानीं मधल्या सुट्टीनतर शाळा सोडली— प्रत्येकजण अचबाच करीत होता ज्या देशपाड्याना शिक्षकाची एका मिनिटाचीही देरी सहन होत नसे त्यानीं आज शिक्षकाच्या सभेकरता दोन तास शाळा आधीं सोडायची म्हणजे काय गोष्ट आहे !

—आत्ता ते आरशासमोर उभे राहून स्वतःशींच थोड्या वेळापूर्वी घडलेल्या प्रसगाची पुन्हा जुळणी करून पहात होते. उपरण्याच्या सोग्यानें त्यानीं आपल्या नासिकाग्रावर चमकणारे दोन घर्मबिंदु हलक्या हातानें टिपून घेतले. बाहेरच्या बाजूस रामाचें उभ्या उभ्या चाललेलें नित्याचें निद्रासगीत मधून मधून त्याच्या कानावर येत होतें. बाहेरच्या पटागणात एक दोन विद्यार्थी सृष्टिनिरीक्षणाच्या सबबीवर बागेंतील फुलें हळूच तोडण्यात गर्क झालेले त्याना खिडकींतून दिसत होते. दूर रस्त्यावर एक मोटारगाडी आपले विश्वरूप उघडून पडलेली दिसत होती. समोरच्या पोपईच्या झाडाचा बुधा वाऱ्याच्या झोतासरशी हेलकावे खात होता. एकदम त्याना मघाचा प्रसग आठवला—

—ते शिक्षकाच्या आरामशाळेंत शिरत होते. आत शिरता शिरता विनाकारण अति पुढे पुढें करणारा सस्थेचा एक आधारस्तभ गभीर मुद्रा करून उभा असलेला त्यानीं पाहिला. त्याचें त्याच्याकडे लक्ष जाताक्षणींच त्याने अर्धा इच आपले दात बाहेर काढले, जरा अदबीनें उभें राहिल्यासारखें केले आणि पोपटासारखी मान तुकवून दोन्ही हाताचे तळवे एकमेकावर घासण्यास सुरवात केली काय असेल ते असो, या सद्गृहस्थाच्या तोंडून कधींही बेअदबीचा चुकून सुद्धा शब्द बाहेर पडला नव्हता तरी श्री. देशपाड्याना त्याची ही विशिष्ट लकब अत्यत ओंगळ वाटत असे. अधिकारी झाला म्हणून असें पाठीवर पडून याचना करण्याचें काय प्रयोजन ? कोणताही विषय असो, मुख्याध्यापकाच्या सुरात सूर मिळवण्याची त्याची

हातोटी बेमालुम होती. श्री. देशपांड्यांना विरोध एक वेळ मानवला असता परंतु ही श्वानवृत्ति मात्र त्यांना कधींही खपली नाहीं. ते तसेच आंत गेले. सुमारें पंधरा शिक्षक त्यांच्यापुढें बसले होते. जगाच्या यच्चयावत् खंडातील मनुष्यस्वभावाचीं ती विविध प्रतीकें होतीं

सभा तातडीनें घेण्याचें प्रयोजन त्रुटितपणें सांगून त्यांनीं थोडक्यांत आपला मनोदय प्रकट करून दाखविला

'—मला काय पाहिजे आहे तें मी आपणांपुढें निःसंकोचपणें मांडीत आहें. विद्यार्थी ही हरळीची मुळी आहे. तिची जोपासना करणें हें आपलें कर्तव्य आहे कालान्तरानें त्या मुळीची वनस्पति होईल आणि त्या दूर्वांकुरानें आपण सिद्धिविनायकास वश करून घेऊं शकूं आपण हल्लींच्या परिस्थितींत ही जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडीत नाहीं असें मला वाटतें. मला क्षमा करा, स्पष्ट बोलतों, राग मानूं नका हें उडतपगड्याचें दान परिणामीं हितकर होणार नाहीं. ज्ञानोपासना आहे ह्यापेक्षा भरपूर झाली पाहिजे विद्यार्थ्यांच्या ध्यानींमनींस्वप्नीं पायथागॉरसचा थिऑरेम खेळत राहिला पाहिजे, रात्रीं झोपेंतून तो जागा झाला पाहिजे आणि त्यानें 'युरेका—' म्हणून ओरडलें पाहिजे. ज्ञानानंदात तो सदैव निमग्न झाला पाहिजे—'

'तें सगळें खरें पण आम्ही मास्तरही माणसेंच आहोंत— आम्हालाही संसार आहेत ' एक जण छातीवर हातांचें स्वस्तिक ठेवून म्हणाला.

'विद्यार्थ्यांकरता शिक्षकानें खूप झटलें पाहिजे आपला विद्यार्थी श्रेष्ठ दर्जाचा रहावा याविषयीं त्याला अहर्निश तळमळ लागून राहिली पाहिजे. कल्पना करा— मॅट्रिकच्या पहिल्या दहा नंबरांत गेलीं दहा वर्षें आपल्याकडे एकही विद्यार्थी येऊं शकला नाहीं. त्यापूर्वी शाळा स्थापन झाल्यापासून दोनदां आपण पहिला नंबर घेतलेला आहे. कोठेंतरी आपलें चुकत असलें पाहिजे. आपले विद्यार्थी पूर्वीप्रमाणें पहिल्या दहा नंबरांत झळकले पाहिजेत.' श्री. देशपांडे म्हणाले. Shri deshPANDE said

शिक्षकांच्या सभेचा शेवट मामुलीप्रमाणें झाला. श्री. देशपांडे यांना आज थोडासा अभिमान वाटला. इतक्या सविस्तरपणें आपल्या आवडीच्या विषयावर ते आजच प्रथम इतक्या तन्मयतेनें बोलले होते. बोलतांना त्यांच्या मनःचक्षूसमोर त्यांच्या खोलींत टांगलेल्या प्रतिमांचे मुखवटे तरळत होते.

आपल्या मुखातून तेच बोलत आहेत कीं काय असेंही त्यास क्षणभर वाटलें.

— आणि समोरच्या आरशात पाहून पुन्हा एकवार ते आता स्वतः-शींच समाधानपूर्वक हसले.

* * *

घटेच्या ठोक्यासरशीं वर्ग चालू झाले. ज्ञानोपासनेला सुरवात झाली. श्री. देशपाडे टेबलापाशीं बसून काहींतरी लिहीत होते. विद्यार्थ्यांनीं वर्षाच्या भिन्न भिन्न ऋतूतून कसल्या प्रकारचा आहार घ्यावा याविषयीं एका अमेरिकन मासिकाच्या आधारे टिपणें काढण्यात ते गर्क होते. समोरच्या घड्याळाची कट कट चालूच होती. एक दोन गाधीलमाशा खिडकीच्या तावदानावर बसून मधून मधून आत बाहेर करीत होत्या दूरवर आकाशात एक दोन कापसाच्या ढिगासारखे दिसणारे ढग वर मान काढीत होते. पण देशपाडे लिहीत होते 'गाजरें— रोज पावशेर खात जावीं दही—'

रामानें दार उघडताक्षणींच त्याचा टाक थाबला कपाळावर असमाधानाची अस्पष्टशी अशी एक रेषा उमटली. डाव्या हातानें दाढीच्या टोकाला पीळ घालीत ते समोर पाहू लागले

'कुणी एक मनुक्ष आलाया.' रामानें डोक्याच्या पापण्या रुदावून म्हटलें.

'काय काम आहे?' श्री. देशपाडे समोर पडलेल्या मासिकाकडे पहात म्हणाले.

'काय जणु.' हस्तविक्षेपाच्या साह्यानें रामानें उत्तर केलें.

'मग विचार त्याला.' श्री. देशपाडे पुन्हा टाक उचलून म्हणाले. रामा थोड्या वेळानें जाऊन परत आला.

'साळ बघतुया म्हन.' रामानें डोकें खाजवीत म्हटलें.

'शाळा पाह्यची होय! मग ते कोरगुटकर रिकामे असतील त्याना म्हणावें त्याच्याबरोबर जा.' असें म्हणून पुन्हा ते आपल्या आहारशास्त्रात गर्क झाले. ते लिहू लागले 'वाटीभर दही आणि—'

पहिल्या तासाची घटा झाली. टेबलावरील आहारशास्त्रविषयक वाङ्मय त्यानीं बाजूस सारलें. त्याना सातवीचा तास होता. कवितेचें पुस्तक आणि तदगभूत साहित्य गोळा करून ते वर्गाकडे जावयास निघाले. सातवीचा वर्ग दुसऱ्या मजल्यावर अगदीं टोकाला होता आणि वर्गावर जाताना मुलाच्या

वाचनालयावरून जावें लागत होतें. कित्येकदा त्याच्या मनात आलें होतें कीं चेअरमनला सांगून ही अडचण दूर करून घ्यायची. परंतु पैशाच्या टंचाईमुळें स्वतंत्र जिन्याचा प्रश्न काढणें अशक्यप्राय होऊन बसलें होतें. स्वतः ते या हॉलमधून जाताना शक्य तों पाय न वाजविता जात असत आणि इतराच्याकरता तसें करण्यासाठीं सूचनावजा पाटी लावण्यापलीकडे ते जास्त कांहीं करू शकले नाहींत ज्ञानमंदिर नेहमीं शान्त असावें याबद्दल त्याचा फार कटाक्ष असे.

नेहमींप्रमाणें ते पुढच्या चवड्यावर इकडून तिकडे जाण्याच्या गडबडींत होते. मागाहून कोणींतरी हाक मारल्याच्या त्याना भास झाला. आवाजाच्या दिशेकडे त्यानीं वळून पाहिलें—

कोरगुटकर मास्तर आणि त्याच्या डाव्या हाताला एक गलिच्छ मनुष्य! त्याची बोट बोट वाढलेली दाढी, घाम उतरून उतरून तेलकट बनलेली ती भुरक्या रंगाची टोपी, छातीवर फाटलेला सदरा आणि पैशाला तीनवालीं बटणें, अंगात कोट नाहीं, फाटलेलें मळकें धोतर गाठींनीं सांधलेलें, पायात कांहीं नाहीं, चर्या भकास, हातावरच्या आणि पायावरच्या शिरा ताठ— असलें हें ध्यान पाहताक्षणींच शिसारी येऊन त्यानीं चटकन मान फिरविली. परंतु त्या गृहस्थानें त्याना गाठलेंच.

'मला थोडें आपल्याशीं बोलायचें आहे ' तो गृहस्थ मोठ्या काकुळतीस येऊन म्हणाला.

'मला आत्ता वेळ नाहीं. तासाला गेलें पाहिजे. अन् कोरगुटकर, तुम्ही वर्गावर जा.' असें म्हणून श्री. देशपांडे घाईघाईनें वर्गाकडे निघून गेले. आपल्या या तुटकपणामुळें त्या गृहस्थाच्या चर्येवर काय परिणाम झाला असेल हें पाहण्याचें त्यांच्या नुसतें मनात सुद्धा आलें नाहीं. थोडक्याच वेळात शिकविण्याच्या नादात हा प्रकार ते विसरूनही गेले.

आज ते सर वॉल्टर स्कॉटची मातृभूमीची प्रख्यात कविता शिकवीत होते. प्रत्येकानें आपल्या जन्मभूमीवर आईप्रमाणें प्रेम केलें पाहिजे हें तत्त्व ते विद्यार्थ्यांच्या मनावर ठसवून देत होते. विद्यार्थिवर्ग नित्याप्रमाणें स्तब्धपणें ऐकून घेत होता. देशपांड्याची वाणी जसजशी रंगू लागली तसतशी विद्यार्थ्यांची चुळबूळ सुरू झाली. हा अनपेक्षित प्रकार ध्यानात येताक्षणींच

ते जरा चमकले. एक दोन वेळा पुन्हा हाच प्रकार घडून आल्यावर त्यांनीं पुस्तक मिटलें आणि वर्गाला अशान्ततेचें कारण विचारलें. कारण साधेंच होतें. मागच्या बांकावर दोन खमग विद्यार्थी एका धिप्पाड विद्यार्थ्याआड दडून शान्तपणें निद्राधीन झाले होते, त्यामुळें हा अभावित विनोद निर्माण झाला होता.

श्री. देशपांडे अतिशय गंभीर मुद्रा करून वर्गाकडे पाहू लागले जागृतावस्था प्राप्त करून देण्यात आलेल्या महात्म्यासकट सारेजण भकास चेहेरा करून उपदेशामृत श्रवण करू लागले श्री. देशपांडे म्हणत होते—

'ही मोहनिद्रा विनाशकारणी आहे जो थाबला तो संपला. किंबहुना जो झोपला तो मेला असेंही म्हणता येईल. विद्यार्थ्यांचें विहितकर्म ज्ञान संपादन करणें त्याच्यात कसूर करणारा मुलगा आत्मवचना करीत असतो. ...' इ०. तासाची घटा झाली श्री देशपांडे वर्गाबाहेर पडले.

'माझे आई ! कृपा करा आणि झोपायच्या भानगडींत पुन्हा पडू नका. अहो, आमचा का जीव काढता ?' इत्यादि चुकारतट्टूंना उद्देशून केलेलीं इतर विद्यार्थ्यांचीं बोलणीं त्याच्या कानावरही गेलीं नाहींत.

श्री. देशपांडे आपल्या खोलींत शिरताक्षणींच त्याना आश्चर्याचा धक्का बसला. ज्या गृहस्थाला टाळून ते मघाशीं वर्गावर सटकले होते तोच गृहस्थ एका खुर्चीवर गुडघ्यात मान घालून बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. ते आत येताच तो गृहस्थ वर पाहू लागला आश्चर्याची गोष्ट ही कीं त्याचे डोळे पाण्यानें भरलेले दिसले.

'मला क्षमा करा. मी आपला फार वेळ घेऊ इच्छीत नाहीं. माझ्याशीं थोडा वेळ बोलाल का ?' तो आपले डोळे सदऱ्याच्या बाहीनें कोरडे करीत म्हणाला.

श्री. देशपाड्यानीं हातातील पुस्तकें टेबलावर ठेवलीं. अंगावरचा खरजेचा फोड बेतानेंच फोडावा लागतो. त्या गृहस्थानें निर्लज्जपणें पुढें वाकून बोलण्यास सुरवात केली.

'आपल्याला कल्पनाही नसेल परंतु मी आपल्या अनेक चाहत्यांपैकीं एकजण आहें. आपण आज या शाळेंत सुमारें वीस वर्षे अखंडपणें ज्ञानसेवा चालवलेली मी डोळ्यानीं पहात आहें. आपल्या कर्तबगारीवर माझा

पूर्ण भरवसा आहे. पुण्यामुंबईकडे चांगल्या शिक्षकाची वाण पडत नाहीं-परंतु खानदेशांत ती उणीव अत्यंत तीव्रतेनें असते. याचा अर्थ असा नाहीं कीं खानदेश लायक माणसें निर्माण करूच शकत नाहीं. असा आरोप करणें धाडसाचें होईल. पण एवढें मात्र खरें कीं मनुष्य जरा नावारूपाला आला कीं त्याचे डोळे पुण्याकडे किंवा मुंबईकडे वळतात. परंतु तुम्ही मात्र खानदेशांत नावारूपाला येऊन तेथेंच आपल्या कर्तव्याची मेढ रोवलीत. आणि म्हणून मला आपणाविषयीं फार आदर वाटतो.' बोलता बोलता तो थोडा वेळ थांबला.

'हें पहा— मला एरवीं स्तुति कितीही आवडत असली तरी ही वेळ ती ऐकून घेण्याची खास नाहीं. तुम्ही माझ्या घरीं येऊन भेटा आणि मग आपण सावकाश बोलू' देशपांड्याच्या मनांत उडवाउडवीचे विचार चालले होते हें स्पष्ट होतें.

'ही स्तुति नाहीं— हें सत्यकथन आहे. आणि मी आज उत्तर हिंदुस्थानांत जायला निघणार असल्यामुळें निवान्तपणें बोलायला मला वेळ नाहीं याबद्दल फार फार वाईट वाटतें. मला एवढेंच सांगायचें आहे कीं माझी थोडीशी हकिकत आपण ऐकून घ्याल तर फार बरें होईल' तो गृहस्थ परवानगी तोंडानें मागत होता खरा पण तिची जरूर भासत असल्याचें त्याच्या चर्चेवरून मुळींच दिसून येत नव्हतें

'ऐकायलाच पाहिजे का?' श्री. देशपांडे अत्यंत नाखुशीनें म्हणाले.

'होय! मी एक पदवीधर बेकार आहें. दचकूं नका. मी मदत मागत नाहीं. बी. ए. झाल्यावर मीं नोकरीकरतां जेवढे प्रयत्न करतां येतील तेवढे केले. प्रत्येक ठिकाणच्या हपिसाचे उंबरठे झिजवले. हंगामी काम मिळालें. पुन्हा बेकार झालों. अधिकाऱ्याच्या शिव्या आणि लाथा खाऊन निगरगट्ट बनलों. आतां नशीब काढण्याकरतां म्हणून कलकत्त्याला जात आहें. तुमच्या म्हणण्याप्रमाणें पाहिलें तर मीं खूप विद्या संपादन केली आहे. पण माझें ज्ञान जगाला नको आहे. माझा शेक्सपीयर, मिल्टन इत्यादि कवींशीं दांडगा परिचय आहे. मी जॉमेट्री फार छान समजावून देईन— पण त्याचा मला व्यवहारांत कांहीं उपयोग नाहीं. मला वाटतें मुलांची जर कोणी खरी वंचना करीत असेल तर शिक्षणखातेंच होय.'

'तुमचाच काय तो शिक्षणखात्यावरचा अभिप्राय मिळायचा राहिलेला होता.' श्री. देशपांडे कडवट मुद्रा करून म्हणाले.

'मी अधिकारी वाणीनें बोलत नाहीं हें जाणून आहें. परंतु परिस्थितीनें पिचलेल्या हृदयाचे हे अनुभवजन्य बोल मी नाइलाजानें बोलत आहें. आम्हा तरुणाना शाळेचें पुस्तकी शिक्षण पुढें व्यवहारात काडीच्याही इतकें उपयोगीं पडत नाहीं आयुष्याचा अफाट सागर तरून जायला तुम्ही आमच्या हातात भोपळा देत आहात. भोपळ्याच्या साहाय्यानें नदींत डुबता येईल पण आम्हाला सागरात उतरावें लागतें. तुम्ही जाणूनबुजून ही वचना करीत आहात असें मी म्हणत नाहीं परतु न कळत झालेला गुन्हा सुद्धा काहीं कमी भयकर ठरत नाहीं परवा मीं सहज ऐकलें कीं मुलाच्याकडून जास्त व्यापक आणि सखोल ज्ञानोपासना व्हावी एवढ्याकरता तुम्हीं शाळेचा वेळ वाढविला आहे आणि मुलाच्या सुट्टयाही कमी करणार आहात. माझी आपल्याला विनति आहे कीं कृपा करून सुट्टयाना हात लावू नका.' तो गृहस्थ म्हणाला.

'जगातल्या शाळाना कुलपें ठोकायला सुद्धा तुम्ही मागें पुढें पहाणार नाहीं.' श्री. देशपांडे म्हणाले.

'अगदीं मी तेंच म्हणणार होतों. पण एका बेकार तरुणाच्या हातून विनति आणि अर्ज यापलीकडे काय होणार आहे ! वाटल्यास मला वेडा म्हणा पण खरोखरीच जगातल्या यच्चयावत् शाळा जर पाच वर्षे बद ठेवण्यात आल्या तर आपल्याला कळून येईल कीं जगाचें काहींही नुकसान होणार नाहीं. उलट पाच वर्षांच्या बागडण्यानें मुलें तेवढींच जरा जास्त कणखर आणि सतेज बनतील—परिस्थितीशीं टकरा खेळायला जास्त लायक बनतील.'

'पुडाचे आखाडे जगभर आगी लावीत हिंडतील.' श्री. देशपांडे दाढीशीं खेळत म्हणाले.

'खोटी गोष्ट. आजच्या घटकेला भेकड विद्वानापेक्षा अशिक्षित मर्द शतपटीनें पुरवला असेंच म्हणावें लागेल. हें पहा— विद्यासपादनाबरोबर जगावें कसें हेंही आम्हांला का शिकवीत नाहीं ? आम्हाला थोडेंसें धागडधिंगा घालायला का शिकवीत नाहीं ?'

‘त्याला गुरूची जरूरी आहे असें मला नाहीं वाटत.’ देशपांडे समोरच्या घड्याळाकडे पहात म्हणाले.

‘असें आपण म्हणू नका आम्ही इतके भितरे बनलेले आहोंत कीं ठायीं ठायीं आम्हाला दुसऱ्याची भीति वाटत असते. प्रत्येक उडी मारताना कुणी पहात नाहीं ना अशी शंका मनात येते आणि त्यामुळें आमची उडी चांगली पडत नाहीं. या दटावणीच्या धाकाला आम्ही इतके बुजलेले आहोंत कीं शुद्धलेखनाच्या वेळीं अगदीं साधा शब्द लिहिताना सुद्धा पेन्सिलीचा तांबडा डोळा आम्हाला घामाघूम करून सोडतो केवळ पुस्तकी ज्ञानानें आमच्यातली साहसप्रियता पार जळून खाक झाली आहे जातों मी आता अधिकउण्याचा राग मानू नका— आणि माझें भाषण फारसें मनावर घेऊ नका असें सांगणार होतों पण तुमचें लक्ष माझ्या बोलण्याकडे नसून समोरच्या घड्याळाकडे आहे हें पाहून तसें सांगण्याची जरूरी दिसत नाहीं असें वाटतें ’ आपला फाटका सदरा शक्य तोंवर सावरीत तो जाण्याकरता उठला.

‘माझें नाव सुद्धा विचारण्याची आपल्याला जरूरी दिसत नाहीं !’ किंचित् आशायुक्त चेहरा करून तो दरवाज्यापाशीं थबकला.

‘सांगाल तर अनुगृहीत होईन आपला ’ श्री देशपांडे खिडकींतून दूरवर पहात म्हणाले.

‘समजलों मी. मघाशीं मी त्या वाचनालयात उभा होतों तेथें एक मोठा फलक लावला आहे. मॅट्रिकच्या परीक्षेंत पहिल्या दहा नंबरात येणाऱ्या विद्यार्थिश्रेष्ठाचीं नावें त्यावर लावलीं जातात–’ तो मध्येंच थांबला.

‘त्यांतले एक आपण आहात !’ श्री. देशपांडे तुच्छतेच्या सुरांत हसून म्हणा`.

‘होय !’ तो खालच्या मानेनें म्हणाला.

‘काय ?’ श्री. देशपांडे आता मात्र जवळ जवळ ओरडूनच म्हणाले.

‘दहा वर्षांपूर्वी जें शेवटचें नाव त्या फलकावर लागलें त्याच नावाचा हा दुर्दैवी धनी मी तुमच्यापुढें उभा आहें.’

‘काय तू भागवत ! मॅट्रिकमध्यें पहिला आलेला !’ आश्चर्यातिशयानें देशपांडे ओरडले.

'एकुणांत पहिला. जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलर. विश्वविद्यालयाच्या पहिल्या पाहिरीवर अभिमानानें उभा असलेला पण जगाच्या निष्ठुर व्यवहारात पायदळीं तुडवला गेलेला तोच मी आपला भागवत सर, तुम्ही मला ओळखू शकला नाहींत. मी दहा वर्षे मुंबईलाच होतों. तीन दिवस झाले, परत आलों. शाळेंत येणार नव्हतों पण म्हटलें अपेशी झालेलें तोंड आईला दाखवायला लाज कसली ! आणि बाकीची कर्मकटकट कशाला ऐकवू तुम्हाला !'

सारी जमीन, खोली, खोलीबाहेरचें सजीव व निर्जीव जग आपल्या भोंवतीं गरगर फिरत असल्याचा श्री. देशपाडे याना भास झाला. काय आपण ऐकलें ! खरेंच शाळेचा आणि जीवनाचा मुळींच संबंध नाहीं ? आत्मवंचना ! त्यानीं वर मान करून पाहिलें. भागवत केव्हाच निघून गेला होता.

घाईघाईनें ते बाहेर आले रामा गडी भर दुपारीं दोन वाजता रात्रीच्या दोहोंचें सुख उभ्या उभ्या उपभोगीत असलेला त्याच्या दृष्टीस पडला.

ऐकलेल्या प्रकारामुळें त्याचें डोकें सुन्न झालें होतें.

असिस्टट हेडमास्तर थोडया वेळानें मुख्याध्यापक देशपाडे याच्या खोलींत शिरले तेव्हा त्याना देवळात देव नसल्याचें पाहून केवढा धक्का बसला ! संबंध वीस वर्षांत देशपाडे करारी योद्धयाच्या अचलतेनें जागा धरून बसलेले दृष्टीस पडत आणि आज—

टेबलावरची चिठ्ठी वाचतांच जगावर विश्वास ठेवणें किती गाढवपणाचें असतें असाच काहींसा विचार त्याच्या मनात घोळत असावा !

'माझें डोकें दुखत आहे– कदाचित् दोन दिवस येणार नाहीं. चिटणीसाना कळवावें. —देशपाडे.'

असिस्टंट हेडमास्तरानीं मटकन् हेडमास्तराच्याच खुर्चीवर बैठक मारली.

———

# जमीन आणि अस्मान-

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

स्वर्ग म्हणजे तरी काय ? आळशीपणाचें प्रदर्शन तो स्वर्ग पहा. मोडकें टेबल, महायुद्धापूर्वीच्या दोन चार खुर्च्या एका कोनाड्यात वर्तमानपत्राच्या विस्कळित संसारात चार दोन नवीन मासिकाची चढाई त्यावर चार दोन सुपारीच्या खांडे, जुनाट पेशवाई थाटाचा अडकित्ता आणि शेजारींच अड-कित्त्याच्या मदतीला म्हणूनच कीं काय, एक दगडाचा काळा गोटा दुसरा कोनाडा वहाणा वगैरे स्वमुलखी पादत्राणाच्या सोबतीला म्हणून परमुलखी बूट वगैरे पादत्राणें मौज ही कीं केसाचा ब्रश बुटावर आणि बुटाचा ब्रश टेबलावर तिसरा कोनाडा नुकताच आ पसरून बसला आहे खुर्च्या पुष्कळ आहेत पण खुर्च्याचा उपयोग मात्र कॅलेंडरें आणि तसबिरींकडे. शेजारींच एका बाजूस एक कपड्याचें कपाट— निदान कपडे आत ठेवण्या-करता म्हणून केलेलें पण कपडे मात्र कपाटाच्या बाहेरच्या बाजूस लोंब-कळत आहेत बहुतेक सर्व कपडे नेहमींच्या वापरण्यातलेच आहेत.

टेबलावर शक्य तितकी अव्यवस्था. धोब्याच्या कपड्यांची यादी, डेरीचें दुधाचें बिल, एक आरसा, त्यावर कगवा, वगैरे. घरातल्या सर्व गाद्या ठेवण्याकरता एका कोपऱ्यात व्यवस्था केलेली आहे. वर जरी मोठें कापड टाकलेलें आहे तरी पण मेणकापड गाद्या दिसू नयेत म्हणून टाकलें आहे कीं दुसरीकडे टाकण्याऐवजीं सहजच गाद्यांवर फेकून दिलें आहे हें समजणें कठीण. भिंतीवर टांगलेलें एक घड्याळ— अर्थात् बंद पडलेलें.

कालाचे नियम झुगारणाऱ्या या स्वर्गांत एक तरुण बसला आहे म्हणण्यापेक्षा कांहीं तरी खटपटींत गुतला आहे म्हणणें जास्त सत्याला धरून होईल. तो पहा एका बाजाच्या पेटीशीं कांहीं तरी ठोकाठोकी करीत बसला

आहे. सूर वगैरे मोडलेला नीट करीत असेल बहुशः. वय, शिक्षण— कळेलच आता सगळें ]

मनोहर— (सूर मोठ्यानें वाजवीत) आ ऽ ऽ ऽ (खाकरून) आ ऽ ऽ ऽ (पुन्हा सूर बिघडतो पुन्हा ठोक ठोक आवाज.)

(पद— राग विशिष्ट असा कोणताच नाहीं. ताल— जरूर नाहीं. आधुनिक तरुणाचें गाणें तें. राग कसला व लोभ कसला ? घटकाभर करमणूक तेथें ताल तरी कशाला ?)

मनोहर— (पेटी थांबवून) छेः ! जुळतच नाहीं. का बरें जुळत नाहीं ? हं. या खोलीचाच गुण असला पाहिजे. नाहीं तर मनोहरचें गाणें ऐकायला माणसेंच काय पण जनावरेंसुद्धा धावून यायचीं. (बोलाफुलाला गाठ ! घरातली मनी मॅव म्हणजे 'आत येऊं का महाराज' असें म्हणत उंबऱ्यावर उभी राहून पहाते.) कोण ? मनीबाई का ? या बाईसाहेब. तुमच्याच आगमनाची वाट पहात होतों या. खुर्ची देऊं का बसायला ? (त्रासून हातातलें पुस्तक मनीला नजर करीत) चल. चालती हो इथून. (मनी 'आश्चर्य आहे बाई !' म्हणून म्हणत पुस्तकात काय आहे तें पहात उभी रहाते ) काय माजरू तरी आहे हो ! अशी एक लगवावीशी वाटते कीं नाहीं ! पण जाऊं दे. हं. हा 'सा' सापडला. (पेटी सुरू होते मनी गाण्याला कंटाळून— सहनशीलतेला तरी मर्यादा आहेच कीं नाहीं !— बाहेर निघून जाते. मनोहरचें गाणें चालूच असतें. इतक्यात एक सूर बिघडतो. पेटी थांबते.) तें काहीं नाहीं. गय करावी तर असा वनवास सोसावा लागतो. दादाना दुखवूं नये म्हणून पहावें तों वहिनी अशा टाळूवरून हात फिरवतात. म्हणे 'मनोहर, तिलाही मधून मधून देत जा पेटी.' घ्यायची होती दुसरी पेटी. लोकाना का त्रास ? आणि ही मोठी वाजविणारीण पडली कीं नाहीं ! हाताचीं बोटें फिरवते का पायाचीं बोटें फिरवते हरि जाणे. नाजुक काम करणें, साजुक भाषण बोलणें या कला अवगत व्हायला तपश्चर्या करावी लागते. पेटीवरून बोटें फिरवता आलीं म्हणजे पेटी वाजविता येते म्हणणें जरा— (पेटीशीं धडपड करण्यात काहीं अर्थ नाहीं असें पाहून पेटी बाजूस सारतो आणि वडा नाहीं तर निदान राहिलेल्या तेलात वांगें तरी तळून कांढावें म्हणून दरवाजाकडे पहातो.) वहिनी ! (पहिल्या

हाकेला ओ मिळाल्यावर मग हो काय पाहिजे !) वहिनीऽ ! वहिनीऽऽ. (शेवटच्या वहिनीऽऽ यातील नीऽऽऽ या सुरात सूर मिळणारी 'भावोजीऽऽऽ' अशी आरोळी आतून ऐकू येते. नतर 'आलें हो' म्हणून आगमनाची ग्वाही येते, आणि नतर पुन्हा एकदा 'आलेंऽ आलें' या लाडिक शब्दाच्या नतर इतका वेळ 'आलें– येतें' वगैरे हवाल्यावर हवाले देणारी व्यक्ति– मनोहरच्या ज्येष्ठ बधूची पत्नी– हातात लोण्यानें भरलेली रवी, टेनिसच्या रॅकेटप्रमाणें फिरवीत पुढें येते. सौदर्य हाच हिचा दागिना. मधुर वाणी, प्रेमळ स्वभाव, थट्टेखोरपणा पाचवीला पुजलेला अशा या स्त्रीस पहाताच मनोहरच्या भावाचें थोडेफार कौतुकच करावेंसें वाटतें. रत्नें जगात पुष्कळच आहेत पण पारखीच दुर्भिळ असतो. ते पहा तिचे डोळे– सुदर नाक– सुदर. हनुवटी– सुदर. सुदर, सुदर, सुदर )

वहिनी— बोला महाराज, काय आज्ञा आहे ?

मनोहर— (हसू आवरीत) अग पण वहिनी, टेनिस का खेळायला निघाली आहेस ?

वहिनी— (गभीरपणाचा आव) हेंच विचारण्याकरिता का इतका वेळ घसा कोरडा केलात ? मला बोलावण्यापेक्षा आपणच तिकडे आला असतात तर ! मला वाटतें, पाय काहीं फारसे झिजले नसते.

मनोहर— (पेटीकडे पाहून) वहिनी, तुला बोलवण्याचें कारण ही पेटी.

वहिनी— (पूर्वींच्याच सुरात) अस्सें !

मनोहर— (चिडून) पुन्हा तुझें अस्सें आलेंच ! शभरदा बजावून सागितलें तरी तुझी खोड काहीं जात नाहीं.

वहिनी— (रवीकडे पहात) जित्याची खोड मेल्याविना कशी जाईल ?

मनोहर— (एकदम) तू पेटीला का हात लावलास ?

वहिनी— (शान्तपणें) मीं नाहीं लावला.

मनोहर— वर हें का आणखी ? वहिनी, तुझ्या पाया पडतों पाहिजे तर, पण कृपा करून ह्या पेटीच्या वाटेस जात जाऊ नकोस. आईबापानीं थोडें फार शिकवून ठेवलें आहे, म्हणजे लाडावून ठेवलें आहे, त्या जोरावर मराठी पुस्तक काहीं माझें टिकू देत नाहींस. माझा कगवा तुला लागतो, माझी तेलाची बाटली आपलीच समजून सढळ हातानें उपयोगास आणतेस,

माझी कोणती कोणती म्हणून वस्तु तू जाग्यावर ठेवली आहेस.

वहिनी— (विनोदानें) अजून तुमचे बूट जाग्यावर आहेत, तुमचे कोट तुम्हीच घालता, हीं कॅलेंडरें काहीं अजून बंबात नेऊन घातलीं नाहींत–

मनोहर— (हात जोडून) भगवती, उपकार आहेत तुझे आमच्यावरती झालें!

वहिनी— (हात जोडून) भगवन्, अनुगृह्णास्मि!

(दोघेंही मोठ्यानें हसतात. बायकांना शिक्षण दिल्याचा हा परिणाम! शिकलेली बाई एक शब्द काहीं खालीं पडू देत नाहीं.)

मनोहर— (पुन्हा पेटीकडे पाहून) वहिनी, खरोखरीच सांगतों—

वहिनी— पण मीं पेटीला हात लावला नाहीं.

मनोहर— खरें बोललीस तर अगदीं जिव्हा झडेल नाहीं! अगदीं पाप लागेल!

वहिनी— (सावकाश) पण मीं पेटीला हात लावला नाहीं ऽऽऽ.

मनोहर— मग स्वर्गांतून उतरले होते वाटतें आमचे!

वहिनी— इश्श! काहींतरीच!

मनोहर— मग आता दुसरा कोणता मार्ग उरला आहे? तू हात लावला नाहींस, मी नाहीं. मग कोण? दादा आणि पेटी यांचें जन्माचें वाकडें आहे. तेव्हा तेंही शक्य नाहीं. मग कोण?

वहिनी— मी सांगू? (काय माना वेळते आहे पहा)

मनोहर— (सांग म्हणून तिच्याकडे पहातो.)

वहिनी— सांगू? अगदीं खरेंच? अगदीं–अगदीं–अगदीं खरेंच सांगू?

मनोहर— (तिरसटपणें) सांग कीं आता मातोश्री एकदम.

वहिनी— (तत्त्वज्ञान शिकवणाऱ्या प्रोफेसराच्या अवसानात) भावोजी, आयुष्य इतकें काहीं विचित्र गोष्टींनीं भरलेलें आहे कीं प्रसंगीं मी मी म्हणणारे ज्ञातेसुद्धा आश्चर्यातिशयानें दिङ्मूढ होऊन जातात–

मनोहर— (वैतागून) तू मूढ आहेस झालें.

वहिनी— थांबा. असें मध्येंच बोलू नये लहान मुलांनीं. तर!– मी कुठपर्यंत आलें होतें बरें? (आठवून) हं. तर असें आयुष्य आहे. मानवजातीची विचारशक्ति कितीही लांब पल्ल्याची असली तरी पण तो पल्ला–

म्हणजे– म्हणजे– (आबाड्याला गोंजारून त्या 'पल्ल्या'विषयीं माहिती मिळविण्याचा पुष्कळच प्रयत्न करते. पण आबाडा म्हणजे काहीं मेंदू नव्हे! नाहीं तर मोठ्या आबाड्याच्या सगळयाच बाया पुरुषाना सहज मार्गे टाकून गेल्या असत्या.) तरी पण तो पल्ला– प– प– (मोठ्यानें हसते)

मनोहर— (एकदम गभीर) वहिनी, हसण्यासारखें काय झालें आहे ह्याच्यात? माझी पेटी मोडली आहे, माझा सशय तुझ्यावर आहे, तुला मी विचारतों आहे, तू लेक्चर झोडू लागली आहेस, आणि वर प् प् प् करून फिदी फिदी हसते आहेस. वहिनी–

वहिनी— (सुराला सूर कायम ठेवून) भावोजी! भाऽवोऽऽजीऽऽऽ (हसते)

मनोहर— वहिनी, चालती हो इथून. हो चालती नाहीं तर दादाना हाका मारीन मी.

वहिनी— लहान मुलें असेंच काहीं तरी म्हणतात. (लहान मुलाच्या आवाजात तोंड फुगवून) माझ्या आळींत तर ये– आईलाच सागेन मी! म्हणे मी हाका मारीन. खुशाल जपमाळ घेऊन टाहो पिटा. बाहेर जायचें झालें आहे आत्ताच.

मनोहर— (Oh God! Save me अशा मुद्रेनें) आनद आहे!

वहिनी— भावोजी, तें राहू द्या तुमची पेटी कोणीं मोडली मी सागूं?

मनोहर— काहीं नको. राहिलेली तेवढी मोडून टाक. म्हणजे दूध-दुभत्याचें कपाट तरी एक छानदारसे होईल.

वहिनी— पेटी–

मनोहर— घाल चुलींत.

वहिनी— तुमच्या बायकोनें मोडली अन् मला काय म्हणून बोलता?

मनोहर— माझ्या बायकोनें? (जसे काहीं जर्मन शिपाई आले होते याची पेटी मोडायला.)

वहिनी— (जोरानें) होय. तुमच्या बायकोनें. (डोळे उडवीत आकाशाला उद्देशून) आपल्या कमलाराणी! मनोहरपत साठे याच्या पत्नी-सौ. कमलाबाई साठे!

मनोहर— वहिनी, आकाशाकडे काय पहाते आहेस? शून्यत्वाला उद्देशून

बोलणें म्हणजे अंधारात डोळे फाडण्यासारखेंच असतें वहिनी, ए कुक्कुल्या बाळा, कोण कुणाची बायको ? अन् ती कुणाची पेटी मोडणार ?

वहिनी— आज– आत्ता मित्रासहवर्तमान आपण पहायला जाणार आहांत ना ? तीच कमलाराणी.

मनोहर— वहिनी, उगीच एखाद्याचें नाव घेण्यांत काय हशील आहे ?

वहिनी — (आश्चर्य दाखवून) बाई बाई बाई ! कोण ही आपल्या माणसाची काळजी ! इतक्यातच तरफदारी अ ? तरी बरें, अजून ठरायचें आहे– अक्षदा पडायच्या आहेत.

मनोहर— जसे कांहीं दादा अगदीं साधेभोळेच होते नाहीं ?

(वहिनीचा चेहरा फोटो काढण्यासारखा होतो !)

वहिनी— भावोजी, रागावलात मीं थट्टा केली म्हणून ? पण खरेंच सागतें, कमलला मीं बोलावली होती आपल्या घरीं तिची थोरली बहीण आणि मी मॅट्रिकमध्ये एकाच वर्गांत होतों. तिला कांहीं एक माहिती नाहीं. अन् भावोजी, सहज म्हटलें आपल्या धाकट्या जावेची परीक्षा पहावी म्हणून मीं तिला पेटी वाजवायला लावलें मला काय माहिती ? अन् मी म्हणतें भावोजी, बायकोच्यापुढें पेटीची काय किंमत आहे ?

मनोहर— बरें, जाऊ दे. पेटी उचलून ठेवतेस का ?

वहिनी— (पेटीचा सूर धरून) अत्तरदाणी, गुलाबदाणी– इकडून तिकडून आणा पाणी– पहा पहा ही मच्छरदाणी– आले आले राजाराणी– तोम् तननन, तोम् तननन तोम् !

मनोहर— (हसत, उभा राहून) Once more– वहिनी लाडोर !

(वहिनी टेबलाखालीं पेटी नेऊन ठेवते. मनोहर ईझीचेअरवर पडतो.)

मनोहर— वहिनी !

वहिनी— सरकार !

मनोहर— वहिनी, सुखाची व्याख्या काय ?

वहिनी— व्याख्येचें सुख घ्यायला कांहीं आपण शास्त्रवेत्ते नाहींत.

मनोहर— वहिनी, बायकाची दृष्टि फार कोती असते. वर्तमानकाळात आनंद मानून घेण्याची स्त्रीची प्रवृत्ति जगप्रसिद्ध आहे. मूल मांडीवर घेताना मौज वाटते, पण तोच मुलगा मोठा होऊन कदाचित् दुगाण्या झाडायला

कमी करणार नाहीं हें तिच्या ध्यानींमनींही नसतें.

वहिनी— (लेक्चरला कटाळून) Hear hear! पुरे आता.

(इतक्यांत खालून चार आरोळ्या ऐकू येतात –

१— अहो साठे !

२— साठे आहेत का घरात ?

३— मनोहरपत, अहो मनोहरपत !

४— अहो मनोहरपत साठे.)

मनोहर— वहिनी, हे आले आहेत बघ माझे मित्र ! चहा कर चार कप– पळ.

वहिनी— जास्ती धागडधिंगा घालून घर डोक्यावर घेण्याचा जर कार्यक्रम असेल तर ही रवीच मारीन एकेकाच्या टाळक्यात.

(पुन्हा पूर्ववत् घोषणा)

मनोहर— अरे आहेत रे बुवा ! डाव्या जिन्यानें वर या. वहिनी, मला याना घेऊन जायचें आहे ('पहायला?' म्हणून वहिनीच्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह) हो पहायला ! नको आता अत पाहूस !

( वहिनी तोंडानें 'तोम् तननन' गुणगुणत घरात पळून जाते थोड्या वेळानें जणुं काय आपलेंच कार्य आहे या थाटानें चार कॉलेजातील तरुण आत येतात. मनोहर पुढें होतो.

न. १ उमेदवार— पॅट, बूट, सूट— गावठी सब झूट थाट

न. २ उमेदवार— हातात Ruskin's Stones of Venice, डोळयास हॅरॉल्ड लॉईड चष्मा, सरस्वतीदेवीचा कठमणी. पण व्यवहारीं हुश् हुश् पाणी पाणी !

न. ३ उमेदवार— फरकॅप, मद्रास टसर कोट, पाढऱ्या चपल्या, शुभ्र धोतर– पक्का पुणेरी,– आणि चालता चालता माशी मारी !

न. ४ उमेदवार— अठरा धान्याचें कडबोळें– पत्ता नाहीं कोण आलें गेलें. समतावादी विश्वबधु, Students' Brotherhood चे सभासद. ड्रेस उदारमतानें केलेला– म्हणजे हाताला येईल तें अगावर चढवलेलें.)

मनोहर— अरे ये रे ! असू दे बूट पायातच.

नं. १ — (बुटाचा बद सोडीत) Manners! Manners! Learn

manners ! पेशवाई घालवली ह्या manners नीं.

न. ३— (पक्का पुणेकर) तुझ्या बापानें घालवली पेशवाई ! कुणाला रे थापा मारतोस ? बूट सोडून घरात बसावें हें समजायला काहीं manners शिकाव्या लागत नाहींत म्हणे Learn manners !

न. ४— शान्त हो ! शान्त हो ! ज्याच्या त्याच्या समजुतीप्रमाणें जो तो—

न. २— अर्थात् म्हटलेलेंच आहे कीं मार्ग जरी निरनिराळे असले तरी ध्येय हें एकच आहे

न १— (साहेबी उच्चारात) Right ho !

(फारशी खडाजंगी न उडता सर्व आपआपल्या सोयीप्रमाणें बसतात.)

नं. १— I say Sathe !

न. ३— मी म्हणतो साठे.

(दोघेही जण एकमेकाकडे अहिनकुलाच्या सख्यभावानें पाहतात )

न. १ — साठे, काहींही म्हण– एक कप चहा होऊ द्या बुवा; म्हणजे Energy कशी सळसळायला लागेल

न. ३— आता काहीं तरी नीट बोललास. मघापासून साहेबी ऐट चालवली होतीस.

मनोहर— चहा आता येईल. तोंपर्यंत—

नं. १— (सिगारेटचे पाकीट खिशातून काढीत) साठे, दादा आहेत का रे ?

मनोहर— I say– हें बघ, मेहेरबानगी करून जरा पाकीट खिशांत ठेव पाहू.

न. ३— एक सिगारेट काढ आणि बाकीचें ठेव खिशांत. (सर्वजण हसतात.)

मनोहर— खरोखरच ठेवून दे खिशात. आमच्या घरात माणसें रागावतात.

नं. १ — माणसें ? (डोळे मिचकावून हसतो ) अरे वा रे तुझीं माणसें ! चोरा, माणूस पहाण्याकरता म्हणून तर बोलावलेंस आम्हाला, आणि माणसाचा धाक घालतोस ?

न. ३— शहाणे आहात ! बायको तेवढी माणूस आणि बाकीच्या

व्यक्ति जनावरें का रे ? ठेवून दे खिशात. नाहीं तर ही टप्पल पाहिलीस का ? (हात सावरतो.)

न. २— सुधारलेल्या राष्ट्रात ही अशान्ततावादी मोहीम काय कामाची ? प्रेमानें जनावरेंसुद्धा वळतात. नीट सांगितलेंस तर माणूस का वळणार नाहीं ? जिव्हा कशी पाहिजे ! स्निग्धा— मधुरा— (सर्वजण अहाऽऽऽहा करतात.)

मनोहर— (न. ३ स) गजू, दादा तिथे आपल्याबरोबर येणार आहेत, किंवा कदाचित् आधीं तिथें जातील. लक्षात ठेव, तुझी वक्र बोली जरा बद ठेव. नाहीं तर काहींच्या काहींच बोलशील आणि दुसऱ्यानीं ऐकलें म्हणजे नसती पचाईत

न. ३— मनोहर ! लहानात लहान, थोरात थोर, चोरात चोर, मोरात मोर कसें वागावे हें पुण्याच्या तरुणाला शिकवावें लागत नाहीं. (देश तसा वेश !)

न. १— (हळूच न. २ स) काय बेफाम थापा मारतात हीं पुण्याचीं पोरें !

न. २— (न. १ स) महाजनो येन गतः स पन्था ! फारसें चुकलें नाहीं.

मनोहर— तेव्हां सर्वांना सांगतों कीं आपण मुलीला पहायला जाणार आहोंत— मुलगी आपल्याला पहाणार नाहीं आहे.

न. १—माझ्या वेळेला आपण असें नाहीं करणार बुवा ! मी आपल्या भावी पत्नीला मला पाहून घेण्याची योग्य संधि देणार मी म्हणणार कीं मी हा असा आहें, हा माझा स्वभाव आहे, हा माझा गोल (Goal) असा आहे.

न. ३— ती म्हणेल— तो दरवाजा पाहिलास का कसा आहे तो ?

न. २— चालायचेंच. व्यक्ति तितक्या प्रकृति— पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना.

(आणखीही हें पुराण पुष्कळच लांबलें असतें. पण चहाच्या बशाचा आवाज आतल्या बाजूस होऊं लागल्याबरोबर सर्वत्र शान्तता पसरते. मनोहर 'आलों' म्हणून आत जातो.)

न. ४— (पेटीवर हात ठेवून) तारस्वर म्हणजे काय रे गजू ?

न. ३— चहाच्या तारेंत लावलेला स्वर (सरळ उत्तर आणि पुणेकर ? हुश्श !)

न. २— एकंदर तीन सप्तकें असतात— खर्ज, मद्र आणि तार.

नं. ३— माझे आई, पुरे कर आता तुझें पांडित्य. येत नाहीं काहींसुद्धा पण ऐट पहा. काय चश्मा! अन् हें फत्तराचें पुस्तक कशाला बरोबर?

नं. ४— एखाद्याला असे हिणविणें चांगलें नाहीं गजू!

नं. ३— हे कोण विश्वबंधु? लवकरच वाचा फुटली म्हणायची.

(मनोहर चहाचे कप भरून घेऊन येतो आणि सर्वांना देतो. फक्त नं. १ कपानेंच पितो, बाकीचे सर्व आपल्या सोयीच्या मार्गानें बशींत ओतून पितात)

नं. ३— (चहा पीत–बशी तोंडात धरून) काहीं लोकाना चहा पितांना सुद्धा आपण गोंडस दिसावें अशी मोठी—

नं. ४— आता जरा तू बंद करशील का?

नं. २— असा एक निसर्गाचा कायदा आहे कीं—

मनोहर— गजू, तुला चहा प्यायचा आहे कीं बशी चाटायची आहे?

नं. ३— (बोलण्याकरिता तोंड उघडतो पण काहींच न आठवल्यामुळें चहा संपवण्याच्या स्तुत्य मार्गास लागतो)

(चहा संपतो— सुपारी वगैरे)

नं. १— मनोहर, सगळेंच मुसळ केरात लेका, मुलीला प्रश्न कोण विचारणार? नाहीं तर आमची चारतोंडी ब्रह्मदेवासारखी गत व्हायची.

नं. ३— आपण मनोहरकरता मुलगी पहायला जातों आहोंत— आपल्याकरता नाहीं.

नं. २— तरी पण शिष्टसंमत मार्ग असें सुचवितो कीं भावी नवरदेवाच्या आसमंतात् वावरणाऱ्या त्याच्या समंजस सुहृद्वर्गानेंच प्रश्न विचारावेत.

नं. ३— (डोळे झाकून) समंजस, समंजस.

नं. १— तुम्हीच तेवढे काय ते.

(भांडणाला सुरुवात होण्याच्या पूर्वींच आतून वहिनी बाहेर येते आणि 'भावोजी' म्हणून हलकेच हाक मारून हातातील रवी दिसेल या रीतीनें पुढें करते.)

मनोहर— हो हो! चल ऊठ रे गजू. टांग्यातून कीं पायींच रे बुवा?

नं. १+२+३+४ (एकमुखानें) हा काय प्रश्न? मुलीला पहावयाला नवरदेव निघणार— आणि पायीं?

मनोहर— बरें टांगा. गजू, तुम्ही खालीं व्हा. ए गद्धया, टांगे आण. जा पळ. (न.२ घाईघाईनें विसरलेलें पुस्तक काखोटीस मारून पळतो.) आणि गजू, (थाबून) कांहीं नाहीं. जा तू खालीं.

(न.१+३+४ हसत हसत जातात.)

मनोहर— (आपल्याशींच) अवघड आहे बुवा हें काम. मुलीला पहायला जाणें तितकेंसें सोपें काम नाहीं खास. आणि दादासाहेब शेजारीं. हः ! कोट !

(कोट टोपी चढवून जाऊं लागतो वहिनी बाहेर येते.)

वहिनी— भाऊजी, परत फिरा.

मनोहर— (परतून) काय झालें ?

वहिनी— भाऊजी, जन्माला येऊन आज बावीस वर्षें झालीं असतील, बी. ए पास झालात म्हणून ऐटींत सांगता, एम् ए. ला बसणार आहें म्हणून सव्वा हात जीभ बाहेर काढून सांगता पण नवरीला पहायला जाताना टांगेवाल्यासारखा पोशाक करून जाऊं नये हें साधें तत्त्व कांहीं तुम्हाला समजत नाहीं. मोठे स्वदेशभक्तच पडलात कीं नाहीं ! ती घोंगडीची टोपी बदला. तो कोट— इश्य ! शभर वर्षांत परटाकडे दिलेला आहे कीं नाहीं कुणास ठाऊक !

मनोहर— वहिनी, माझ्याऐवजीं तूच पहायला गेलीस तर ?

वहिनी— परमेश्वराची चूक, त्याला तुम्ही आम्ही काय करणार ? भाऊजी, एखाद्यानें तुम्हाला या ड्रेसांत पाहिलें तर लगेच म्हणतील कीं पहा हो ! एवढी घरात शिकलेली भावजय, बिचाऱ्याची कोण दैना ! हंः ! आईविना पोर.

मनोहर— (त्रासून) तुझें म्हणणें काय आहे तें तरी कळूं दे

वहिनी— (चांगला कोट हुडकीत) ह. हा बरा दिसेल. ही फरकॅप— थांबा. झाडून देतें. (मनोहर मुकाट्यानें एक एक जिन्नस चढवतो ) भाऊजी, वहिनीला इतका तुमच्याकरता त्रास सोसावा लागतो तर कमलची काय स्थिति होईल हो ? बिचारीला हें हवें, तें नको करता करता—

मनोहर— वहिनी, माझी बायको तुझ्यासारखी—

वहिनी— मॅट्रिकला बसली आहे म्हटलें या वर्षी— गमजा नाहीं

चालायच्या.

(खालून 'अहो नवरदेव' म्हणून आरोळी येते.)

मनोहर— आलों रे. वहिनी, चल. टोपी दे. टांगा आला वाटतें.

वहिनी— आता पाहू नवरदेव! (लाबून न्याहाळून पहाते.) जसा कांहीं राणीच्या बागेंतला सिंहच- (म्हणून मोठ्यानें हसते )

मनोहर— फाजील आहेस झालें- (म्हणून जाऊ लागतो.)

वहिनी— भाऊजी-

मनोहर— आता काय?

वहिनी— मुलगी पहायला चाललात- घरात कुणाला नमस्कार चमत्कार वगैरे कांहीं करायला नकोत का? देव राहिला मी म्हणतें- पण निदान वहिनीचा मान तरी?

मनोहर— बरें हा घे- देवा, देवराया- तुला नमस्कार असो. (नमस्कार ठोकतो.)

वहिनी— आणि मला? (हनुवटीवर हात ठेवून उभी रहाते.)

मनोहर— माझ्यापेक्षा एक वर्षानें तू लहानच आहेस. तुला कसला नमस्कार?

वहिनी— वयाचा प्रश्न नाहीं- हा मानाचा प्रश्न आहे.

('अहो टांगा आला! आता बस्स् करा कीं तुमचा नट्टापट्टा-' म्हणून म्हणत गजू वर येतो. वहिनींना पाहून थबकतो.)

गजू— टांगा आला आहे रे.

मनोहर— चल आलोंच. (गजू उभा रहातो वहिनी हसू लागते.)

वहिनी— भाऊजी- (डोळ्यानें नमस्काराची आठवण करून देते.)

मनोहर— पण आतांच पाहिजे का?

('अर्थात्' म्हणून वहिनी सुचवते मनोहर नमस्कार करण्यास पुढें होतो, तोंच- 'चागली बायको मिळवून आणा बर' म्हणून म्हणत वहिनी घरात निघून जाते. मनोहर तसाच ताठ उभा रहातो.)

गजू— मनोहर, हें रे काय प्रकरण?

मनोहर— मानापमान!

गजू— बाकी मनोहर, तुझी वहिनी जरा समजूतदार आहे म्हणून

तुझ्या ह्या गमजा.

मनोहर— आता तूच तेवढी तिची स्तुति गायची ठेवली होतीस.

नं. २— (प्रवेश करून) चला नवरदेव. साडेअक्का घोड्याची गाडी आणली आहे. लग्नाला चला. लग्नाला चला तुम्ही लग्नाला चला.

गजू— दारूबिरू तर नाहीं ना प्यालास ? तुला कोठला विनोद सुचूं लागला !

न. २— (गभीर) बाकी मनोहर, हा थाट पुरुषाना शोभत नाहीं. केयूरा न विभूषयन्ति पुरुष हारा न चद्रोज्ज्वलाः । न स्नान न विलेपन न कुसुम–

गजू— तुला घडवायला कोण परमेश्वर तयार झाला राम जाणे !

न. २— मनुष्यानें कसें–

गजू— फेकून देईन आता तुला खालीं. (वेडावून) मनुष्यानें कसे–

मनोहर— गजू, (मनोहर वगैरे सर्व जातात थोड्या वेळानें दुसऱ्या दरवाजानें वहिनी आणि सुमारें सोळा सतरा वर्षें वयाची तरुणी प्रवेश करतात. ती तरुणी आत येण्यास तयार नसते. 'नको बाई, जातें ! उशीर होईल' ही तिची जपमाळ चालूच असते आणि वहिनी, 'ये ग– ये ग, काहीं नाहीं उशीर होत' म्हणून तिला हातानें ओढीत असते. बराच वेळ 'नको बाई' 'हो बाई' 'नको बाई' 'हो बाई' होऊन शेवटीं वहिनी त्या नको बाईला आत ओढते.)

तरुणी— नको बाई ! उशीर होईल ! मी जातें.

वहिनी— इश्श बाई ! त्यात काय आहे ! बसेनास जरा–

तरुणी— अग पण सरू–

वहिनी— अग पण कमू– (खुर्चीवर बसवते.)

कमल— नको गडे. येईन पुन्हा कधीं तरी. उशीर झाला. आई रागावेल.

वहिनी— मोठी आईच्या धाकांतली कीं नाहीं ! म्हणे 'आई रागावेल !' घटकाभर मैत्रिणीकडे गेलें होतें– जरा बस म्हणून म्हणाली– बसलें–

कमल— अग पण तुला माहिती नाहीं, (घोटाळ्यांत पडते– सांगावें कीं सागूच नये.) तुला माहित नाहीं. माझेंच चुकलें– आज नकोच होतें

यायला. अन् सरू– पण गडे, मी जातेंच. (उठून उभी राहते.)

वहिनी— (खालीं बसवीत) अग चल ! आता पुन्हा उठलीस तर दोरीनें बाधून टाकीन खुर्चीला काय ग ? आज काय तुझे एवढें काम आहे ? परवा आलीस ती एवढया घाईत नव्हतीस– अन् कमू, ओळख-देख ठेवण्याच्या कामात भारीच पटाईत आहेस हो मागल्या वर्षी त्या दिवशीं जी भेटलीस त्यावर–

कमल— (दृष्टि सारखी दरवाजाकडे) ए, पण आता पाहिजे तर रोज भेटत जाईन पण आता जाऊ दे.

वहिनी— रोज भेटणार ? (खोल अर्थ उघड आहे.)

कमल—- (काहींच माहिती नसल्यामुळें) रोज– रोज भेटेन, पण–

वहिनी— अगदीं वचन देतेस ?

कमल— हो. पण जाऊ दे गडे.

वहिनी—- अह ! (नकारार्थी मान हालवते ) का केरवारे करायचे आहेत, का झाडलोट, का दिवाबत्ती, का काय ? घरीं उशीरा गेलीस तर यजमान काहीं दारात उभे राहिलेले नाहींत, कीं– (पुढचें तोंडाने बोलण्यापेक्षा आविर्भावानेंच बोलण्याची स्त्रियाची कला काहीं विलक्षण असते. तुम्ही आम्ही म्हणणार 'कीं हें कीं' काय ?– खरोखरच 'की' म्हणजे तरी काय ! पण पहा कमल कशी लाजून बागड्याशींच खेळू लागली आहे तें )

कमल— (ओशाळून) हा अनुभव बोलतो आहे वाटते ?

वहिनी— (आता हिची पाळी लाजण्याची ) माझें काय आपलें– म्हणतात ना ! कशात काय नी फाटक्यात पाय.

कमल— बरा होईल फाटक्यात पाय ? ताई सागत होती कीं घरात तुझ्यावाचून पान हालत नाहीं तुझा कोणसासा एक दीर आहे ना ! (वहिनी हसते.) तो तर म्हणे एक वेळ आईचें ऐकणार नाहीं पण तुझें ऐकेल.

वहिनी— (हसत) हें तुला ताईनें सागितले ?

कमल— दुसरें कोण ?

वहिनी— (कमलच्या हाताला धरून) बरीच शहाणी आहे कीं तुझी ताई.

कमल— आता का ! बाजू अगावर आली म्हणजे मग हें असें.

(घड्याळाकडे पाहून) हें काय ? सात वाजले आहेत आत्ता !

वहिनी— माझ्या सांगीवाचून एक पान हलत नाहीं तसेंच हें घड्याळ सुद्धां हलत नाहीं.

कमल— अस्सें होय ? अस्सें ? बरीच आहेस कीं ग. ए, पण मी जातें. चार वाजून गेले असतील. अन् चार वाजायच्या आत ये म्हणून आईने सांगितलें आहे मला.

वहिनी— पुन्हा आपलेंच. बस खालीं. मुलाना काय नी मुलींना काय, वेळेंचें महत्त्व इतकें का वाटावें बरे ! (सावकाश एक एक शब्द तराजूत टाकीत) तसेंच काहीं कारण असावें. कारण काय ! ही एक मुलगी इथें आहे. तरुण मुलगी आहे. वय साधारणपणें १७ नाहीं तर १८ असावें. मैत्रिणीला भेटायला येते, आणि आल्यापासून 'जातें जातें'चें पालुपद (एकदम) कमू, तुला पाहायला तर नाहीं ना कुणी येणार ?

(कमल एकदम थक्क होते. हा काय ज्योतिषी बोलतो आहे कीं सर्वज्ञानी परमेश्वर बोलतो आहे काहींच कळत नाहीं. हिला कोणीं सांगितलें ?)

वहिनी— मूक करोति वाचाल पङ्गु लघयते– विसरलेंच बाई पुढें काय तें. पहायला येणाऱ्याला इतकें का भ्यावें लागतें हल्लींच्या मुलींना ! काय ग ए, बोलत का नाहींस ?

(नवी नवरी म्हणजे निव्वळ घुसळखांब. आणि तिला काहीं तरी बोलायला लावण्याची इतर पुरध्रीजनाची कोण हुल्लड !) बोल. ए पोपट, बोल. विठ्ठूमिय्या, बोल. पोपटपची चतुरिके जान पडे पार्वति श्रीभगवान् — हुर्रर्रर्र.

कमल— (गरीब बिचारी पोर– शिकली म्हणून कशी होईल शिरजोर !) काय बोलू ?

वहिनी— लागला पोपट बोलायला. खरेंच कमल, आमच्या भाउजींना पाहिलें आहेस का ग कधीं तरी !

(हा काय नवीन प्रश्न ?)

कमल— छे ! कधींच नाहीं. का !

वहिनी— आपलें उगीच विचारलें. काय कमू, आता घरीं गेल्यावर तुला पहायला येणार आहेत त्यांच्यापुढें कशी ग बसणार ? मी सांगू ?

थाब अं. (खुर्चीवरून खालीं बसते.) पण थाब. तुला दाखवतें सगळा प्रकार.

कमल— ए गडे, मी जातें. (तू पुष्कळ जाशील पोरी, पण तुला जाऊ देतो कोण!)

वहिनी— (आविर्भावासहित) हा नवरा मुलगा पहायला आला ह. (पुरुषी थाटात चालण्याचा कसा तरी प्रयत्न करते) हे तुझे वडील बरें का! (गंभीर मुद्रा करून नवऱ्या मुलीच्या बापाचें अनुकरण करीत) 'या—या, बसा असे—या, या. या हो तुम्हीही या. छेः छेः! खालीं कशाला! असे वर बसा कीं.' ह. हे आले तुझे वडील. आता नवरा मुलगा. (जावई-बोवाच्या सर्वमान्य पद्धतीप्रमाणें नाजूक बसते, साजूक हसते, हलकेच खाकरते—जावईबोवाची ऐट तर खूप आणते.) आता नवरी मुलगी (जाग्या वरून उठून दरवाजाकडे जाते आणि लाजत लाजत खालीं मुगी चिरडेल कीं काय या थाटात येते आणि हळूच तक्क्याकडे पाहून उभी रहाते.) आता नवऱ्या मुलाकडलीं माणसें बरें का. 'मुली, बैस खालीं.' ही मुलगी खालीं बसली. (मुलीप्रमाणें पदर नीट सावरून उकिडवी बसते. मधून मधून मोठ्या धिटाईनें हलकेच तक्क्याकडे पाहिलें न पाहिल्यासारखें करते.)

कमल — (सर्व कांहीं पटतें आहे. पण घरीं आई काय म्हणेल!) ए, आता नको गडे. येईन पुन्हा कधीं तरी.

वहिनी— (मान वाकडी करून) आता कधीं तरी कसें! रोज भेटायचें कबूल केलें आहेस. पण थाब ग, एवढें पुरे होऊ दे अन् मग जा. मी येईन पाहिजे तर तुला पोंचवायला.

कमल— पण आई काय म्हणेल!

वहिनी— तें मग पाहू आपण. ह. ही नवरी मुलगी. (नवऱ्या मुलासारखी बसते.) हें आपलें नवऱ्या मुलाचें चित्र. (किंचित् लोडाला टेकून, डाव्या हातावर गाल ठेवून, आकाशाकडे पहात बसते. उजव्या हातात हातरुमाल म्हणून जवळच पडलेलें पेटी पुसण्याचें फडकें घेते. खिशातून लवंगेचा तुकडा काढण्याकरता हात जवळ नेते, पण बायकांना पोलक्याशिवाय खिसे वापरण्याची सक्त मनाई असल्यामुळें नाइलाज होतो.— मी म्हणतों अन्याय आहे हा!) आता नवऱ्या मुलाकडलीं माणसें ह. (मनोहरचा Scarf उचलून घेते आणि उपरण्यासारखा अंगावर टाकते. माडी वगैरे घालून

बसते आणि शक्य तितक्या घोगऱ्या आवाजात) 'मुली, तुझें नाव काय ?' (पुरुषाना बायकाचा आवाज म्हणजे हातचा मळ वाटतो पण बायकाचा जीव कासावीस होतो.) हें मुलीचें उत्तर अं. (बारीक आवाजात मुलीच्या थाटात) 'कमल.'

कमल— (दरवाजाकडे आशाळभूत नजरेनें पहात) घरीं गेल्यावर चागलेच लाडू मिळतील मला.

वहिनी— म्हणजे ? करून ठेवले आहेत वाटतें इतक्यातच ! (खिडकींतून बाहेर पहाते मनोहर परत येताना दिसतो. इतका वेळ काहीं तरी माकडचेष्टा करून कमलला थाबवल्याचे सार्थक झालें 'आता काय करावें' या विचारात पडतेच ) बरें बाई. जातें म्हणतेस, जा बापडी. हल्लींच्या या निष्ठुर काळात मैत्रिणींना विचारतो कोण ? (कमल एकदम उठून उभी रहाते आणि चालू लागते ) अग पण कुकू तर लावशील कीं नाहीं ! कीं चाललीस तशीच ? (काय त्रास आहे या मुद्रेनें कमल पुन्हा परतते. वहिनी एकवार मोठ्यानें हसून आत जाते )

(मुलगी पहायला म्हणून जावें आणि 'मुलगी मैत्रिणीच्या घरीं गेली, काय करावें ?' या शब्दानीं बोळवण करून घ्यावी, असा प्रसग वैऱ्यावर सुद्धा येऊ नये. आणखी चार मित्र बरोबर. पेक्षा— थोडाबहुत चिडलेला मनोहर येतो.)

मनोहर— (पाठमोऱ्या कमलेस न ओळखून) वहिनी, छान केली आमची. (दचकून) ॲऽऽ (कमल घाबरून वळते. दोघेंही जण एकमेकाकडे पहातात. डोळ्याला डोळा विचारतो, 'कोण तुम्ही ?' डोळ्याला डोळा उत्तर देतो, 'कोण म्हणजे ? तू कोण विचारणार ?' दोघेंहीजण एकमेकाकडे पहातात. आणि दोघेंहीजण दोन्ही दाराकडे पहातात. पण निघून जाण्याचें धैर्य मात्र दोघाच्याहीमध्यें नाहीं दोघानाही न दिसेल अशा बेतानें वहिनी हातात कागद पेन्सील घेऊन वर्तमानपत्राच्या बातमीदाराचें अवसान आणून आत येते )

मनोहर— कोण पाहिजे तुम्हाला ? (बोबडीच वळायची बाकी रहाते.)

कमल— (धिटाईनें— मॅट्रिकमधली मुलगी आहे मी या जोरानें उत्तर देण्याकरता तोंड उघडते. मनातल्या मनातच उत्तर देते पण मनोहरला

किंवा आपल्याला काहींच ऐकूं येत नाहीं! तशीच दरवाजाकडे पाहूं लागते.)

मनोहर— वहिनी घरात असेल. (जसें काहीं वहिनीच लग्न लावणार आहे हिच्याशीं.)

कमल— (काय बोलावें? हे तर सरूचे भाऊजी ) मी–मी–(अड-खळते, घोंटाळते, थाबते.)

मनोहर— (मोठ्यानें) वहिनी, वहिनी ऽऽ हें बघ तुझ्याकडे कोण आलें आहे.

वहिनी— (एकदम पुढें होऊन) कोण आहे? ओ ऽऽ हो. कमल! कमल होय? आणि भाऊजी, इतक्यात ठरवून घेऊनही आलात वाटतें सौभाग्यवतींना? आणि बरोबरीच्या दोस्ताची वाट?

(मनोहर कमल नावावरून चटकन् ओळखतो, पण कमल बिचारी अगदींच गोंधळून जाते, आणि मैत्रिणीच्या ह्या फाजीलपणाच्या भाषणा-वरून सतापून जाते. मैत्रीण झाली म्हणून काय झालें? दुसऱ्याच्या देखत हा काय असला चावटपणा?)

वहिनी— (जरा वेळानें) भाऊजी, मी Times चा Reporter आहें. (पेन्सिल काढून) हो, पण Reporter ह्याचें स्त्रीलिंगी रूप काय? जाऊ दे. त्याच्याशीं आपल्याला तूर्त काहींच कर्तव्य नाहीं ह. मला मुलाखत देता का कमलाबाई? हो, पण तुम्हाला हे कोण हें माहिती आहे का! पेन्सील वगैरे टेबलावर ठेवून My dear कमलाबाई, जे एक वेळ आईचें ऐकणार नाहींत पण माझें ऐकतील ते हे माझे भाऊजी–मनोहरपंत साठे. धंदा– तूर्त तरी भटक्या नवरदेव. आणि भाउजी, ही माझ्या मैत्रिणीची बहीण म्हणजे माझी मैत्रीणच–कमला पुरोहित मला वाटतें भाऊजी, तुम्ही हिलाच पहायला गेला होतां ना आज?

(कमल काय बोलणार? भाऊजी तरी काय बोलणार?) पाहिलीत का मग! पसत आहे का?

मनोहर— वहिनी!

वहिनी— (आवाजात आवाज मिळवून) भाऊजी!

मनोहर— वहिनी, हा काय थट्टेचा नवीन प्रकार!

वहिनी— ह्यात कसली थट्टा! मुलगी पहायची ती तिच्या घरीं पाहिली

काय नी एकदम अचानक जाऊन आपल्याच घरीं पाहिली काय सारखेंच नाहीं का ? उलट मी म्हणतें भाऊजी, तिच्या घरीं पाहिलें म्हणजे जास्त संकोच. बाकी इथें तरी काय कमी तारांबळ उडाली म्हणा ! (हसते.)

कमल— (वहिनीस हळूच) ए, मी जाऊ का आता घरीं ?

वहिनी— (मोठ्यानें) ऐका हो ! म्हणे 'ए, मी घरीं जाऊ का ?' कमू, तुझें काम झालें ना ? मग जरा वेळानें गेलीस तरी चालण्यासारखें नाहीं का ? अन् काकूना मी सांगेनच कीं—

मनोहर— वहिनी, दादा इतक्यातच येणार बरें का ?

वहिनी— (कमलेला उद्देशून) हा धाक बरें का मला दाखविलेला ! भाऊजी, आता आले तरी मीही डरत नाहीं. हो. पण यायच्या आत मला माझें बातमीपत्र तयार केलें पाहिजे. (कागद घेते आणि लिहिते ) नवरदेव म्हणतो, 'तुऽतुऽतु तुम्ही कोण ?' भावी वधू उत्तर करते, 'मी मी मी ' ह. आणखी काय ?

मनोहर—तो कागद आण पाहू इकडे !

(कमल तिच्या हातांतला कागद हिसकावून घेते. वहिनी दोघाकडे पहाते )

वहिनी— अरे तुम्ही दोघेंहीजण माझ्याशीं इतक्यातच धुसफूस करायला लागलात. पण लक्षात ठेवा जाऊबाई, या घरात माझ्या म्हणण्यावाचून एक पानसुद्धा हलत नाहीं भाऊजी, तें धङ्याळ तेवढें मग चालू करा बरें का ! कमल, माझ्या परवानगीवाचून या घरात तुला प्रवेश मिळणार नाहीं समजलीस ? (हुकमी आवाजात) भाऊजी, माझ्या परवानगीवाचून हें पान आपल्या घरात उडून आलें तर माझ्याशीं गांठ आहे

मनोहर— वहिनी, स्त्रीशिक्षणाचें ध्येय हें तुझ्या वर्तनासारखें असेल तर मी स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध आहें असें मला मोठ्या कष्टानें म्हणावें लागत आहे.

वहिनी— (कमलला धरून ओढीत) आणि हें— हें ध्येय ? हें चालेल वाटतें ? मला वाटतें जगाचाच कायदा आहे हा कीं आवडत्या माणसानें तोंडात मारली तरी— छेः ! मारलें कुठलें ?— सहज कुरवाळलें म्हणायचें.

कमल— (हळूच) आता घरीं येतेस का पोहोंचवायला मला ? आईला सगळें सांगितलेंस तरच माझी धडगत आहे.

वहिनी— भाऊजी, रोज भेटायला येण्याचें कबूल करणाऱ्या– नव्हे, वचन देणाऱ्या– माझ्या ह्या मैत्रिणीची मी बोळवण करून येतें ह. हो. पण रोज भेटणार खरें, पण कुणाला ? (थाबून) बरें चल. भाऊजी, आत्तां यायचें झालें तर चहाचें पहाल का तेवढें ?

मनोहर— मी कांहीं दादाची बायको नाहीं चहाचें पहायला.

वहिनी— समजलें, समजलें. समजलें म्हणतें ना ? आणि हें पहा, तुम्हीही पण दमून याल, दोडके भाऊजी बायको पाहून दमून येणार, म्हणून किटलींत चहा ठेवला आहे तेवढा ऊन करून– अ ! ह. (अ ! ह करीत कमलेला ओढीत चालू लागते. मनुष्यस्वभावच काय विलक्षण आहे पहा ! इतका वेळ मैत्रिणीच्या पाठीमागें दडून बोलणारी कमल पहा कशी मागें वळून पहाते आहे ती. हजारों लोकामधून नेमकें आपलें तेवढें माणूस बिनचूक हेरून काढणाऱ्या स्त्रीजातीला नुसतें मागें पहायला जड वाटेल का ? मनोहरही पण सहजच पहातो पुन्हा दृष्टभेट ! कमल लाजून खुदकन हसते आणि तोंडावर पदर ठेवून थोडा वेळ तशीच उभी रहाते. वहिनी कौतुकानें पहात उभी राहते )

वहिनी— (कमलच्या डोळ्यावर हात ठेवून) पैसे पडतात म्हटले पहाण्याला– हजार मोजावे लागतात बरें का ! तोंपर्यंत हा छचोरपणा माझ्या डोळ्यादेखत तरी मी चालू देणार नाहीं. (चल पुढें म्हणून लाजलेल्या कमलेस पुढें ढकलीत निघून जाते )

मनोहर— (कोट वगैरे काढीत) खरेंच, यालाच सुख म्हणतात का ? स्वर्ग ह्याशिवाय दुसरा कोणता बरें असणार ?

वहिनी— (परत येऊन) भाऊजी, तुम्ही मघाशीं सुखाची व्याख्या विचारीत होता ना ? मिळालें का उत्तर ?

मनोहर— अग, पण तू तिला पोहोंचवायला जाणार होतीस ना ?

वहिनी— देवाचें दर्शन झाल्यावर बाहेरच्या बाजूस घटकाभर तरी बसावें असें शास्त्र आहे. आणि शास्त्रवचन मोडण्याचें पातक माझ्यावर येऊ नये म्हणून थोडा वेळ तिला उभी केली आहे. ती पहा, दरवाजावर नखानें रेघोट्या ओढीत हळुच इकडे पहात उभी आहे. मी तुम्हांला विचारायला आलें कीं तिच्या आईला मी काय सांगूं. 'ह' म्हणून सांगूं का 'ऊं हूं'

म्हणून सांगू!

मनोहर— वहिनी, तूच मघाशीं कायसेंसें म्हणत होतीस कीं एक वेळ मी आईचें सुद्धा ऐकणार नाहीं पण तुझें—

वहिनी— भीड भिकेची बहीण नको भाऊजी.

मनोहर— आता जातेस का नाहीं ग? का हाणू हा ब्रश टाळक्यात?

वहिनी— निदान तो बुटाचा तरी नको– तो बुटावर पडला आहे तो चालेल कारण तो कपड्याचा तरी आहे (जाताना) मोठी काळजी लागून राहिली होती बाई! आता काय साहेबाचा थाट– जेवायला चांदीचें ताट– गर्दी झाली दाट– चल चल वहिनी बाजूला हाट (म्हणून सुटलेला आंबाडा सावरीत पळून जाते)

मनोहर— (एकंदर प्रकार डोळ्यापुढें आणण्याचा प्रयत्न करीत खुर्चीवर पडतो.) हें हेंच सुख का? आजपर्यंतचें आयुष्य कसें ब्रें गेलें? सुखात? (विचार करतो.) दु.खात? नाहीं तसें काहींच सांगता येणार नाहीं. दुःखात मात्र खास नाहीं. वहिनीसारखी प्रेमळ भावजय, दादासारखा सरळ भाऊ. छेः! आजपर्यंतचें आयुष्य दु खात खास गेलें नाहीं. पण अलीकडे अलीकडे सुमारें दोन वर्षे जरा थोडेंसे चमत्कारिक वाटत होतें. आपलींच माणसें, प्रेमळ जीव, पण काहीं तरी कमी आहे असें वाटत होतें कमल ती उणीव भरून काढशील का? आजपर्यंत अर्थाअर्थी संबंध नसलेल्या परक्या जीवाला घरात आणायचें, आपण त्याच्यावर माया करायची आणि त्याची आपल्यावर माया लावून घ्यायची. समजा, लागली माया, तेंच तेंच सुख होऊ शकेल का? वहिनींचें आयुष्य सुखाचे आहे का? दादा सरळ मनाचे आहेत, प्रेमळ आहेत वहिनीचें आयुष्य घेतलें तर? लग्नाला पांच वर्षे झालीं असतील तिच्या. छेः! शंकाच नको, त्याचे आयुष्य खात्रीनें सुखाचें आहे– निदान तसें वाटतें. आणि माझें? (खिडकींतून सहजच बाहेर पहातो) अरे, पण हे दादा आलेच कीं. (लहान मुलाच्या आवाजात ओरडून) दादा, खालीं आलोंच. (लगबगीनें धावत जातो).

## प्रवेश दुसरा

स्टेजवर सुमारें दोन मिनिटेंपर्यंत अंधाराशिवाय दुसरें काहींच दिसत नाहीं. सुखाच्या शोधार्थ भटकणारे प्राणी इकडून तिकडे फिरकताना अगदीं

अस्पष्ट दिसत आहेत.

वीस वर्षांचा कालावधि लोटला आहे. सुखाच्या शोधार्थ प्राणिमात्रांची अहोरात्र धडपड चालूच आहे. वीस वर्षांपूर्वी हेंच ते सुख का म्हणून विचारणारा मनोहर आजही वीस वर्षांनतर तोच प्रश्न विचारतो आहे. आकाशात सुख असेल का या कुतूहलानें शेकडों लोक आकाशातून जाऊन आले— विमानाचें साहाय्य फोल ठरलें. सुख आकाशात नाहीं. पृथ्वीच्या पाठीवर कुठें तरी सुख असलेंच पाहिजे सुख हें शोधावें लागतें, आपोआप सापडत नाहीं, या गोडशा कल्पनेनें भारून गेलेले शेकडो लोक पृथ्वीच्या कानाकोंपऱ्यातून वणवण करीत फिरले आणि रिक्तहस्तानें परत आले. पृथ्वीच्या पाठीवर सुख नाहीं. जलसंचयाच्या तळाशीं तर सुख नसेल ना म्हणून लोक समुद्राच्या तळाशीं जाऊन आले पण येताना पाच पचवीस शिंपले मात्र घेऊन आले. कदाचित् ज्ञानापोटीं सौख्य असेल म्हणून विद्यादेवीचे दास ज्ञानाकरता जिवाचें रान करून शिकले पण पांडित्याचा पोकळ अभिमान घेऊन परतले.

दृश्य सृष्टींत सौख्याचा लवलेश सुद्धा नाहीं. शान्तता शान्तता म्हणून डांगोरा पिटणारीं राष्ट्रें एकमेकांवर गुरगुरू लागलीं. त्याचें पर्यवसान मनुष्यहोम. केवढा तरी मोठा तो होम आज ह्याचें सैन्य इतकें मागें हटलें, आज त्याचें सैन्य तितकें मागें गेलें, आज हा मेला, उद्या तो मेला. भडकलेला होम काहीं काळाने शान्त झाला पण सौख्य कुठें आहे ! होमाच्या अंगाऱ्यामध्यें सौख्य बिलकुल सापडेना. सत्तेचें शहाणपण फुकाचें ठरलें.

मनाची शान्ति मिळविण्याकरता गौतम बुद्धानें कोण त्रास सोसला ! मनोहरनेंही पण सौख्याचा शोध लावण्याची पराकाष्ठा केली. पण सौख्य सापडेचना.

काहीं वेळानें थोडेंसें दिसू लागलें. खोलीची रचना तीच कायम आहे. फक्त कपडे वगैरे निराळे आहेत आणि कॅलेंडरें बदललेलीं आहेत. एका बाकावर एक सुमारें अठरा वर्षांचा तरुण आरामशीर लवडला असून काहीं तरी पुस्तक वाचण्यात गढून गेला आहे. ती पहा, कोण घाई पानें चाळण्याची. पुस्तकाच्या मलपृष्ठावर हिरव्या निळ्या अक्षरात 'प्रेमाची जादू' म्हणून छापलेलें आहे. चित्रात एक नवयुवती अर्थवट बाजूस सरकलेल्या

पदारावर हात ठेवून उभी आहे आणि तिचा प्रियकर तिच्या खांद्यावर दोन्ही हात ठेवून आतुर दृष्टीनें तिच्याकडे पहात आहे. फुकटचें चित्र छापायला हो काय जातें ! बहुतकरून ती तरुणी 'हो' म्हणणार, 'माझें तुमच्यावर प्रेम आहे' म्हणून ठासून जाहीर करणार आणि मग तो तरुण प्रेमभरानें तिला 'अहाहा ! प्रियतमे, माझें तुझ्यावर किती प्रेम आहे म्हणून सांगू !' म्हणत तिचें चुंबन घेणार— जशीं कांहीं चुंबनें वाटेवरच पडलीं आहेत. प्रेमही पण प्रेमाच्या जादूंत भरलेलें आहे.

तरी पण तो तरुण मात्र बाह्य जगाला पूर्णपणें विसरलेला दिसतो आहे. 'अजून किती पानें आहेत ?' असें पुटपुटत पुस्तकाचीं पानें पहातो आणि एकवार घरात पाहून पुन्हा 'प्रेमाच्या जादू'शीं समरस होतो.

खुर्चीवर त्याच्यापेक्षा दोन वर्षांनीं लहान असलेला एक तरुण मुलगा पेन्सील तोंडात धरून पुस्तकाकडे पहात कसलासा विचार करतो आहे. पहिल्या तरुणाकडे एकवार पहातो आणि पुन्हा पेन्सील दातांनीं कुरतडूं लागतो.)

पेन्सील कुरतडणारा तरुण मुलगा— नाना ! (नानाच्या गांवींही नसतें.)

पेन्सील कुरतडणारा तरुण मुलगा— (जरा मोठ्यानें) नाना !

(नाना डोळे फाडफाडून कादंबरी वाचतोच आहे. 'प्रेमाच्या जादू'पुढें सब झूट.)

पूर्वोक्त तरुण मुलगा— (स्वतःचें पुस्तक जोरानें मिटून) नाना, काय वाचतो आहेस ? पाहूं ? (वाचतो.) प्रेमाची जादू (जोरानें) कादंबरी वाचतोस काय ? थांब. काकूला जाऊन सांगतों कीं नाना अभ्यास सगळा सोडून देऊन कसलीशी घाणेरडी कादंबरी वाचतो आहे. मघापासून हाका मारतों आहें.

नाना— (आपल्याच नादात मोठ्यानें वाचतो.)

'सुंदरराव एक पाऊल पुढें टाकून, दोन्ही हात छातीवर ठेवून रजनीला म्हणाले, 'रजनी, माझ्या जिवाच्या कलिके, तुझ्या या मौन व्रतामुळें माझ्या हृदयाचे कसे शतशः तुकडे होत आहेत याची तुला कांहीं तरी कल्पना आहे का ? हे सौंदर्यदेवते, मला तुझ्या हृदयात इवलासा कोपरा सुद्धा मिळणार नाहीं का ?' रजनी किंचित् लाडिकपणानें कोपाविर्भावाची छटा

तोंडावर दाखवून म्हणाली, 'चला ! पुष्कळ पुरुष असलाच लघळपणा नेहमीं नेहमीं करतात. खरें प्रेम नसतें आणि काहीं नाहीं. मी तुम्हाला कुठें मनापासून पाहिजे आहे ! हे– हे माझे लाल लाल ओठच– का खरें ना ?' (आणखीही नानानें पुष्कळच वाचलें असतें. पण तो दुसरा मुलगा आडवा येतो. त्याच्याकडे पाहून) काय रे उगीच त्रास देतो आहेस बापू ! अभ्यास नाहीं वाटतें तुला ?

बापू— मला एक शंका आली म्हणून तुला विचारतों आहें, तर तूं आपला गोष्टच वाचत बसला आहेस.

नाना— शंका आली ? आली तर मास्तरना विचार तुझ्या. भारीच शंकेखोर आहेस तू. (इतकें म्हणून बापूची शंका फिटली अशाच विचारानें सुंदरराव पुढें काय करणार तें काहींशा उत्सुकतेनें पाहू लागतो.)

बापू— नाना, तू गोष्ट जरा बाजूला ठेव, नाहीं तर मी काकूला सांगेन.

नाना— तोंड फोडून मोकळें करीन काकूला सांगितलेंस तर. (बापू रागावून घरात जाऊ लागतो त्यास अडवून) अरेच्या ! पण एवढें काय रागावायला झालें ? माझें ऐक. तू ही कादंबरी वाचली नाहींस म्हणून तुला त्यांतली गंमत समजत नाहीं. (त्याला माहिती पुरवीत) कुणीं लिहिलें आहे पुस्तक माहिती आहे ? आमच्याच वर्गांत F Y मध्यें एक गोरेलीशी मुलगी आहे तिनें लिहिलें आहे. माहिती आहे ? (अमेरिका खंड शोधल्यानें होणारा आनंद या शोधापुढें काहींच नाहीं.) मुलगी म्हणशील तर मुलगी आहे. अन् परवा ती माझ्याशीं बोलली. (यंव रे पठ्ठे !) मी सायकल ठेवायला गेलों अन् तिच्या वहींतलें एक पान उडून माझ्याकडे आलें. मीं तें पान उचललें अन् तिच्या हातात दिलें. (छाती फुगवून) अन् मग ती हसली, अन् Thank you म्हणाली. नाहीं तर तुमची ती भिकारडी शाळा ! एक पोरगी असेल तर शपथ.

बापू— आमच्या शाळेंत मुली घेत नाहींत.

नाना— मग हेंच तें. मी काय म्हणतों, वर्गांत मुलगी नाहीं तर राम नाहीं. आमच्या वर्गांतच बघ. हा मुलींचा ताटवा. एकेकीहून एक एक टेर —अन् आम्हीं त्याच्याकडे पाहिलें म्हणजे अशा मारू हसतात कीं नाहीं ! परवा तर मी त्या मिस् पुरंदरेला असें हसवलें कीं नाहीं ! तासभर सारखी

माझ्याकडेच पहात होती. आमचा Algebraचा प्रोफेसर वर्गांत आला बरें का, अन् तिला ऐकूं जाईल अशा बेतानें मी हळूच माझ्या bench companionला म्हणालों, 'अरे, हा मिशाळ पुरुष कोण बुवा ?' अन् मग ती अशी हसली कीं नाहीं !

बापू-- (अगदींच गावढळ) ह्यात काय आहे ? ती तुला हसली. त्या प्रोफेसरला नाहीं काहीं. मारे थापा मारतो आहे. म्हणे माझ्याकडे पाहून हसली.

नाना-- (पक्का कॉलेजिएट तो) लहान आहेस तू. बायका कोणत्या रीतीनें हसतात हें समजायला अक्कल लागते. (किती सार्थ बोलला पण !) बरें, पण मी ही कादंबरी संपवतों अन् आई आली तर जोरात खाकर म्हणजे मी लगेच अभ्यासाला पुस्तक घेऊन बसेन तुला एक अक्कल नाहीं अन् आईलाही पण नाहीं मुलींच्या गोष्टी काढल्या कीं एवढाला डोळा करते. कादंबरी वाचत बसावें तर काकाना सांगते. असल्या आया म्हणजे जिवतपणीं यमयातना. त्यापेक्षा आई मरून बाप जिवत राहिला तरी मी म्हणतों बरें. (पुस्तक उघडतो )

बापू-- (अजून इंग्रजी सहावींत आहे म्हणून जरासा पितृभक्त ) आपल्या जन्मदात्याविषयीं असें बोलणें म्हणजे काहीं शहाणपणा म्हणत नाहींत !

नाना-- (उसळून) मग पडत जा कीं दररोज आईच्या नी बापाच्या पाया. मोठे शहाणपण शिकवायला निघाले आहेत. काय आईबापाचें देणें लागतों आम्ही ? जन्म दिला हा उपकार झाला वाटतें ? 'द्या हो आम्हाला जन्म, द्याहो आम्हाला जन्म' म्हणून काहीं ह्याच्या पाठीमागें लागलों नव्हतों आम्ही. इतकें असून पुन्हा वर धाक कोण ? 'असेंच करू नको, तसेंच करू नको.' मग करा तरी कसें ? सिनेमाला गेला, तिकडून चोरी, हॉटेलात गेलों, तरी चोरी. जन्म द्यायला सांगितलें होतें कुणीं याना ? (पुढें होऊन आवेशानें) बापू, हे जुने लोक अनुभवाच्या मारे थापा मारीत असतात. मी म्हणतों काय याना अनुभव आला आहे ?

बापू-- तें मला काय माहिती ?

नाना-- मी तुला सांगतों ना ! जरा कुठें संसारांत खुट् झालें कीं लगेच तोंडबिंड आंबट करून, डोळे एखाद्या मरतमढ्यासारखे करून,

उगीच मनातल्या मनात खुरटत बसतात. ह्यांना जगामध्यें सुख म्हणून काहीं गोष्ट आहे याची कल्पना सुद्धा नसते. हीं मोठीं माणसें अशीं ज्याच्या त्याच्या सुखात आडवीं येत असतात. याना मुलींच्या गोष्टी नकोत, 'प्रेम' म्हणून शब्द घरात उच्चारायची चोरी, सिनेमा नको, नाटक नको मग पाहिजे तरी काय ?

बापू— पण बाबा नेहमीं म्हणत असतात कीं हें जग म्हणजे वाटसरूच्या मार्गातील एक आडोशाची जागा आहे– सुखाच्या शोधार्थ आपण सर्व भटकत आहोंत.

नाना— मी हा अन्याय म्हणतों. पृथ्वीच्या पाठीवर रहायचें, आणि तिला शिव्या द्यायच्या ! काय जुलूम आहे हा ! अरे, ह्यांचें सुख कल्पनेंत असते, आमचे ह्या दृश्य सृष्टींत असतें. स्वर्गाची कल्पना कोणीं आचरटानें शोधून काढली असेल ती असो पण हे लोक त्या कल्पनेलाच आवळून बसू लागले आहेत जसा काहीं स्वर्ग त्याच्याकरता वाटच पहात आहे. माझ्याविषयीं म्हणशील तर माझें मत असें आहे कीं देव थोतांड आहे– धर्म हे वेडयापिशा लोकाचें खूळ आहे– आणि स्वर्ग- (हू. करून पुस्तक उघडतो ) स्वर्गात काहीं मिस् पुरदरे नाहीं– एकसुद्धा सिनेमाचे थिएटर नाहीं– आणि अमृताशिवाय दुसरें खाण्याचें काहींसुद्धा नाहीं. स्वर्ग- स्वर्ग ! यव रे स्वर्ग– (म्हणून पुन्हा पुस्तक छातीवर टेकवून बाकावर लवडतो खरोखरच, नाना म्हणतो त्याप्रमाणें 'यव रे स्वर्ग' असच प्रत्येकाला म्हणावे लागेल का ? आमची सौख्याची कल्पना इतकी रूढ होऊन बसली आहे कीं नानासारखें बेछूट भाषण ऐकलें कीं अगावर शहारे येतात )

(पति गेल्याला आज सुमारें दहा वर्षें झालीं. त्या दिवसापासून मनोहरच्या वहिनींत कल्पनातीत फरक पडला आहे. पूर्वीचा तिचा तो हसरा चेहरा अजूनही मधून मधून पूर्वीच्या कालाची आठवण करून देत आहे हें जरी खरें असलें तरी पण पूर्वीची लहर काहीं न्यारीच असेच मोठ्या खेदाने म्हणावें लागत आहे विनोदप्रिय आणि भावनाप्रधान लोकाचीं आयुष्यें अखेरपर्यंत आनदात जातील असा कोण भरवसा देऊ शकेल ? लहानपणची खेळकर वृत्ति मोठेपणीं किती चिडखोर होऊ शकते याची

काहीं थोडींथोडकीं उदाहरणें नाहींत. जगाचे टक्केटोणपे खाऊन प्रथम मनाला थोडासा खेद होतो, नतर खेदाचें पर्यावसान निराशेंत होतें आणि निराशा ही चिडखोरपणाला जन्म देते. आणि एकदा कायमचा चिडखोर-पणा अगीं लागला कीं मग विनोदप्रियता श्मशानात बसून खिदळण्या-प्रमाणें भेसूर वाटू लागते. 'वहिनीचें आयुष्य सुखाचें असेल का?' हा प्रश्न किती पोरकट बुद्धीचा होता हें आज प्रत्यतरास आलें आहे. वहिनीच काय, पण आपण सर्वजण तेंच करीत आलों आहोत. वहिनी त्रासिक स्वभावाची बनली म्हणून तिला दोष देण्यात काय अर्थ आहे? तिच्या चेहऱ्यावर अजून पूर्वीचाच तजेला कायम आहे उलट काहीं काहीं स्त्रिया ज्याप्रमाणें पोक्त्यापुरवत्या झाल्या म्हणजेच जास्त खुलून दिसतात त्या-प्रमाणे वहिनी बालिशपणा सोडून जेव्हा थोडीशी विचारमग्न होऊं लागली तेव्हा तिच्याकडे पाहून तिची जास्तच स्तुति करावेंसे वाटू लागलें. अर्थात् फूल अर्धवट उमललेलें असताना जास्त सुदर दिसतें का पूर्णपणें उघड-लेलें जास्त सुदर दिसतें हा ज्याच्या त्याच्या आवडीचा प्रश्न आहे. केस मधून मधून किंचित् पाढुरके झाले आहेत, चेहरा किंचित् उतरलेला, पाढरें पातळ नेसलेली, अशा रीतीनें वहिनी हातात कसलेसे एक पुस्तक घेऊन आत येते )

वहिनी— नाना, काय वाचतोस आहेस?

नाना— (पुस्तक मिटून) आमचें F Y चें Text

वहिनी— मी इथें बसून वाचू लागलें तर तुम्हाला त्रास नाहीं ना होणार?

नाना— (मातृभक्तीच्या उसळीसरशीं) छेः छेः! त्यात कसला आला आहे त्रास? उलट स्त्रीवर्गानें जर असा शिक्षणाकडे कल दाखविला तर तो आम्हा सुधारलेल्या लोकाना पाहिजेच आहे. (अर्थात् याचीं 'मतें' ऐकण्याकरिता काहीं वहिनी बाहेर आलेली नसल्यामुळे तिच्या कपाळावर आठ्या पडू लागतात. पण सुधारणेच्छु लोक नानासारखे खंबीर होते म्हणून तर जगाचें पाऊल इतकें झपाट्यानें पुढें (कीं मागें?) पडत आहे नाना लक्षच न देता पुढें निसटतो.) पण आमचा भगिनीवर्गच मुळीं जन्माचा भित्रा. रूढीचे पाश तटातट तोडून या जुलमी राक्षसी समाजाला वडा शिकवायला आजपर्यंत कितीशा स्त्रिया पुढें आल्या आहेत!

वहिनी— (किती स्त्रिया आल्या आहेत ह्याची फारशी चौकशी न करता) अभ्यास करीनास थोडासा त्याच्यापेक्षा ! जें काम आपल्या अकले-बाहेरचे आहे त्या कामात नसती ढवळाढवळ करणें शोभत नाहीं (पुस्तक उघडून एका खुर्चीवर बसते )

नाना— (समाजाची ही अधप्रवृत्ति सहन न होऊन) पण मी म्हणतों शिक्षण मिळाल्याशिवाय स्त्रियाना समान हक्क मिळणार कसे ? कोणतीही गोष्ट प्राप्त करून घेण्याकरता अगों पात्रता असावी लागते. आमचेंच कॉलेज घ्या. सबध सातशें मुलामध्ये चाळीस नाहीं तर पचेचाळीस मुली. शेकडा प्रमाण— (गुणाकार, भागाकार वगैरे भानगडींत न पडता) पण जाऊ द्या. माझें म्हणणें एवढेंच कीं—

वहिनी— (त्रासिक मुद्रेनें) मला तुझें म्हणणें ऐकायची तिळमात्र इच्छा नाहीं— आणि नाना, तुझ्या जन्मदातीविषयीं थोडेंसें जर वाटत असेल तर हीं लोकाचीं चोरलेलीं वाक्ये आपलींच म्हणून दडपून देण्याची खोड तू सोडलीस तर बरे होईल

नाना— (हताश होऊन) काय मनुष्य बोलणार बोला. मनुष्यानें आपल्या आईजवळ सुद्धा बोलू नये, मग बोलावें तरी कुणाजवळ ? जिजा-बाईचा सल्ला घेण्याकरता शिवाजीमहाराज—

वहिनी— का उगीच मोठ्याची निंदा करतो आहेस ? मी जिजाई नाहीं आणि तू शिवाजीमहाराजही नाहींस माझा सल्ला घ्यायला— आणि शिवाजी कॉलेजातल्या मुलींच्याविषयीं कधींच आईजवळ बोलला नाहीं.

नाना— (एकदम) त्या वेळेस कॉलेजीस नव्हतीं म्हणून—

वहिनी— नाना, पुन्हा तू असला विषय काढलास तर तुझ्या काकाना सागावें लागेल मला. त्यापेक्षा पुस्तकें वाचून पास झालास तर मला जास्त आनद होईल

नाना— (गुरगुरत) मीं काहींही केले तरी तुझ्या मनास म्हणून येत नाहीं. परवा आमच्या कॉलेजच्या मॅगझीनकरता गोष्ट लिहू लागलों तरी काकाना सागायला निघालीसच. मी बाहेर गेलों तरी रागावतेस, घरात बसलों तरी डोळेफाड करतेस— माणसानें वागावें तरी कसें मग ! घरात मित्र आणण्याची सोय नाहीं; मित्राच्या घरीं जायची सोय नाहीं. मुलींच्या

गोष्टी बद, अन् गोष्टीमध्यें मुली आणल्या कीं कागद फाडून टाकायचें. दादा असते तर मला नाहीं वाटत तू मला इतका त्रास दिला असतास.

(पतीची आठवण होताच वहिनी कावरीबावरी होते. देहभान विसरून क्षणभरच का होईना पण काहीं काळ तरी एकदम वीस वर्षांपूर्वीची तिला आठवण होते. भाउजींचें लग्न– मग नानाचा जन्म– मग बापूचा जन्म– कमलेचें बाळतपण– वगैरे सर्व प्रसग चित्रपटासारखे डोळ्यासमोर उभे रहातात.)

बापू— काकू, Millennium (मिलेनिअम्) म्हणजे काय ?

वहिनी— (भानावर येऊन) काय म्हणालास ?

बापू— हा शब्द मला येत नाहीं– मिलेनिअम् म्हणजे काय ?

(नाना चटकन् सुदररावाची हालचाल पाहू लागतो.)

वहिनी— (आर्द्र स्वरात) मिलेनिअम्– मिलेनिअम्– बापू, तुझ्या वडिलांनीं मला तोच प्रश्न विचारला होता. माझें शिक्षण कोतें पडलें. मीं काहीं तरीच उत्तर दिलें. अर्थात् माझें उत्तर चुकलें. मिलेनिअम्– मिलेनिअम्.

बापू— (बावरून) पण मिलेनिअम् म्हणजे काय ?

वहिनी— बाळ, मनुष्यानें एकदा चूक केली तर क्षम्य असते. एकदा मीं मिलेनिअम्ची भलतीच व्याख्या केली होती पुन्हा ती चूक मी करणार नाहीं. तू आपला डिक्शनरीचा रूढार्थ काय असेल तो पहा.

बापू— (डिक्शनरी कोण पहातो ?) नाना, मिलेनिअम् म्हणजे काय ?

नाना— (पुस्तकात डोके खुपसून) वडिलाची आज्ञा मोडण्याचें पातक करण्यात काय मतलब आहे ? डिक्शनरी पहायला सागितली, मुकाट्यानें डिक्शनरी पहावी.

बापू— तुला येत नाहीं ते कोण सागतेय ? पण गप्पा कोण राव-साहेबाच्या ! म्हणे मला मॅट्रिकमध्यें यव् मार्क मिळाले नी त्यव् मार्क मिळाले होते.

नाना— बरे बरें. जीभ किती काढून बोलतो आहेस ? आपण अभ्या-साच्या नावानें शख अन् दुसऱ्याच्या नावाने नसती बो– (आईकडे पाहून जीभ चावतो.)

बापू— (सतापून) अभ्यास करतो आहेस का आत्ता ? कसलीशी

कादबरी वाचतो आहेस अन् मलाच उलट बोलतोस ?

वहिनी— नाना, पुस्तक आण पाहू इकडे तुझे !

नाना— (चाळवण्या दाखवीत) अग आई, त्याचें काय ऐकतेस तू ? त्याला काय त्यातलें समजते आहे ? (बापूवर डोळे फाडीत) नसत्या चाभारचवकशा करण्याची तुला रे काय गरज ? तू माझ्याबरोबरचा तरी आहेस का ? (वहिनीकडे पाहून) आई, अग अवघड पुस्तक आहे तें. तुला त्यातलें काहीं समजणार नाहीं (मोठ्या आशेनें) अन् मला आता वेळही पण नाहीं वाचायला ठेवूनच देतों तें

वहिनी— नाना, मीं तुला सागितलेले ऐकायचें की नाहीं ?

नाना— अग आई, पण- (वहिनीच्या डोळ्याकडे पाहून विरमतो) बरें, कादबरी वाचतो आहे झाले ?

वहिनी— नाव काय पुस्तकाचें ?

नाना— (दडपून) रागिणी. (उदारपणे माहिती पुरवीत) वामन मल्हार जोशीकृत. चागली आहे कादबरी आई त्यातल्या त्यात वर्णनें फारच सुदर आहेत मराठींत ह्याच्यासारखा दुसरा चागलासा लेखकच नाहीं.

वहिनी— तुला मीं पुस्तक इकडे द्यायला सागितलें आहे.

नाना— पण- (मोठ्या जिकीरीला येऊन पुस्तक देतो.)

वहिनी— (पुस्तकाचें नाव वाचते, आणि पुस्तक सरकारजमा करते.) नाना-

नाना— (खालीं मान घालून उभा रहातो ) काय ?

वहिनी— उच्च शिक्षण खोटें बोलायला शिकवीत नाहीं. हें वामन मल्हार जोश्याचें पुस्तक काय ? तू बावचळलास म्हणून मोठ्या माणसाना का असा बट्टा लावतोस ? त्या मोठ्या गृहस्थाचें नाव उच्चारण्याची तरी तुम्हा पोराची लायकी आहे का ?

नाना— (डिवचलेल्या सापाप्रमाणें) मीं काय केलें ?

वहिनी— (सतापाने पुस्तकाच्या चिंधड्या करीत) तुला वाटत असेल आई म्हणजे पोरखेळ आहे- वाटेल तशी फसवावी, वाटेल तसें वागावें. नाना, मी जिवत आहे तोंपर्यंत तरी तुला असा मोकळा मी कधींच सोडणार नाहीं. मोकळें सोडलें- तिकडून शिव्या. एर्वीतेर्वी शिव्याच खायच्या की

नाहीं ! काय व्हायचें असेल तें होऊ दे, तुझ्या अश्शी मी राशीला लागणार. काय आजपर्यंत मुलानीं एवढे पाग फेडलेत म्हणून आईने तरी लागेबांधे पाळावेत ? आजपासून मी तुझी आई नाहीं नी कोणी नाहीं आणि माझ्या घरात तुला राहायचें असेल तर मी सांगेन तसें राहिलें पाहिजे नाहीं तर भीक मागत जा दारोदार मला कशाचीच पर्वा नाहीं

(आजपर्यंतच्या भांडणात आज अगदीं कळस होता. नाना मुकाट्याने तोंड फुगवून उभा राहतो मधून मधून 'बरे बरे' म्हणून कुऱ्यांत आई-कडे पहात असतो बापू चोरासारखा डिक्शनरी काढून Millennium चा अर्थ काढू लागतो )

वहिनी— (रागाचा पहिला आवेश ओसरल्यावर) नाना, तुला कित्तीदा सांगितलें तरी तू का रे असे करतोस ? तुला इतकें बोलल्याचें काहींच कसें वाटत नाहीं ? इतका कसा तू निर्लज्ज बनलास ?

नाना— (कुऱ्यानें) तू इतकी बोललीस त्याच्यापेक्षा मलाही पण किती-तरी बोलता येईल पण बोललों तर तूच पुन्हा चिडशील अन् उलट उत्तरें देऊ लागलों म्हणून आकाशपाताळ एक करून सोडशील. आता गप्प बसलों आहें तर तिकडूनही तुझा शब्द वर आहेच माणसानें वागावें तरी कसें कुणास ठाऊक !

वहिनी— (रागाच्या जागीं शोक डोकावू लागतो) नाना, तुला उगीच मी कशी बरें बोलेन ? तुला उगीच टाकून बोलायला माझी जीभ तरी कशी रेटेल ? नाना, तू लहान आहेस (नाना मध्येंच पुटपुटतो, 'अठरा वर्षांचा आहेन्.') नाहीं. अगदीं ऐंशीं वर्षांचा झालास तरी मला तू लहानच आहेस. आपल्या मुलाला निष्कारण छेडावे असें कोणत्या आईला वाटेल ? पण नाना, माझें थोडेंसें ऐक. लहानपणीं—तुला कल्पना सुद्धा यायची नाहीं—मीही पण तुझ्यासारखीच थोडीशी हट्टी होते पण नाना, मला सांगायला कोणीच नव्हतें त्या वेळेला

नाना— मीं काय करावें तें तरी कळू दे ! थांब. तुझ्या मनात मीं म्हणजे एक फकीर बनावें असें का आहे ? वयाप्रमाणे सर्व गोष्टी होत असतात. तुझ्या लहानपणीं जें तू केलेस तेंच मी माझ्या लहानपणीं करतों आहे. तुझीं जशीं सुखाचीं स्वप्नें होतीं त्याहून माझीं थोडींशीं निराळीं

असलीं तर तो माझा दोष का ? तुला टिळकाचें गीतारहस्य वाचण्यात आनद वाटतो, मला त्या पुस्तकांतलें काहींच कळत नाहीं. मीं तेंच पुस्तक वाचावें असा तुझा आग्रह का ? मला ज्या पुस्तकात सौख्य वाटतें तें पुस्तक मीं का वाचू नये ? ही एवढी ताबेदारी का ? जोंपर्यंत ऐकायचे दिवस होते तोंपर्यंत घेतलें ऐकून. आता थोडेंसें सौख्य नको—

वहिनी— अरे, पण तुझ्या या असल्या कृतीनें सौख्य मिळेल अशी तुझी कल्पना आहे का ?

नाना — मग दुसऱ्या कोणत्या कृतीने सौख्य मिळेल तें तरी सागावें.

(पुन्हा तोच प्रश्न ! सौख्याची व्याख्या काय ?)

वहिनी— तुला वाटेल तसें वाग बाबा. माझ्याकडून सागायचें तेवढे मीं सागून पाहिले. नाहीं ऐकत– सोडलें. (बापूकडे पाहून) बापू, पेन्सील देतोस का जरा मला ?

बापू— माझी पेन्सील मोडली आहे. थाब. नाना, तुझें फाउटन पेन देऊ का ?

(नाना हो' म्हणून मान हालवतो. बापू फौंटन पेन घाईघाईनें बाहेर काढू लागतो. फौंटेन पेनच्याबरोबर आणखीही काहीं जिन्नस बाहेर पडतात एक रेशमी रुमाल, एक Passing Show चें पाकीट, दोन नोटा आणि चार सुटे आणे इतके लटाबर वहिनीच्या नजरेस पडतें. नाना एकदम घाबरून उभा राहतो बापू आश्चर्यानें हातातल्या फौंटेन पेनकडे आणि नतर चोरून नानाकडे पहातो. वहिनी नानाकडे सारखी पहात उभी राहते. काहींतरी स्फोट होणार इतक्यात मनोहर घाईघाईनें बाहेरच्या बाजूने आत येतो. काळ आणि काळजी यांचें विजयचिन्ह असा हा नायक पाहिला म्हणजे मनाला खरोखरीच धक्का बसतो. सुखाच्या शोधार्थ फिरणारा हा जीव पहा कसा नसत्या भानगडींत गुतला आहे तो. कमलच्या सहवासात सौख्याची इच्छा करणारा हा प्रेमळ जीव पुढच्या भानगडी डोळ्याआड करून आत्मवचना करू पहात होता. जगात निर्भेळ सौख्य आजपर्यंत कुणालाच मिळालें नाहीं तर, मनोहरपंत, तुम्हालाच काय म्हणून मिळ-णार ? जिवाची व्यर्थ आटापीट करून घेण्यात काय अर्थ आहे ?)

मनोहर— वहिनी, माझ्या खिशातले तूं काहीं पैसे घेतलेस का ? काल

मीं खिशात पाचाच्या दोन नोटा ठेवल्या होत्या अन् आता स्टेशनवर जायला निघालों तों खिशात नोटा नाहींत. (पुन्हा एकदा सर्व चाचपू लागतो.)

वहिनी— नोटा तुमच्या खिशात नाहींत. (मोठ्या कष्टानें) तुमच्या नोटा नानानें—

(मुलाला चोर कसें म्हणणार? मनोहर रागानें खालच्या प्रदर्शनाकडे पहातो नानाकडे पहातो. नाना तोंड फिरवून उभा रहातो.)

मनोहर— नाना, (नाना काहींच बोलत नाहींसें पाहून) नाना—

वाहिनी— कार्ट्या, हात का नाहीं तुझे तुटून पडले? अवलक्षणी कार्टें! आणि वर तावदारकी कोण! एक शब्द बोलायला जावे– कोण तणतण उडत असतो नुसता! बोल, तुला आईने शिकवलें का चोरी करायला! तुझी आई चोर होती का?

नाना—(चिडून) मला नाहीं माहिती

वहिनी— भाऊजी, हा कार्टा ज्या घरात असेल त्या घरात मी पाणी नाहीं प्यायची. मला तरी एक घराबाहेर काढा नाहीं तर त्या कार्ट्याला तरी हाकलून द्या आजपर्यंत झाले तेवढे लाड पुरे झाले. गय करायला जावें लहान मूल म्हणून, तर हा मानेवर सुरी ठेवायला लागला. असलें पोरटे जन्माला येण्यापेक्षा—

मनोहर— नाना, तुला हें घर सोडून जायला तुझी आईच सागते आहे. माझा नाइलाज आहे.

नाना— (सतापून) आईच्या आड दडून कशाला? सरळ सागानात जायला! तुमच्या घरात आलों हा काय माझा गुन्हा झाला?

वहिनी— एक शब्द बोललास आता तर तोंडात मारायला मी कमी करणार नाहीं मुलाच्यापासून सुख मिळण्याची माझी आशा फार चागली लवकरच फळाला आणून दाखवलीस तें फार छान झालें. तुझ्या मार्गांत आडवी येण्याची माझी इच्छा नाहीं. तुला जन्म दिला हा माझा गुन्हा मला कबूल आहे. मुलाना जन्म देऊन आईबाप गुन्हेगारच ठरतात. त्याना अकला नसतात म्हणून तुझ्यासारख्या दिवट्याना तीं जन्म देतात.

मनोहर— नाना, आत्ताच्या आत्ता घरातून चालता हो. अन् ह्या घरात पुन्हा पाऊल टाकू नकोस. तुला माणसांची गरज नाहीं— वाटेल

तसें तोंडसुख घेतोस.

नाना— आणि तुम्ही तरी काय कमी तोंडसुख घेता आहात ? अन् तुम्हाला तरी माझी कुठें गरज आहे ? आईनें खुशाल 'पोरट्या','कारट्या', 'दिवट्या' म्हणून शिव्या द्याव्यात. काय मीं असें तिचें घोडें मारलें आहे ? आणि म्हणे मुलापासून सुखाची आशा केली होती. कुणीं सांगितलें होतें ? मुलानीं तुम्हाला सुख देण्याकरता तुम्ही सांगाल तसें करावें, आणि तुम्ही मात्र कार्ट्यां, पोर्ट्यां म्हणून टाकून बोलावें सगळा स्वार्थाचाच बाजार ! मुलाला जन्म द्यायचा कशाला, तर स्वत.ला मुलानें सुख द्यावें म्हणून. नाहीं तर मुलाला घराबाहेर काढावे. खासा न्याय !

(आजारानें कृशतनु झालेली कमल आतून येते. चेहरा फिक्का पडलेला असून आजाराचीं सर्व चिन्हे तोंडावर दिसत आहेत. सोळा सतरा वर्षांची कमल केव्हाच मेलेली आलेली आहे आणि आता आपल्यापुढें जगाला सर्वस्वीं कंटाळलेल्या एका जीवाची पडछाया दिसते आहे. माणसाचे आवाज ऐकून ती बावरून गेलेली आहे. त्यातून डोळे जड झालेले, पाया-वर विश्वास नाहीं, अंगात त्राण नाहीं )

कमल— काय झाले ? काय झाले ? (खोकल्याची ढास लागते त्या-सरशीं मट्कन खालीं बसते. मनोहर चट्कन पुढें होऊन तिच्या पाठीवरून हात फिरवतो.)

मनोहर— तू बाहेर कशाला आलीस ? आमचें ऐकायचें नसलें तरी डॉक्टरचें तरी ऐकशील कीं नाहीं ? बिलकूल उठायचें नाहीं अशी तुला सक्त ताकीद असताना तू का आलीस बाहेर !

वहिनी— कमल, काय— म्हणावें तरी काय ह्या तुझ्या हट्टीपणाला ! जरा पडली असतीस तर नसता का डोळा लागला ? तुला झोप लागली म्हणून मी बाहेर आलें.

कमल— मला झोप कशी येईल ? तुमचें मीं सारें काहीं ऐकलें. मला रहावेना म्हणून मी बाहेर आलें नाना काय म्हणतो आहे !

मनोहर— तू ह्या भानगडींत कशाला पडतेस ? नाना काहीं म्हणत नाहीं आणि कोणी काहीं म्हणत नाहीं. चल, तुला मी धरून नेतों. तूं मुकाट्यानें पडलीस जरा तर नाहीं होणार !

कमल— मला फसवून तुम्हाला काय मिळणार ? नानाला तुम्ही घरा-बाहेर काय म्हणून काढून लावणार ? तो आपला कुणीच नाहीं का ?

मनोहर— रिकामटेकड्या चोरट्याकरिता हे घर बांधलेलें नाहीं

वहिनी— कमू, तू आपली मुकाट्याने आत जा पाहू कशी ! माझे ऐक तूं. जा तूं आत.

कमल— (मान हालवून) मग मला तरी कशाला घरात ठेवता ? माझा तुम्हाला काय उपयोग आहे ? मी कवडीचीसुद्धा तुमच्या उपयोगाची नाहीं उलट माझेंच निस्तरावें लागतें आहे तुम्हाला. नाना– बाळ, काय तूं केलेंस ? तुझ्यावर हे का रागावले आहेत ?

नाना— (आधुनिक मताचा तरुण असला म्हणून प्रेमळ हाक विसर-णार नाहीं. आधुनिक असला म्हणून काय झालें ? माणुसकीवर पाणी सोडलेलें खास नसते.) मी– मी– मी—

वहिनी— का ? जिव्हा का चाचरते आहे ? चोरी केली म्हणून सागा-यला लाज वाटते तर करावी कशाला चोरी ?

(नाना पुन्हा चर्या पालटतो )

कमल— नाना, हीं चोरीचे काय म्हणताहेत बाबा ? खरोखरच का तू कांहीं चोरलेंस ? पुन्हा नाहीं असें करणार म्हण आणि मोकळा हो.

वहिनी— पुन्हा चोऱ्या करायला वाटतें ? कमू, तुला यातलें कांहीं कळणार नाहीं. तू आपली आत जा कशी चल मी उठवतें तुला. (वहिनी तिला दोन्ही हातानीं धरून उठवू लागते, पण कमल असेल नसेल तेवढें बळ खर्च करून तिचा हात झिडकारते )

कमल— तू माझ्या वाटेला जाऊ नकोस. मी कांहीं एक ऐकणार नाहीं. नानाला मी जाऊ देणार नाहीं.

वहिनी— कमल, इतकी शिकलेली तू आणि असें काय हटेल्यासारखें करावें ?

कमल— (त्वेषानें) शिकलेल्या बायकाना काय हृदयच नसतें काय ? मी शिकलें म्हणजे कांहीं मोठेंसें पाप केलेलें नाहीं॰ शिकलें म्हणून बाय-काची माया कांहीं विसरलें नाहीं. शिक्षणानें स्त्रीहृदय कधींही कठोर होणें शक्य नाहीं. (दम लागतो, पण जीव रहावत नाहीं म्हणून तशीच जोरानें

पुढें लोटते ) शिक्षणानें पुरुषांचीं मनें पापी बनलीं तरी बायकांचीं मनें जास्तच पापभीरू बनतात. नाना चोर बनला म्हणून आपली काहीं माया तुटली नाही (मनोहरास) मी म्हणतें, आपलें वडील घराण्याचें तेवढेंच काय ते चिन्ह कायम आहे जसा बापू आपला तसाच नानाहि पण आपलाच आहे आपल्याशिवाय त्याला दुसऱ्या कुणाचा बरें आधार आहे ? एक वेळ बापूला दूर लोटलेंत तरी माझें म्हणणें नाहीं, पण नानाला जवळ केलेंच पाहिजे (खोकल्याची ढास येते आणि बोलणें बद पडतें.)

मनोहर— वहिनी, फुलपात्र भरून पाणी घेऊन ये. (नाना धावत जाऊन पाणी आणतो )

वहिनी— आता हिची कशी समजूत घालावी ? वेळीं काहींच्याबाहींच करून घ्यायची नीट समजून सागावें तर अशी अगावर धावून येते

मनोहर— भोग आहेत झालें आपल्या कर्माचे. हिला आत नेऊन ठेवणार तरी कशी ? तू घर पाहू जरा मी तिला सावरतों (दोघेंही जण तिला सावरून आत नेऊ लागतात. वहिनी मागें वळून नानास)

वहिनी— तू चालायला लाग. माझ्या दृष्टीसमोर नकोस तू. (आत जातात )

(नाना बराच वेळ बापूकडे पहात उभा राहतो. सूड घेण्याची इच्छा अनावर होते, पण तो ओरडेल या भीतीनें मुकाट्यानें टेबलाकडे वळतो. बापू पुन्हा पुस्तकात पाहू लागतो.)

नाना— माझीं पुस्तकें कुठें आहेत ? नाहीं आईला गरज, तर मलाही नाहीं गरज कुठेंही भीक मागून पोट भरीन. (टेबलावरचीं पुस्तकें गोळा करू लागतो )

बापू— (हळूच) नाना—

नाना— (त्रासिक मुद्रेनें) आता एक शब्द माझ्याशीं बोललास तर जोड्यानीं मारीन बघ.

बापू— नाना, तू गेलास तर आईला काय वाटेल ? तू जाऊ नकोस. काकूचा राग उतरला म्हणजे आपोआप सगळें सुरळीत होईल. थाब. जाऊ नकोस.

नाना— अरे, पण आईलाच जिथें मुलाची ब्याद नको आहे तिथें

कोण काय करणार ? तुला काय वाटतें— आई ऐकेल होय काकूचें ? नाव नको. (पुन्हा पुस्तकें शोधू लागतो.)

बापू— पण तू कुठें जाणार आहेस ? जेवायची सोय काय करणार ?

नाना— (फारसा विचार न करता) जाईन झालें कुठें तरी. रेसिडेन्सींत जेवीन चार दिवस मित्राच्या क्लबात. नाहींच जमले चार दिवसानी तर बुधवारात भीक मागेन.

बापू— पण तुला भीक कोण मागू देईल ?

नाना— अ ! त्यात काय मोठेंसें ? मजुराने येथे उभें रहावें म्हणून पाटी आहे ना– तिथे उभा राहीन. कुठेंही गवंड्याच्या हाताखालीं चार विटा देईन अन् पोट भरीन

बापू— मग पुस्तकें कशाला बरोबर ?

नाना— उगीच आली लहर तर अभ्यास करीन. नाहीं तर अभ्यासाला राम राम. (बापूकडे वळून) मला वाटतें, बापू, माझेंच काहीं तरी चुकले असावें.

बापू— चुकलें असावें ? चोरी केलीस घडघडीत आणि म्हणे चुकलें असावें एरवीं काकू इतकी रागावलेली मीं कधींच पाहिली नाहीं.

नाना— खरें सागायचें म्हणजे दादा गेल्यापासून मी कसेंसेंच वागायला लागलों. अन् काकू पाहिलीस ना कशी कळवळ्यानें माझ्याकडे पहात होती बापू, एक वेळ आईला बाजूला सारीन पण काकूकरता काय वाटेल तें करीन.

बापू— (आनदानें) खरें ? मग काकूचे पाय धर अन् चुकलों म्हणून म्हण.

नाना— माझ्या काकूचे पाय धरीन, काय वाटेल तें करीन, पण– पण आई ? ऊ हूं !

बापू— (निराशेनें) माझ्या आईचें काय ? आता आहे आणि जरा वेळानें नाहीं. तिचें म्हणणें काकूनें ऐकलें तर ठीक. नाहीं तर—

नाना— नाहीं तर आहेच भिक्षान्देही.

(साठे आहेत का म्हणून खालून गजूचा आवाज ऐकू येतो. चार सोबत्यापैकीं गजूच काय तो टिकून राहिलेला असतो. साहेबी थाटाचे सद्-

गृहस्थ विलायतेला म्हणून जे जातात ते बेपत्ताच होतात. बाकीचे दोघेहि पण मुंबईला कुठेंतरी दोन न् दोन चार, चार न् चार आठ करीत कपाळाचा घाम पुशीत असतात. गजू आता पुण्याचा सन्माननीय नागरिक झालेला आहे. पूर्वीची त्याची वक्र बोली अजून कोर्टात ऐकू येते– पण इतर व्यवहारात गजू बराच नरमलेला आहे. 'पुण्याचा गृहस्थ' म्हणून शेखी मिरवण्याचें त्यानें केव्हाच सोडून दिलें आहे. इतर चार वकील लोकाप्रमाणें वयानुसार पोट वगैरे सुटलेली अशी गजूची स्वारी आत येते.)

गजू— (भरगच्च आवाजीत) काय रे नाना, मनोहरपत आहेत का घरात ?

बापू— मी बोलावतों त्याना बाहेर. बसा. (आत जातो )

गजू— (नानाच्या कपडे गोळा करण्याच्या धादलीकडे न्याहाळून पहात) कुठें गावाला चाललास का रे ?

नाना— (बॅगमध्ये कोट दडपीत) घराबाहेर जातों आहें.

गजू— (आश्चर्यानें) पळून का !

नाना— आईचे नी माझें झालें भाडण. आईनें सागितलें घराच्या बाहेर चालता हो माझें काय ? जा सागितलें— चाललों.

गजू— मूर्ख आहेस घराबाहेर कसला जातोस ? तुम्ही कॉलेजातली मुलें– सगळींच कशीं अशीं बिनडोक्याचीं ? आई बोलली म्हणून कुणी घर का सोडते ? ठेव ते कपडे बाजूला. मी सागतों तुझ्या आईला. (त्याचे कपडे हिसकावून घेतो आणि कपाटावर फेकतो ) घरात जा आता अन् तुझ्या काकूच्या तैनातीला उभा रहा. (वकील म्हटला म्हणजे परमेश्वरच तो. नाना मुकाट्यानें आत जातो. मनोहरची आणि त्याची टक्कर होते )

मनोहर— काय वकीलसाहेब, काय हालहवाल !

गजू— तेंच तुला विचारायला आलों आहे. तुझी बायको कशी काय आहे आता ? काहीं थोडासा उतार वगैरे !

मनोहर— (मान हालवून) फार थोड्या दिवसाची सोबती आहे. मला नाहीं वाटत ती आणखी हा आठवडा दम काढील. प्रयत्न करणें आपल्या हातात आहे. त्यातून पुन्हा आज तिला थोडासा आणखीन त्रास झाला. तरी पण थोडा वेळ जरी झोप लागली तरी दुखणें हटेल.

गजू— हो ! तेंच विचारणार होतों. आज ही नानाची काय भानगड आहे ?

मनोहर— (खेदानें) गजू, पोरगें कल्पनेबाहेर अर्वाच्य निघालें आहे. तू जरा वेळ आधीं आला असतास तर त्याच्या विद्वत्तेची किमान मर्यादा तुला पहायला मिळाली असती.

गजू— (सुस्कारा सोडून) घरोघर तोच प्रकार कुणाला सांगणार ? मला दोन शब्द तुला सांगायचे आहेत. लहानपणीं आपण कॉलेजांत होतों तेव्हा तुम्ही मला 'पक्का पुणेकर' म्हणून चिडवीत होतां– आठवतें ? मला त्या वेळेला जो आनंद वाटत होता तो आज आहे ? मी वरून जरी अगदीं खुशालचेंडू दिसत होतों तरी आंतून मला कांहीं एक ध्येय गांठायचें होतें. तें ध्येय मला आतां गांठतां आलें नाहीं– आणि आतां त्याचा पुढें नादच सोडावा लागणार आहे.

मनोहर— ध्येय ? आणि तू ध्येय गांठणार ? पुणेकर आणि ध्येय ?

गजू— होय. पुणेकर आणि ध्येय. मला व्यक्तीचा, जागेचा, शहराचा कश्शाचासुद्धा उदो उदो करायचा नाहीं पण लोकांची जी एक कल्पना आहे कीं पुणेकर म्हणजे महाखटपटी, थापेबाज आणि पोकळडौली ती खोटी आहे हेंच सांगायचें आहे. मीं माझ्याकडून होईल तितका प्रयत्न करून पाहिला पण सौख्याचा लवलेशसुद्धा मला सांपडला नाहीं. माझें ध्येय मातीला मिळालें– धूळ बनलें.

मनोहर— चार दोन मुलें, सोन्यासारखी बायको, धंद्यांत नाव– आणखी काय पाहिजे तुला !

गजू— हें तूंच बोलतो आहेस म्हणून बरें ! नाहीं मनोहर, संसार हे खास सौख्य नाहीं. पूर्ण विचारान्तीं असें दिसून येतें कीं स्वर्गाची, अस्मानाची किंवा सौख्याची आपण तरुणपणीं जी कल्पना बांधतों ती कल्पना अनुभवान्तीं कुचकामाची ठरते. वयानुसार एकेक पडदा बाजूला होऊन स्वर्गाऐवजीं जमीन मात्र पहावी लागते.

मनोहर— (गंभीरतेनें) अंताची साधारण जर कल्पना प्रथम डोक्यांत वावरू लागली तर कोणत्याही गोष्टीचा प्रारंभच होणें अशक्य होऊन बसेल.

गजू— बरोबर बोललास. स्वर्ग शोधायला जाण्यांत जमीनच हातीं

येणार हें आधीं ठाऊक असतें तर जगरहाटीकडे कुणींसुद्धा पाहिलें नसतें. आता मात्र माझ्या मनाचा पक्का निर्धार झालेला आहे कीं काय व्हायचें असेल तें होईल, वाहत्या जनसमूहाप्रमाणे आपणही वहात जावें नाहीं मिळत सौख्य तर नाहीं. आपल्या वाट्याला जें काय कर्तव्य येईल तें करावें आणि स्वस्थ बसावें

मनोहर— म्हणजे अशिलाचे गळे कापावे आणि आपले खिसे भरून घ्यावेत !

(दोघेही त्याही स्थितींत हसतात पण लवकरच दोघांच्याही चेहऱ्यावरचें हास्य मावळतें मनोहरला आपला अप्रासंगिक विनोद कर्णकटु वाटतो.)

गजू— सगळ्या कायद्याची शिकवणच मुळीं त्या तत्त्वाला धरून आहे तर मी तरी काय करणार ? मलाही पण चार लोकांसारखें जगायचें आहे.

मनोहर— चुकून म्हणालों मी तसें

गजू— अः ! त्यात काय आहे एवढे मोठेसे ? हल्लींच्या जगात कवि, वकील आणि तत्त्वज्ञानी यांची कुणीही टिंगल उडवावी. कारण तिघांही जणांना वेळच नसतो दुसरीकडे पहायला पण त्यांच्यावाचून एक पाऊल मात्र पुढें टाकवत नाहीं अतिपरिचयात् अवज्ञा म्हणतात तें हें. बरें, तें जाऊ दे. आल्या गोष्टीला तोंड देण्यातच शहाणपणा आहे. तुझ्या नानाचें काय करणार !

मनोहर— तीच मला मोठी काळजी लागली आहे. पोर आहे शिरजोर आणि घरात वहिनी रागावलेली आहे

गजू— मग असें कर– त्याला आणि तुझ्या मुलाला चार दिवस माझ्याच घरात राहू दे.

मनोहर— तुझ्या ? चार आणि दोन सहा आणि सहा दुणें बारा लाथा खाव्या लागतील पुन्हा तुझ्या बायकोच्या किती मिळतील हरि जाणे.

गजू— हरि कशाला ? तें गजू जाणे म्हण. त्याला बिचाऱ्याला कशाला माझ्या बायकोच्या लाथा आणखी ? येऊ द्या तुझ्या दोन्ही पोरांना माझ्या घरीं. कायद्याच्या कचाट्यात धरून जीव हैराण करून सोडतों एकएकाचा. जास्ती गडबड करायला लागले कीं पीनलकोड, इक्विटी— मोठमोठालीं पुस्तकें मारतों त्यांच्या टाळक्यात. तुझी बायको बरी झाली

म्हणजे मी तुझ्या घरीं येऊन रहातों.

मनोहर— (वीस वर्षांपूर्वीचा मनोहर) इतका लेका बायकोला भितोस, आणि म्हणे मी वकीली करतों. आणि तुम्ही स्वराज्य मिळवणार ना रे ? जीव द्या मुळामुठेंत.

गजू— (वीस वर्षांपूर्वीचा गजू) अरे, काय बिशाद लागली आहे बायकोची ? ती दहा शिव्या देईल तर मी एक तरी देईनच देईन.

नाना— काका, काकूला झोप लागली (मनोहर आनदानें गजूकडे पहातो.)

गजू— चला आता. दुखणें मागें हटायला काहीच हरकत नाहीं. नाना, पण तू आई येण्याच्या आत माझ्या घरीं पळ पाहू ! अन् बापू, तूही पण जा.

नाना— जाऊ काका ? (मनोहरने हो म्हणताच नाना आणि बापू– मुलेंच तीं– पळतच जातात. घरातून वहिनी बाहेर येते. गजूला पाहून थाबते.)

वहिनी— भाऊजी, नानान् बापू याच्या घरीं गेले ?

मनोहर— हो.

वहिनी— (श्वास टाकून) भाऊजी, आज माझ्या मनात काय सचारलें होतें राम जाणे. पोटच्या पोराला पण मी वाटेल तसे बोललें.

मनोहर— वहिनी, मन एकदा निराशेंत घोटाळून पडलें कीं मनुष्याच्या हातून कोणकोणते प्रमाद घडतील याची जाणीव त्याला नसते. वीस वर्षांपूर्वी याच घरात कोणतें दृश्य दिसत होतें ? (त्या दृश्याशीं समरस होत) वीस एकवीस वर्षांचा तरुण मनोहर सुखाच्या शोधार्थ भटकताना कदाचित् याही मार्गांत सौख्य असेल म्हणून नवरी मुलगी पहायला चालला आहे. ते बघ त्याचे चार मित्र. मला आज वाईट वाटतें– माझ्या एका मित्राला, वहिनी, तुझ्या धाकामुळे सिगारेटसुद्धा त्या दिवशीं मीं ओढू दिली नाहीं. मी परत आलों आहें तो बघ गजू, हसत हसत 'फसवलेंस काय आम्हाला लेका ! थाब रे मनोहर, मी वकील तर होऊ दे ! या तुझ्या सासऱ्याला ना कोर्टांत खेंचीन, तर' म्हणत म्हणत निघून चालला आहे. वहिनी, मी तूंच समजून कमलेला हाका मारतों आहें. बघ कमल

कशी दचकली ती– मीही पण बघ कसा घाबरलो आहें तें. माझ्या खोलींत ही कोण मुलगी ? वहिनी, कमलेला लहानपणीं पाहिलें म्हणजे जीव तिच्यावरून ओवाळून टाकावेंसें वाटत असे वहिनी, ती बघ 'मी घरीं जाऊ का ?' म्हणून विचारते आहे साग तिला नको जाऊस म्हणून. वहिनी, वीस वर्षांनतर माझी कल्पना चुकीची ठरली जगरहाटींत कधींही सौख्य मिळणें शक्य नाहीं गजूसुद्धा असाच आपल्यासारखा ध्येयाच्या मागें लागला होता पण तोही फसला वहिनी, तू पूर्वीची खास नाहींस, आपण सर्वजण थकलों

वहिनी—पण भाऊजी, कमलला सौख्य मिळालें कमलला सुख मिळाले म्हणून ती आज हातीं लागली आहे कदाचित् तिचेंही तेंच ध्येय असावे भाऊजी, (गभीर होऊन) तिचे सुख तिला कसें मिळाले हें समजणें मला शक्य नाहीं, पण एवढे मात्र खरें कीं सुख कुठें तरी आपल्याजवळच असावे. नाहीं म्हणावे, तर कमलचा जीव शान्त नसता (कमलला स्वत.ला तरी सौख्य म्हणजे काय हें समजलें कीं नाहीं कुणास ठाऊक ! तरी पण कमल दुखण्यातून बरी होते ती कशाच्या जोरावर ?)

(अरे, पण हा पडदा आलाच कीं खालीं !)

आपल्या नाटकातील नायकाचे शब्द थोडेसे विचित्रच वाटतात नाहीं का ? 'अताची साधारण तरी कल्पना डोक्यात वावरू लागली तर कोणत्याही गोष्टीचा प्रारभ होणे अशक्य होऊन बसेल ' आपल्या जगाच्याहि बाबतींत हेच विधान सत्य ठरू शकेल काय ? विश्वाच्या अताची कल्पना आपल्या आकलनाबाहेर असल्यामुळें कदाचित् विश्व आपल्याला नदनवनासारखें वाटत असेल– नाहीं कुणीं म्हणावे ?

पण आपल्या ह्या जोडप्याची वाट काय ? कमलला कसलें सुख मिळालें !– कीं हा सगळा भावनाचा खेळ आहे ?

का– आहे काय ?

---